# लग्नाचा फांस



लेखकः- नारायण रामकृष्ण अभ्यंकर

प्रस्तावनाः- आचार्य प्र. के. अत्रे



प्रथमावृत्ति

(१९३०)

किंमत १ रुपया

# प्रस्तावना

'लग्नाचा फांस' ही सामाजिक स्वतंत्र कादंबरी मुंबईचे तरुण साहित्य-सेवक श्री. ना. रा. अभ्यंकर यांनीं लिहिलेली असून तिचा पुरस्कार करण्यास मला अतिशय आनंद वाटत आहे. श्री अभ्यंकर यांची ही दुसरी कादंबरी. त्यांची पहिली कादंबरी 'खरा वारकरी' ही असहकारितेच्या चळवळीवर आधारलेली असून ती १९३१ सालींच प्रसिद्ध झालेली आहे. वास्तविक ते नाटककार म्हणूनच पुढें यावयास पाहिजे होते. गंधर्व नाटक मंडळीच्या रंग-भूमीवर 'शिवाई सूड' हे त्यांचें येऊं घातलेलें नाटक केवळ त्यांच्या (किंवा मंडळीच्या म्हणा!) दुर्देवामुळेंच येऊं शकलें नाहीं. श्री. अभ्यंकर हे सध्यां वृत्तपत्रीय सृष्टींत उत्तम प्रकारें संचार करीत आहेत. हौस, उत्साह आणि जीवनाचे विविध अनुभव यांचें जबरदस्त भांडवल जवळ असूनहि यशाचा वांटा त्या मानानें कमी–पण त्यांत खेद वाटण्याचें कारण नाहीं! महाराष्ट्रांतील अनेक कर्तबगार साहित्यिकांच्या नशिबी हेंच विधिलिखित कोरलेलें आहे!

विवाह हा या कादंबरीचा मध्यवर्ति विषय आहे. मनाविरुद्ध झालेल्या विवा-हामुळें दोन प्रेमी जीवांचा संबंध आयुष्यभर कसा कोंडमारा होतो हें या कादं-बरींत लेखकानें अत्यंत हृदयभेदक पद्धतीनें चितारलेलें आहे. नायक आणि नायिका यांचे बाल्यापासूनचे संबंध लेखकाने विस्तृतपणें रंगविले असल्यामुळें इतर पात्रांच्या स्वभावपरिपोषाची पार्श्वभूमि त्या मानानें अपुरी वाटते. एक तरुण आणि एक तरुणी यांचें परस्परांवर गाढ प्रेम असतें. परिस्थितीच्या पोलादी पकडीमुळें दोघांसहि एकमेकांशीं विवाहबद्ध होतां येत नाहीं. त्या तरुणीचें दुसऱ्याशींच लग्न होतें आणि त्यामुळें तीन जीवांच्या आयुष्याची राखरांगोळी होते. समाजांत प्रत्यहीं आढळून येणारी ही परिस्थिति आहे, त्यामुळें वाचकाला कथाभागाशीं सहज समरस होतां येण्यासारखें आहे. सामान्यत्वेंकरून पारंपारिक आणि भित्र्या वाचकांना जबरदस्त धक्का देणारी एक घटना या कथेंत आहे ती

हीं कीं, पत्नी आपल्या पूर्वीच्या प्रणयसंबंधाची हकीकत आपल्या पतीला कळविते. प्रथम तो रागावतो पण मागाहून त्याला कींव येते आणि नंतर तो पति तिच्या प्रियकराला तिच्याकडे आणून भेटवितो. तथापि, त्या प्रियकराचें लग्न ठरलें आहे अशी तिची गैरसमजूत झाल्यानें ती आत्महत्त्या करते. अशा रीतीनें ' लग्नाचा फांस ' हा तिच्या मृत्यूचा फांसच ठरतो. ' उपभोगाच्या लालसेनें उत्पन्न झालेलें प्रेम हें त्यागाच्या पायावर उभारलेल्या प्रेमापुढें केव्हांहि हिणकसच ठरणार ! ' हें वाक्य या कादंबरीचें मेरुवाक्य समजावयाला हरकत नाहीं. कादंबरींतील निरनिराळ्या पात्रांचें स्वभावचित्रण पुष्कळसें कौशल्यानें चितारलेलें असून संवाद थोडेसे नाटकी थाटाचे व पाल्हाळिक वाटत असले तरी अत्यंत आकर्षक आहेत. हिरा आणि माधव यांच्या भेटींतला प्रसंग कित्येकांना अनैसर्गिक वाटण्याचा संभव आहे. ' मी लग्न झालेली सौभाग्यवती नसून लग्न झालेली कुमारिका आहें ! ' ही नायिकेनें पत्करलेली भूमिका अत्यंत धीटाईची आणि निर्भय आहे. तथापि त्यामुळें तिच्याबद्दल वाचकांच्या मनांत उत्पन्न झालेल्या आशा तिच्या आत्महत्त्येमुळें विफल होतात. विवाहानें बद्ध होऊनहि ज्या व्यक्तीवर आपलें निस्सीम प्रेम आहे तिची प्रेममय मानसपूजा करून स्त्रियांना आपलें आयुष्य कंठतां येईल किंवा काय हा एक महत्वाचा प्रश्न या कादंबरींत उत्पन्न झालेला आहे. अर्थात् घटस्फोटाच्या पुरस्कर्त्यांच्या दृष्टीनें तो गौण असला तरी कांहीं ध्येयनिष्ठ व्यक्तींना तरी चिंतनीय वाटण्यासारखाच आहे. या कादंबरींतील महत्त्वाचें वैशिष्ट्य म्हणजे तिची प्रासादिक भाषा आणि अगदीं घरगुती स्वभावाचे प्रसंग. हिंदुसमाजांतील मध्यमवर्गाचें चित्र या कादंबरींत उत्तम प्रतिबिंबित झालेलें आहे. आपल्या अपत्यासाठीं प्रत्यहीं मनाची कुचंबणा पावणाऱ्या मातृहृदयाचें करुणपूर्ण आविष्करणहि या कादंबरींत केलेलें आढळून येईल. घरांतील श्रीखंडपुरीचें जेवण सोडून बाहेर कुळथाचें पिठलें खाणाऱ्या गोविंदरावासारख्या पतिराजाचें चित्रहि यांत पहावयास मिळेल.

या कादंबरींतील पात्रांचें आणि तिच्यांत उत्पन्न केलेल्या प्रश्नांचें अधिक विश्लेषण करणें आवश्यक होतें. तथापि कार्यबाहुल्यामुळें तसें करतां येत नाहीं याबद्दल खेद वाटतो.

एवंच, श्री. अभ्यंकर यांची ही सामाजिक नवलकथा हृद्य आणि उद्बोधक असून मराठींतील विवाहविषयक कादंबऱ्यांत तिनें एक अमूल्य भर पडेल असें माझें मत आहे. वाचकांकडून तिचा यथायोग्य सत्कार होईल अशी आशा आहे.

२७ एप्रिल १९३९
सारस्वत वसाहत
पुणें.

प्रल्हाद केशव अत्रे

# आभार

'खरा वारकरी' ही माझी पहिली कादंबरी प्रसिद्ध होऊन आज आठ वर्षें झालीं. कारणें कांहीहि असली तरी एवढ्या दीर्घ अवधींत माझें एकहि पुस्तक प्रसिद्ध होऊं शकलें नाहीं हें खरें आहे.

माझी ही कादंबरी प्रसिद्ध होण्यास मेसर्स टी. वाय. फडके ॲन्ड सन्स-चालक-रत्नागिरी बुक डेपो, हेच मुख्यत: कारणीभूत आहेत. त्यांनीं या कादंबरीच्या प्रकाशनाचें काम आपल्या अंगावर घेतलें याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

दे. भ. आचार्य प्र. के. अत्रे यांनीं आपला अमूल्य वेळ खर्चून या कादंबरीसाठीं प्रस्तावना लिहून दिली याबद्दल त्यांचे आभार मानण्यास माझ्याजवळ शब्दच नाहींत.

सदर पुस्तकाच्या छपाईचें काम सुंदर प्रकारें केल्याबद्दल जयसिंग प्रि. प्रेसचे प्रोप्रायटर्स मेसर्स जावकर ॲन्ड सन्स् व इतर बंधुतुल्य सहकारी या सर्वांचा मी आभारी आहें.

माझ्या कनिष्ठ परिस्थितींतहि माझ्यावरचा आपला लोभ ज्यांनीं कायम ठेवला त्यांचा तर मी कायमचाच ऋणी आहें.

फडके वाडी, विठ्ठलभाई पटेल रोड, मुंबई ४.
ता. ५-५-३९

वाचकांचा नम्र,
ना. रा. अभ्यंकर

## माधव—



"बरं हो अगदीं ! एवढ्या माझ्या व्याख्या म्हणून घ्यायला सुद्धां तुला वेळ नाहीं ना ? आपला तेवढा अभ्यास झाला म्हणजे झालं ! असा कितीसा वेळ मोडणार आहे तुझा माझ्या एवढ्या दोन व्याख्या म्हणून घेतल्यास तर ?"

"असं काय बरं यमूताई ? मी तुझ्याशी आजपर्यंत कधीं तरी खोटं बोललों आहें का ? मला जर एवढा वेळ फुकट दवडतां येण्यासारखा असता—"

"माझा अभ्यास घेणं म्हणजे आपला वेळ फुकट दवडणंच वाटतं ना तुला ?"

"किती उतावळी आहेस तूं यमूताई ? तूं मला पुरतेपणीं बोलूंसुद्धां देत नाहीस ! उद्यांपासून माझी वार्षिक परीक्षा सुरूं होणार–मला माझाच अभ्यास करायला पुरेसा वेळ नाहीं ! मग तुझा अभ्यास घेत बसण्यांत वेळ खर्च करून माझं कसं चालेल ? तुमच्या शाळेंत दिपोटी यायचे असले म्हणजे तुम्हांला सुद्धां नाहीं का अभ्यास करावा लागत ?"

"हो–पण आमचा अभ्यास कच्चा असतो म्हणून आम्हांला तो करावा लागतो. तुमची गोष्ट काहीं आमच्यासारखी नाहीं. तुझा अभ्यास नेहेमीं झालेलाच असतो. आई तर नेहेमीं तुझी वाहवा करीत असते. ती नेहेमीं म्हणते कीं, माधवाची शाबास आहे ! त्याचा नंबर आपला नेहेमीं पहिला ठरलेला !"

"ती उगाच तसं म्हणते झालं ! तुझ्या आईला मी आवडतों, म्हणून ज्याच्या त्याच्याजवळ ती माझी स्तुति करीत असते. उद्यांच्या परीक्षेची तर मला फारच भीति वाटते आहे. अलीकडे माझा बराचसा वेळ खेळांतच जाऊं

लागला आहे, त्यामुळें परीक्षेबद्दल मनाला खात्री अशी कशी ती वाटतच नाहीं. आज आणि उद्यां सकाळीं कांहीं वाचलं तर काहीं तरी गाडं निभावेल, नाहींतर फजितीला पारावार उरणार नाहीं!"

"मग नाहीं ना घेत तुम्ही आमच्या व्याख्या?"

"असा काय बरं हट्ट करावा यमूताई? मी तुला पुन्हा पुन्हां सांगत असतां, तुझी समजूतच पटत नाहीं याला काय म्हणावं? तूं शहाणी ना?"

"मी नाहीं जा शहाणी—तूंच शहाणा आहेस! मी आपली वेडीच! हो—आमचं काय जातं? आम्ही मुळीं आजपासून तुमच्याशीं कधीं कधीं बोलणारच नाहीं—"

"अरे बापरे! इतका का आमचा राग आला तुम्हांला? मग काय करणार बुवा? आम्हांला तुमच्या व्याख्या म्हणून घेतल्याच पाहिजेत! उद्यां मी नापास झालों तर नानांना तुझं नांव सांगेन कीं, यमूताईनं मला अभ्यास करूं दिला नाहीं म्हणून मी नापास झालों म्हणून! आण तो भूगोल इकडे—"

"नको—नकोच आतां! इतकी अगदी ही कशाला?" असें म्हणून यमू फणकाऱ्यानें आपल्या घरीं निघाली. पण माधवाला तें बरें वाटेना. तो लगेच दारांत येऊन उभा राहिला व तिला अडवून म्हणाला—"यमूताई..."

"दूर हो हां माधव—नाहींतर बघ मी आईला सांगेन—"

"असं काय यमूताई? मी कुठें आज एक दिवस तुझा अभ्यास घ्यायला वेळ नाहीं म्हणून म्हटलं तर तूं माझ्यावर इतकी रागावलीस! म्हणजे आजपर्यंत 'रोज' मी तुझा अभ्यास घेत आलों हें तूं विसरलीसच ना? बरं आहे—मर्जी तुझी! जायचंच म्हणतेस तर जा बापडी! पण मला मात्र त्यामुळें फार वाईट वाटेल एवढं तुझ्या लक्षांत असूं दे—" असें म्हणून माधव बाजूस झाला. यमूनें एकवेळ त्याच्याकडे पाहिलें व आपल्या घरीं निघून गेली. ती आपल्या घरीं पोहोंचेपर्यंत माधव तिच्याकडे पहात होता. त्याच्या डोळयांतून आपोआप

दोन अश्रुबिंदू बाहेर पडले. यमूचा राग येण्याऐवजीं त्याला स्वतःचाच राग आला. तिला आपण उगाच दुखविलें असें त्याला वाटूं लागलें. तो त्या स्थितींत उभा असतांनाच त्याचे वडील गंगाधरपंत भाजी घेऊन घरीं आले.

माधव त्याचा अतिशय लाडका होता. माधव या वेळीं तेरा वर्षांचा असून तो इंग्रजी पांचवींत होता. गंगाधरपंतांना सर्वजण 'नाना' या नांवानें संबोधीत असल्यामुळें माधवहि त्यांना त्याच नावानें हांक मारीत असे. माधव हा त्यांचा सर्वांत वडील मुलगा. त्याच्या पाठीवर त्यांना तीन चार मुलें झालीं होतीं परंतु तीं सर्व अल्पजीवि ठरल्यामुळें माधव हाच त्यांचा जीव की प्राण होऊन बसला.

माधवावर गंगाधरपंतांचें प्रेम असावें यांत कांहीं आश्चर्य नाहीं, कारण त्यांचा तो मुलगाच होता. परंतु माधव सर्वांनाच आवडत असे. रूपानें चांगला असल्यामुळें त्याच्याविषयीं कोणाचाहि प्रथमदर्शनींच चांगला ग्रह होई. त्यात आणखी त्याचे गुण प्रत्ययाला आले म्हणजे तर विचारायलाच नको ! वय इतकें लहान असून समजूतदारपणा किती ! चार मोठीं माणसें जमलीं म्हणजे त्यांचें बोलणें ऐकण्यासारखें असलें तर तें ऐकत तो एका बाजूला बसावयाचा. पण त्यांच्या कांहीं तरी वायफळ गप्पा सुरू झाल्या म्हणजे लगेच तो तेथून निघून जायचा ! स्वभावानें अतिशय मनमिळाऊ आणि गरीब. कोणालाहि कोणत्याहि कारणानें दुःख झालेलें त्याला पहावत नसे. त्याचें अंतःकरण कोमल व प्रेमळ असलें तरी वृत्ति भेकड नसल्यामुळें त्या दुःखिताचें दुःख दूर करण्याचा तो आपणाकडून शक्य तितका प्रयत्न करी. आतां, त्याच्या वयाच्या मानानेंच त्याचे प्रयत्न असणार ! पण अशी बुद्धि तरी सर्वांच्या ठिकाणीं असतेच असें नाहीं. यावेळीं तो यमूचा अभ्यास घेऊं शकला नाही, यांत वास्तविक त्याची कांहींच चूक नव्हती. पण आपली कांहीं चूक नसली व आपलें कारणहि सबळ असलें तरी यमूचा आपल्यामुळें हिरमोड झाला या विचारानें त्याला वाईट वाटूं लागलें.

गंगाधरपंतांची सांपत्तिक स्थिति सामान्य होती. कोणत्याहि कारणानें दुसऱ्यापुढें तोंड वेंगाडण्याचा प्रसंग त्यांच्यावर येत नसे. याला, त्यांची स्वतःची

टापटिपीची व निर्व्यसनीरहाणी हें एक कारण असलें तरी त्यांच्या पत्नीची—पार्वती-बाईंची—व्यवहारकुशलता हेंच मुख्य कारण होतें. नाहीं तर आपल्या पतीच्या सांपत्तिक परिस्थितीचा कांहींहि विचार न करतां आपणांला चारचौघांत श्रीमंत म्हणून मान मिळावा अशा क्षुद्र बुद्धीनें नवऱ्याला धुळीचे दिवे लावावयास लावून गृहिणीपदाचा टेंभा मिरविणाऱ्या स्त्रिया समाजांत कांहीं थोड्या थोडक्या आढळत नाहींत ! परंतु पार्वतीबाई यथार्थ सुगृहिणी होत्या. गंगाधरपंतांवरहि कधीं कधीं हलाखीचे प्रसंग येत असत. परंतु अशा प्रत्येक प्रसंगीं आपल्या पतीचें मन आपल्या जळफळाटानें दुखविण्याचें पातक तर पार्वतीबाईच्या हातून कधीं घडलें नाहींच पण उलट आपल्या शांत व आनंदी वृत्तीनें आलेल्या अडचणींचा पतीला विसर पाडण्याचें पुण्यच त्यांच्या हातून घडलें. अशा प्रकारचें उत्तम गृहसौख्य लाभलें असल्यामुळें गंगाधरपंतांना, आपल्याला चार पैसे कमी मिळतात याचा कधीं विषाद वाटत नसे.

ते येतात तों माधव खिन्न मुद्रा करून दारातच उभा असलेला त्यांच्या दृष्टीस पडला. माधवाचा असा पडका चेहेरा पहाण्याचा प्रसंग त्यांच्यावर क्वचि-तच येत असे. कारण माधव हा जात्याच खेळकर व आनंदी वृत्तीचा असे. घरांत त्याचें कांहीं बिघडलें असण्याचाहि संभव नव्हता. मग याला वाईट तरी कशाबद्दल वाटतें ? एकदम माधवालाच विचारण्यापेक्षां घरांतच अगोदर चौकशी केलेली बरी असें ठरवून त्यांनीं त्याविषयीं पार्वतीबाईंना विचारलें. परंतु माधव आणि यमू थोड्या वेळापूर्वी एकमेकांशीं कांहीं बोलत होतीं यापलीकडे त्यांना कांहींच सांगतां येईना. गंगाधरपंत बाहेर आले तरी माधव यमूच्या घराकडेच पहात उभा होता व अजूनहि त्याची मुद्रा हिरमुसलेलीच दिसत होती. गंगाधर-पंतांनीं त्यालाच काय तें विचारण्याचें ठरविलें.

“ कां रे माधव ? तुझा चेहेरा आज असा उतरलेला कां दिसतो आहे ? ”

माधव आपल्याच तंद्रींत असल्यामुळें गंगाधरपंत घरीं आले हेंहि त्याला माहीत नव्हतें. म्हणून त्यांचा प्रश्न ऐकतांच तो गोंधळल्यासारखा झाला. आपल्या

मनांत चाललेले विचार नानांना समजूं नयेत या हेतूनें त्यानें आपला चेहेरा शक्य तितका निर्विकार करण्याचा प्रयत्न केला. पण त्यांत त्याला यश येणें शक्यच नव्हतें. आपल्या मनात चाललेले विचार दुसऱ्यापासून छपवून ठेवण्याचें कौशल्य त्या एवढयाशा मुलाच्या अंगीं कुठून असणार? आणि शिवाय तो बेसावध असतांना त्याला कशाबद्दल तरी वाईट वाटत आहे हें गंगाधरपंतांनीं ओळखलेलेंच होतें. खोटें बोलून नानांना फसवावें म्हणून नव्हे तर त्यांनीं विचारलेल्या प्रश्नाला कांहीं तरी उत्तर द्यावयाचें म्हणून तो म्हणाला, " नाही बुवा—कुठें?—कांही नाहीं—"

"माधव, असा भांबावूं नकोस. इकडे येऊन बस बरं," असें म्हणून गंगाधरपंतांनी त्याला चटईवर आणून बसविलें. "हं, सांग बरं आतां तुला कसलं इतकं वाईट वाटतं आहे ते. सांग, अगदी संकोच करूं नकोस. मी तुझ्यावर कधींसुद्धां रागावत नाहीं हें तुला माहीत आहे ना?"

माधव कांहींच बोलत नाहींसें पाहून गंगाधरपंत पुढें बोलूं लागले, " असं काय बरं माधव? मी तुला तीनतीनदां विचारतों आहें आणि तूं कांहींच बोलत नाहींस! हें तुला बरं वाटतं का? अगदीं काहीहि झालेलें असूं दे, तें मला खुशाल मनमोकळेपणानं सांग. मी तुझ्यावर कधीं रागावत नाहीं हें तर तुला माहीतच आहे. पण मी तुला आणखी असं आश्वासन देतों कीं, शक्य तर तुझ्या मनाचं समाधान करण्याचाच मी प्रयत्न करीन. पण काय झालं तें तूं मला सांगितलंसच नाहीं तर मला काय करतां येणार? तुला दुःखी पाहून माझ्या मनाला फार आनंद होत असेल, नाहीं? तूं मला काय झालं तें सांगितल्याशिवाय मला चैन पडणार नाहीं. मग काय? नाहींच ना सांगत तूं मला काय झालं तें?"

आतां माधवाला स्वस्थ रहावेना.

" नाना—" असें म्हणून त्यानें बोलण्यास सुरुवात केली, पण पुनः त्याला अडल्यासारखें झाले.

" सांग–सांग काय तें. असा अडखळतोस कां ? "

" नाना, ती यमू किनई आत्तां इथं येऊन मला आपल्या व्याख्या म्हणून घ्यायला सांगत होती. पण माझी उद्यांपासून परीक्षा असल्यामुळें मी तिला वेळ नाही म्हणून सांगितलं. तेव्हां ती माझ्यावर रागावली आणि मी तिचा अभ्यास घ्यायला तयार झालों तर ' आतां कशाला ? काहीं नको–मी आतां तुझ्याशीं कधीं बोलायचीच नाहीं, ' असं म्हणून ती माझ्यावर रागावून निघून गेली. "

" हात्तिच्या ! याचंच का तुला इतकं वाईट वाटलं ? असल्या क्षुल्लक गोष्टीला भलतंच महत्त्व देऊन आपल्या मनाला वाईट वाटून घेण्याइतकं तुझं वय आतां लहान राहिलेलं नाहीं. आतां आणखी दोन वर्षांनीं तूं मॅट्रिक होणार–म्हणजे तूं आपली बाल्यावस्था संपवून तारुण्यावस्थेंत जाण्याच्या संधिकालांत आहेस. अशा वेळीं तुझ्या अंगीं असणाऱ्या बालिश विकारांचा नाश करून तारुण्यातील बलिष्ठ विकारांचाच तुला सराव करून घेतला पाहिजे. असल्या बारीकसारीक गोष्टींनीं मनाला धक्का बसवून घेण्याची संवय जर तूं आत्तांच मोडून टाकली नाहींस तर पुढें जेव्हां तुझ्यावर विशेष जबाबदारी येऊन पडेल आणि त्यामुळें बिकट संकटांना तोंड देण्याचा प्रसंग तुझ्यावर येईल तेव्हां तुला फार जड जाईल. म्हणून एव्हांपासूनच आपलं मन तयार करून ठेवण्याचा अभ्यास तुला केला पाहिजे. आलं का लक्षांत तुझ्या, मी काय म्हणतों तें ? "

" नाना, माझ्यामुळें दुसऱ्या कोणाला वाईट वाटलं तर त्याबद्दल माझ्या मनाला दुःख झाल्याशिवाय रहातच नाहीं, त्याला काय करायचं ? "

" दुसऱ्याचं दुःख पाहून मन द्रवणं हा सद्गुण आहे यात शंका नाहीं. कोणी याला मनाचा हळवेपणा मानीत असले तरी मी याला प्रेमळपणाच समजतों. तरी सुद्धां, दुसऱ्याला होणाऱ्या दुःखांत आपण कितीसे जबाबदार आहोंत याचा विचार अवश्य केलाच पाहिजे. एकादा आंधळा पाहिला तर आपणाला त्याची दया येते. पण त्याच्या त्या दुःखाचा भार, आपण आपले डोळे फोडून घेतले म्हणजे का हलका होणार आहे ! तो आंधळा आहे याला आपण कारण आहोंत

कीं काय, याचा विचार नको का करायला ? नाहीतर उभ्या आयुष्यांत आपल्या मनाला क्षणभरहि प्रसन्नता मिळणं मुष्किलीचं होईल. आतांचीच गोष्ट पहा ना ! आजपर्यंत तूं नेमानें यमूचा अभ्यास घेत आलास. पण उद्यांपासुन तुझी वार्षिक परीक्षा सुरू होणार असल्यामुळें तुला तिचा अभ्यास घेतां आला नाहीं. तसं तूं तिला सरळ सांगितलंस, पण तिचं अगदींच पोरवय असल्यामुळें तूं सांगितलेलं कारण खरं आहे कीं खोटं आहे याचा सुद्धां तिनें विचार केला नाहीं. हां—आतां तूं तिला एखादी थाप ठोकून दिली असतीस तर गोष्ट निराळी होती. तुझं कारण अतिशय महत्त्वाचं व खरं असून सुद्धां तिच्या समजुतीसाठीं तूं तिचा अभ्यास घ्यायला अखेर तयार झालासच; तरी तिनें आपला राग सोडला नाहीं आणि ती निघून गेली ! मग आतां तूंच आपल्या मनाशीं नीट विचार कर बरं की, या प्रकरणांत तिच्या रागाला किंवा वाईट वाटण्याला तूं कितीसा जबाबदार आहेस ? ”

“ नाहीं—यांत मीं मुळींच जबाबदार ठरत नाहीं. पण तरी सुद्धां मला वाईट वाटल्याशिवाय रहात नाहीं.”

“ वा: ! म्हणजे हा तर जवळजवळ वेडेपणाच म्हणायचा ! आपली कांहींहि चूक नसतांना आपण आपल्या मनाला वाईट वाटून घ्यायचं म्हणजे काय ? ”

“ नाना, दुसरं कोणी निष्कारण माझ्यावर रागावलं असतं तर त्याकडे मी विशेषसं लक्ष दिलं नसतं व तें केव्हांच विसरूनहि गेलों असतों. पण माझ्यावर या वेळीं रागावलेली व्यक्ति यमूताई आहे ही गोष्ट मला विसरतांच येत नाहीं. माझ्यावरील तिचा राग नाहींसा झाला आहे अशी माझी खात्री झाल्याशिवाय माझ्या मनाला चैन पडणार नाहीं. ”

“ अरे, यमूताई झाली म्हणून काय झालं ? ती तुझ्यावर निष्कारण रागावली आहे हें जर तुला माहीत आहे तर त्याबद्दल तुला वाईट वाटून घेण्याचं कारण काय ? हा तिनं तुला धडाच शिकविला आहे म्हणेनास ? या स्वार्थी जगांत

असले प्रसंग वारंवार येतच असतात. आपणाकरितां नेहमीं कष्ट घेणारा मनुष्य एखादे वेळीं कांहीं सबळ कारणामुळें आपल्या उपयोगीं पडूं शकला नाहीं तर पूर्वी त्यानें आपणासाठीं सहन केलेला त्रास विसरून केवळ त्या क्षणाकडेच लक्ष देऊन त्याच्यावर रागवायचं, असा स्वार्थी दृष्टीच्या माणसांचा प्रघातच असतो. इतके दिवस यमूताईला तूं नीटशी ओळखली नव्हतीस. पण आजच्या तिच्या वागणुकीमुळें ती कोणत्या प्रकारची मुलगी आहे याची, तुझ्यासारख्या हुषार मुलाला परीक्षा करणं कांहीं कठीण नाहीं. तेव्हां असल्या स्वार्थी माणसांच्या रागालोभाची आपण फारशी पर्वा बाळगतां कामा नये."

"नाहीं, नाना ! यमूताई निव्वळ स्वार्थी दृष्टीनें माझ्यावर रागावली असेल असं मला वाटत नाहीं. तिला मी फार आवडतों हें तुम्हांलाहि माहीत आहे. जें मनुष्य आपल्याला फार आवडतं त्यानं एखादी गोष्ट आपल्या मनासारखी केली नाहीं कीं, आपणांला अतिशय वाईट वाटतं. तेव्हां यमूताईला माझा राग आला याच्या मुळाशीं तिला माझ्याविषयीं वाटत असलेला आपले-पणाच असला पाहिजे; आणि आपणाबद्दल प्रेम वाटत असणाऱ्या व्यक्तीच्या मनाविरुद्ध आपल्या हातून जर एखादी गोष्ट घडली आणि ती जरी सकारण असली तरी आपल्या मनाला हुरहुर लागतेच. आतांचीच गोष्ट पहां ना ! यमूताईला मी तिच्या व्याख्या म्हणून घ्यायला मला वेळ नाहीं म्हणून सांगितलें पण स्वस्थ बसण्यांत आणि तुमच्याशीं बोलण्यांत मी किती वेळ घालविला ? मग तेवढ्या अवकाशांत मला तिच्या तेवढ्या व्याख्या नसत्या का म्हणून घेतां आल्या ?"

"बरं, जाऊं दे बरं तें आतां ! तुला उद्यांचा अभ्यास करायचा असेल ना ? मग आतां उगाच बोलत बसून किंवा झाल्या गोष्टीबद्दल विचार करीत बसून आणखी वेळ फुकट घालवूं नकोस," असें म्हणून गंगाधरपंत स्नानाला निघून गेले. माधवहि आपलें डोकें अभ्यासांत खुपसून बसला. पण त्याचा उपयोग काय ? आपण यमूताईकडे जावें आणि तिची समजूत घालण्याचा प्रयत्न करावा असें त्याला एकसारखें वाटत होतें. पण नाना येण्यापूर्वीच आपण तसें करायला

पाहिजे होतें असा त्यानें विचार केला. कारण नानांनीं आपणास हा विषय विसरून जाण्याबद्दल परोपरीनें सांगितलें असतां, आपण त्यांच्या उपदेशाच्या विरुद्ध आचरण करणें म्हणजे त्यांचा मान तो काय राहिला, असा त्याला विचार पडला. तिची समजूत घातल्याखेरीज आपल्याला बरें वाटणें शक्य नाहीं हें खरें असलें तरी तें नानांना समजूं देणे इष्ट नाहीं असें वाटल्यावरून त्यानें आपला चेहेरा शक्य तितका निर्विकार केला.

गंगाधरपंत स्नान करूं लागतांच पार्वतीबाई बाहेर आल्या. त्यांनीं मघांचा दोघांचा संवाद स्वयंपाकघरांतून ऐकलाच होता. त्या माधवाजवळ आल्या आणि "मी करीन हो तिची समजूत–तूं अगदीं स्वस्थ रहा," असें त्यांनीं त्याच्या कानांत सांगितलें. माधवाची मुद्रा लगेच प्रफुल्लित झाली. आपल्याप्रमाणेंच आपल्या आईलाहि यमूताई फार आवडते हें त्याला माहीत होतें आणि आईनें तिची समजूत घातली म्हणजे यमूताईचा आपल्यावरील राग नाहींसा झाल्याशिवाय रहाणार नाहीं, अशी त्याला खात्री वाटत होती.

"खरंच तूं तिची समजूत घालशील ना? कीं विसरून जाशील? ती माझ्याशीं पूर्वीसारखी हंसूं खेळूं लागल्याशिवाय मला कांहीं चैन पडणार नाहीं."

"आज मधल्या सुट्टींत ती घरीं आली म्हणजे मी तिला खायलाच इकडे बोलावीन. तूं अगदीं खुशाल एकचित्तानं आपल्या अभ्यासाला लाग. आज संध्याकाळीं तूं शाळेंतून घरीं येतोस तों ती तुझ्याशीं नेहेमींसारखी हंसतांना खेळतांना दिसल्याशिवाय रहाणार नाहीं. आतां झालं ना तुझ्या मनाचं समाधान?"

"होय आई. तूंच अशी हमी घेते आहेस म्हणूनच मला विश्वास वाटतो आहे. आपला अजून तोच विषय चालला आहे हें नानांना समजलं तर ते कदाचित् आपल्यावर रागावतील. त्यांची आंघोळ एव्हांना झालीहि असेल. तूं जा आतां. मात्र दुपारीं यमूताईला आपल्याकडे बोलवायला विसरूं नकोस हं—"

गंगाधरपंत स्नान आटोपून येतात तों माधव अभ्यासांत गर्क झालेला त्यांना दिसला. आपल्या उपदेशाचा आपल्या मुलाच्या मनावर आपल्या इच्छेप्रमाणें

परिणाम झाला याचें त्यांना कौतुक वाटलें. आपला मुलगा या वयांत जर इतका समजूतदार आहे तर मोठेपणीं हा आपल्या कुळाला धन्य केल्याशिवाय रहाणार नाहीं, असें त्यांना वाटूं लागलें.

माधव पुढें कुळाला धन्य करण्याइतका थोर होईल असा अंदाज बांधण्याइतकें माधवानें काय करून दाखविलें होतें? पण आंधळे प्रेम तें हेंच. माधवाइतका हुषार आणि सद्गुणी मुलगा सर्व जगांत तरी सांपडेल की नाहीं याची गंगाधरपंतांना शंका वाटत होती. त्यांनीं जेवण उरकले व ऑफिसची वाट धरली.



यमू—

# २

यमू माधवाकडून जी फणकाऱ्यानें निघाली ती आपल्या आईला येऊन बिलगली. निघतांना ती माधवावर रागावून निघाली पण आईला भेटल्यावर तिला एकमारस्में रडूंच येऊं लागलें. रमाबाईंना कळेचना ही काय भानगड आहे तीं! दररोज सकाळीं आपली यमू कोल्हटकरांच्या माधवाकडे अभ्यासाला जाते हे त्यांना माहीत होतें. तेथें तिनें कांहीं बिघडलें असण्याचा कांहींच संभव नव्हता. मग हुंदके देण्याची पाळी येईपर्यंत हिला झालें तरी काय? त्यांना एकदां आपल्या पतिराजांचा संशय आला. कारण गोविंदरावांना यमूविषयीं कितीसें प्रेम वाटतें याची त्यांना पूर्ण जाणीव होती. यमू एवढेंच त्यांचें अपत्य. यमू जन्माला येण्यापूर्वी रमाबाईंवर गोविंदरावांचें अतिशय प्रेम होतें. पण यमूचा जन्म झाला आणि सर्व नूर एकदम पालटला. गोविंदराव रमाबाईंचा तिरस्कार करूं लागले व त्या तिरस्काराचेंच रमाबाईंची व यमूची हेळसांड होण्यांत पर्यवसान झालें.

गोविंदरावांजवळ थोडीफार वडिलोपार्जित जिंदगी होती. स्वस्थ बसून सारें आयुष्य काढण्याची त्यांची इच्छा असती तरी ते मीठभाकरीला महाग नव्हते. परंतु मीठभाकरींत समाधान मानण्याइतके ते अल्पसंतुष्ट नव्हते. सुदैवानें त्यांना नोकरीहि बऱ्यापैकीं मिळाली होती. त्यांचें शिक्षण कांहीं फार झालेलें नव्हतें. त्यांच्याशीं तुलना करतां गंगाधरपंतांचें शिक्षण पुष्कळच झालेलें होतें. असें असूनहि एकाच ऑफिसांतील या दोघां कारकुनांत गोविंदरावांस गंगाधरपंतांच्या तिप्पट पगार मिळत होता. हल्लींच्या काळांत द्रव्यप्राप्तीशीं पराक्रमाचा फारसा

संबंध नसतो, त्याचप्रमाणें अक्कलेचा किंवा शिक्षणाचाहि फारसा संबंध असतोच असें नाहीं. निदान चालू युगात तरी द्रव्यप्राप्ति ही बहुश: नशीबाच्या बळावरच होत असते. शिक्षण व बुद्धि यांत गंगाधरपंत श्रेष्ठ असले तरी नशीबाच्या सामर्थ्यांत गोविंदराव त्यांना नक्कीच भारी होते.

आपल्या पतिराजानींच यमूला रडवून आपला पराक्रम गाजविला असावा अशी रमाबाईंना शंका आली खरी पण लगेच, ते अजून बाहेरून परत आले नसल्याचें त्यांच्या लक्षांत आलें. ते बाहेरून येतील त्यावेळीं त्यानीं यमूला रडतांना पाहिलें तर तिच्यावर मार खाण्याचा प्रसंग ओढवेल ही रमाबाईंची खात्री असल्यामुळें त्या तिची हळुहळू समजूत घालण्याचा प्रयत्न करूं लागल्या. वेळेवर स्वयंपाक तयार करण्याची जबाबदारीहि त्यांच्यावर होतीच.

" काय झालं यमू तुला एकदम असं रडायला ? "

" आई, किनी मी माधवकडे गेलें होतें माझ्या व्याख्या म्हणून घ्यायला, तर तो मला वेळ नाहीं म्हणून म्हणाला ग ! "

" हात्तिच्या ! एवढंच ना ? मग यांत एवढं रडायला काय झालं ? मला दे तें पुस्तक, मी घेतें तुझ्या व्याख्या म्हणून ! "

" अग, पण मला म्हणून नाहीं काहीं रडूं येत ! तो म्हणाला कीं, उद्यां माझी परीक्षा आहे व म्हणून माझाच अभ्यास मला करायचा आहे. त्याचा अभ्यास झालेला नसला तर नको का ग त्याला तो करायला ? त्यांत त्यानं खोटं तें काय सांगितलं ? पण मी त्याच्यावर रागावलें आणि ' आतां कांहीं नको जा–आम्ही मुलीं तुमच्याशीं कधीं बोलणारच नाहीं, ' असं म्हणून मी त्याची गट्टी फू केली. त्याला वाईट वाटलं आणि त्यानं अगदीं वाईट चेहेरा केला. मी त्याची गट्टी फू केली म्हणून त्याला वाईट वाटलं आणि त्याला वाईट वाटलं म्हणून मला रडूं येऊं लागलं ! "

" बरं–बरं, मी घालीन हो माधवची समजूत ! त्याला आत्तांच सांगूं का ? "

यमू—

" आत्तां कशाला ? त्याला त्याचा अभ्यास करायचा आहे ना ? "

" बरं–मग केव्हां तरी ! आता अगोदर रडणं बंद कर पाहूं. माझ्यावर तुझा विश्वास आहे ना ! "

" हो–पण अगदी आजच्च ना ? "

" हो हो–अगदीं आजच बरं. आतां जा बाहेर आपला अभ्यास करीत बस. घरीं यायची वेळ झाली हो आतां—"

' घरीं यायची वेळ झाली ' हे शब्द रमाबाईच्या तोंडून बाहेर पडतांच यमूनें आपलें रडें एकदम थांबविलें. तिचा चेहेरा गंभीर झाला. काका घरीं आले आणि जर त्यांनीं आपले तोंड दुर्मुखलेलें पाहिलें तर आपली कांहीं धडगत नाहीं हे तिला माहीत होतें. इतक्यांत गोविंदरावांची स्वारी आलीच. आपल्या सोंगाची बतावणी करावयाची म्हणजे चेहेरा नुसता गंभीर करून भागणार नाहीं अशा विचारानें तिनें तो शक्य तितका हंसरा केला.

" अं ? असे दांत काढायला काय झालं ? शाळेंतला अभ्यास झाला का सगळा ? घरांत मोडफोड करून माझी सारखी नुकसानी चाललीच आहे आणि प्रत्येक यत्तेत दोनदोन चारचार वर्षं रखडून तुम्हीहि आमचा सूड उगवा ! शाळेंतून नांव काढून टाकलं तर तिकडूनहि लोक बोलणार ! एक तर मुलगी पण तिला शिकविण्याचं सुद्धां झालं नाहीं म्हणतील यांच्याकडून ! पण यांचे बाप येताहेत का इकडे फी भरायला आणि एकसारखी पुस्तकं घ्यायला ? आज काय पाटीच फुटली, उद्यां पेन्सिलच हरवली आणि परवां गाण्याचंच पुस्तक फाटलं ! एक ना दोन ! लोकांना हें कांहीं दिसतं का ? त्यांना फुकटचं बोलायला काय होतं ? इकडे टांके ढिले होतात आमचे ! " असें म्हणून त्यांनीं स्वयंपाक-घरांत डोकावून पाहिलें. रमाबाई कणीक मळीत होत्या.

" अजून तुझ्या पोळयासुद्धां झाल्या नाहींत ना ? कंटाळलों बुवा या संसाराला ! तुम्ही मायलेकी लवकरच मला घर सोडायला लावणार ! रोज उठून ही कटकट नाहीं बुवा आपल्याला सहन करवत ! "

" असं काय तें ? आपल्याला गरम हव्या असतात म्हणून मी त्या मुद्दाम भाजायच्या ठेवल्या ! "

" वा–वा–तर! कोणी म्हणेल काय हो, ही आपल्या नवऱ्याची इतकी काळजी घेते आणि हा उगाच दुष्टासारखा हिच्यावर दांतओंठ खात असतो ! तुला जर माझी किंवा माझ्या संसाराची खरोखरच काळजी वाटत असती तर आतापर्यंत तूं अशी कां वागली असतीस ? माझी किंवा माझ्या संसाराची काळजी करणं तर दूरच–पण माझी राखरांगोळी उडविण्यासाठींच तूं आपलं पांढरं पाऊल माझ्या घरांत टाकलं आहेस ! या गोष्टीची साक्ष यमूसारखी परकरी पोरसुद्धां देईल ! "

गोविंदरावांचीं हीं असलीं बोलणीं ऐकण्याची रमाबाईना संवयच झाली होती. त्यामुळें गोविंदरावांच्या या बोलण्याचा त्यांच्यावर कांहीं परिणामच झाला नाहीं. कांहीं न बोलतां त्या पाटपाणी करूं लागल्या.

" पाटपाणी करूं लागलीस ते तुझे कोणी जेवायला यायचे आहेत वाटतं ? "

" काय हे असं बोलायचं ! आपण इतर कांहीं बोललांत तर तें निमूटपणं सहन करायला मी तयार आहें. पण असलं कांहीं तरी बोलणं मात्र मी केव्हांहि मुकाट्यानं ऐकून घेणार नाही ! "

" ऐकून घेणार नाहींस तर काय करणार आहेस ? येऊनजाऊन माहेरीं निघून जाण्याचीच तूं मला भीति घालणार कीं नाहीं ? याहून जास्त तें तूं काय करूं शकणार ? मी तर त्याच गोष्टीची वाट पहातों आहें. कायमचीच जा माहेरीं रहायला. माझ्या मागची ब्याद तरी एकदांची नाहींशी होईल. आत्तां–या घटकेला करूं का तुझी रवानगी ? "

" माहेरीं जाण्याची मला कधीं इच्छासुद्धां होत नाहीं. माझं सासरमाहेर आपणच आहांत ! आपणांला सोडून माझ्याच्यानें एक क्षण तरी राहवेल का ? "

यमू—

" मग माझी अजून आंघोळसुद्धां झाली नाहीं हें तुला माहीत नव्हतं का? मग अगोदर पाट कशाला मांडायला लागलीस ! "

" आपले अजून कपडे निघायचे होते म्हणून मी पाट ठेवायला लागले. पाणी काय, केव्हाच तापून तयार आहे. आपला शर्ट निघाल्याबरोबर पाणी ओतून तयार आहे कीं नाहीं पहावं ! "

आपल्या पतीचे आपल्यावर पहिल्यासारखें प्रेम तर नाहींच पण उलट आपल्याविषयीं त्याला अतिशय तिटकाराच आहे याची रमाबाईंना पूर्ण जाणीव होती. परंतु त्यांच्या तोंडून आपल्या पतीबद्दल तिरस्काराचा किंवा अवज्ञेचा एक शब्दसुद्धां कधीं निघत नसे. रमाबाईंना स्वतःविषयीं फारशी काळजी वाटत नव्हती. कारण देवाब्राह्मणाच्या साक्षीने आपण ज्याच्या गळयांत माळ घातली त्याच्याशी एकनिष्ठेनें वागण्यातच आपल्या जीविताचे सार्थक आहे, असा त्यांचा दृढ विश्वास होता. परंतु आपल्या यमूवर आपल्या पतीचें मुळींच प्रेम नाहीं, उभ्या महिन्यातसुद्धां यमूच्या पाठीवरून त्याचा हात प्रेमानें फिरत नाही याबद्दल त्यांना अतिशय वाईट वाटत असे. आणखी कांहीं वर्षे अशींच गेली म्हणजे त्या बिचारीच्या लग्नाचे काय धिंडवडे निघतील कोण जाणे, या चिंतेने त्यांचें चित्त वारंवार व्याकुळ होई. कारण प्रत्येक पित्याला आपल्या मुलीच्या कल्याणाविषयीं वाटत असलेली आस्था गोविंदरावांच्या ठिकाणीं मुळीच नाहीं हे तर त्याना अगदीं उघडच दिसत होतें. आपला किंवा यमूचा कांहीहि अपराध नसतांना आपणा दोघींना विनाकारण जाच सोसावा लागत आहे याबद्दल त्यांच्या मनाला वाईट वाटत असलें तरी त्यामुळें त्यांच्या पतिनिष्ठेत मात्र कोणत्याहि प्रकारें न्यूनता आली नव्हती. आपल्या पतीला आपल्यावर पूर्ववत् प्रेम करण्याची सुबुद्धि होवो, अशी त्या रात्रंदिवस परमेश्वराची करुणा भाकीत असत. आपल्या पतीच्या मनांत आपल्याविषयींची प्रेमभावना जागृत झाली म्हणजे मग यमूवर प्रेम करण्यास कांहीं त्यांनी मनधरणी करावयास नको हे

त्यांना माहीत होतें. परंतु अखिल विश्वाच्या निराकार परमेश्वराला रमाबाईच्या साकार परमेश्वरापुढें हात टेंकावे लागले होते !

समजूं लागल्यापासून आपल्या बापाच्या तोंडचा एकहि प्रेमळ शब्द ऐकावयास न मिळाल्यामुळें आपल्या बापाचा यमूला लळा लागणें शक्यच नव्हतें. कारण, हा आपला बाप आहे, तो कसाहि असला तरी त्याच्यावर आपण प्रेम केलें पाहिजे एवढी समजूत येण्याइतकें अद्यापि तिचें वयच नव्हतें. बापाविषयीं तिला प्रेम तर वाटत नव्हतेंच पण भीति मात्र वाटत होती. गोविंदरावांचें पाऊल उंबरठ्याच्या बाहेर पडलें म्हणजे तिला कैदेंतून सुटलेल्या कैद्याइतका आनंद होई व त्यांचें पाऊल घरांत पडलें म्हणजे तिला छातीवर धोंडा पडल्यासारखें वाटत असे. बापाविषयीं अशा प्रकारें परकेपणा वाटत असल्यामुळें रमाबाई याच तिच्या सर्वस्व होऊन बसल्या होत्या. आपण शक्य तितक्या तत्परतेनें पतिसेवा करीत असतां आपणाला आपल्या पतीकडून योग्य तो प्रेमाचा मोबदला मिळत नाहीं याबद्दल त्यांना आपल्या पतीचा राग येत नसला तरी त्याबद्दल वाईट वाटल्याशिवाय रहात नसे. ज्या मुलांची बापाकडून आबळ होत असते त्यांची काळजी आई विशेष कसोशीनें घेते. रमाबाईंना यमूची फारच काळजी घ्यावी लागत असे आणि त्यांत त्या यत्किंचितहि कसूर करीत नसत.

आदळआपट करून गोविंदरावानीं कसे तरी दोन घांस पोटांत कोंबले आणि ऑफिसची वाट सुधारली. रमाबाईंनीं आपल्या यमूला पुनः दोन समजुतीच्या गोष्टी सांगून तिला शाळेंत रवाना केली.

गोविंदराव व गंगाधरपंत यांच्या परिस्थितींत अंतर असलें तरी तें, 'कहां राजा भोज और कहां गंगा तेली' इतक्या प्रमाणांत खास नव्हतें. निदान त्या दोघांत बोलण्याचालण्यापुरता तरी संबंध असण्यास कांहीं हरकत नव्हती. परंतु गोविंदरावांचीं सर्वच मतें लोकविलक्षण असल्यामुळें, आपल्यासारख्या लक्ष्मीपुत्रानें या भणंगाशीं बोलणें म्हणजे काय गोष्ट आहे अशा विचारानें ते गंगाधरपंतांशीं एक शब्दहि बोलत नसत. अर्थातच गंगाधरपंतांना, म्हा

इच्छा असतांहि, गोविंदरावांशीं बोलतां येत नसे. कारण तेवढा स्वाभिमान त्यांच्या ठायीं होता. आपण त्यांच्याशीं सभ्य माणसाप्रमाणें दोन शब्द बोलायला जावें आणि तेवढे आपणाशीं परत बोलण्याचेंहि त्यांना प्राणसंकट वाटावें अशी परिस्थिति स्पष्ट दिसत असतांहि असला मूर्खपणा करण्याचें पातक कोणता स्वाभिमानी मनुष्य करील ?

रमाबाई आणि पार्वतीबाई यांचें मात्र फारच सख्य होतें. त्या एकमेकींना बहिणीच मानीत असत. दोघींचे पति आपापल्या कामावर गेले म्हणजे त्या एकमेकींकडे जात येत, गप्पागोष्टी करीत, सर्व कांहीं सुरळितपणें चालत असे. ते दोघे घरीं आले म्हणजे मात्र त्या दोघींची वागणूक अशी असे कीं, त्यांच्या निकट संबंधाबद्दल त्या दोघांना वासहि लागूं नये. पार्वतीबाईना माधव जितका आवडे तितकीच यमूहि आवडे आणि रमाबाईना यमू आणि माधव यांच्यांत तफावत वाटत नसे.

यमू आणि माधव या दोघांच्या शाळा मधल्या सुट्टींत जवळजवळ एकाच वेळीं बंद होत असल्यामुळें दोघेंहि जवळजवळ एकदमच चाळीच्या आवारांत शिरलीं. दोघांनाहि एकमेकांशीं बोलण्याची इच्छा होती, पण त्याचबरोबर त्यांना परस्परांविषयीं शंकाहि वाटत होती. दोघेंहि आतुर होतीं पण त्याचा एकमेकांना पत्ता नव्हता. यावेळीं रमाबाई व पार्वतीबाई पार्वतीबाईच्या घरीं बसल्या होत्या. सकाळीं घडलेल्या गोष्टीबद्दल दोन्ही मुलांची समजूत कशी घालावयाची हें त्या दोघींनीं ठरवून टाकलें होतें. त्याप्रमाणें रमाबाईनीं माधवाला व पार्वतीबाईनीं यमूला आपल्याकडे खाण्यास बोलाविलें. रमाबाईनीं माधवाला व पार्वतीबाईनीं यमूला, ‘ आतां जर तुम्ही एवढ्याशा क्षुल्लक गोष्टीवरून फुरगटूं लागलींत तर उद्यां तुमचं दोघांचं एकमेकांशीं लग्न होऊन तुम्ही संसार करूं लागल्यावर तुमचं कसं जमणार ? ’ असा प्रश्न केला.

झालें—हा एकच प्रश्न ! पण तो त्या मुलांच्या काळजांला जाऊन भिनला ! काय ? आपलें एकमेकांशीं लग्न होणार ? त्या बिचाऱ्या चिमुकल्या जीवांना, लग्न

म्हणजे काय किंवा संसार ही काय भानगड आहे याची कल्पना तरी होती का ? पण या नुसत्या प्रश्नानें त्या दोघाचें इतकें समाधान झाल्यासारखें दिसलें कीं, समजुतीच्या शंभर गोष्टी सांगूनहि तें झालें नसतें. माधव आणि यमू यांना परस्परांची ओढच तशी जबरदस्त होती. त्या ओढींत विषयलालसेचा लेशहि नव्हता—कारण त्यांना विषयाची कल्पनाच नव्हती. असें असलें तरी नवराबायकोला जन्मभर एकत्र रहावयास मिळतें एवढें मात्र त्यांना माहीत होतें. दोघांनाहि आनंद झाला तो या एकाच कल्पनेनें कीं, सारा जन्म आपणांला एकमेकांच्या मैत्रींत घालविण्यास मिळणार ! त्यांच्या त्या आनंदाच्या भरांत त्यांना, आपलें प्रत्यक्ष लग्न झालें नसून आपल्याला फक्त तशा अर्थाचा प्रश्न विचारण्यांत आलेला आहे याचेंहि भान राहिलें नाहीं. दोघांनाहि, एक-मेकांना डोळे भरून केव्हां एकदां पाहूं असें होऊन गेलें आणि आपणांला विचारलेला प्रश्न ही आपली थट्टा नसून ती खरीच गोष्ट आहे याची शहानिशा करून घेण्यासाठीं दोघांनींहि त्या दोघांना हडसून–खडसून विचारलें. यांत आपली फसवणूक नसून या गोष्टीला खरोखरच मूर्तस्वरूप येणार आहे अशी त्या मुलांची त्यांच्या बुद्धीप्रमाणें खात्री पटतांच माधव आणि यमू हंसत बाहेर पडलीं. एकमेकांची दृष्टादृष्ट होतांच मात्र दोघांचेंहि हास्य मावळलें आणि त्यांच्या मुद्रा गंभीर झाल्या. एवढींशीं मुलें तीं ! त्यांना काय वाटलें न कळे, एकदोनच क्षण त्यांनीं एकमेकांकडे पाहिलें पण तेवढ्या वेळांत त्यांनीं एक-मेकांच्या हृदयांतील तंतू छेडून पाहिले. दोघांनाहि, एकमेकांच्या हृदयाच्या आरशांत स्वतःचें प्रतिबिंब दिसलें. एकमेक एकमेकांची प्रतिमा वाटूं लागल्यावर बोलावयाचें तें काम उरलें व त्याचें प्रयोजन तरी काय ? यावेळीं त्यांना काय वाटलें याचें वर्णन करण्याचा प्रयत्न करणें म्हणजे अशक्य कोटींतील गोष्ट शक्य कोटींत आणून बसविण्याचा फोल प्रयत्न करण्यासारखें हास्यास्पद होणार आहे !

कांहीं वेळानें दोघेंहि बरोबरच शाळेंत जाण्यास निघालीं. त्यावेळीं मात्र त्या दोघांनींहि, आपण एकमेकांशीं यापुढें कधींहि भांडावयाचें नाहीं असें ठरवून टाकलें.

यमू—

या गोष्टीला पंधरावीस दिवस झाले. माधव आतां सहावींत गेला होता. त्या तेवढया अवधींत त्या दोघांनीं कितीतरी मनोरे बांधले !

बिचारीं मानवहृदयें ! भावी सुखाचे काल्पनिक मनोरे उभारण्यापलीकडे मानव काय करूं शकणार ? एखादी गोष्ट त्यांना कितीहि उचित व हवीशी वाटत असली तरी ती होऊं देणें किंवा न देणें हें जोंपर्यंत विधीनें आपल्या हातीं ठेविलें आहे तोंपर्यंत ती घडून येईलच असा कोणी भरंवसा द्यावा ? तरी मानवांतहि अशीं खंबीर माणसें निघतातच कीं जीं आपल्या निरपराधित्वानें, मनाच्या खंबीरतेनें व ' प्रेम ' या दैवी गुणाच्या आश्रयानें विधीशींहि टक्कर देतात आणि त्याला कधींकधीं आपल्या पायांशीं लोटांगणहि घ्यावयास लावतात. यमू आणि माधव अजून बालकेंच होतीं. इतक्या उच्च दर्जाला जाऊन पोहों-चण्याची पात्रता त्यांच्या अंगीं होती किंवा नाहीं हें समजण्याला तूर्त कांहीं आधार नाहीं ! !



## ‘ सत्यंबाई ’– ३

गोविंदरावांना एक बहीण होती. तिचें नांव सत्यभामा. सत्यभामाबाईचे पति मुरलीधरपंत हे चांगले सभ्य गृहस्थ समजले जात असून सुखवस्तुहि होते. त्या दांपत्याला सर्व सुखें अनुकूल असूनहि त्या सुखांपासून त्या उभयतांस प्रसन्नता वाटूं नये अशी त्यांची स्थिति होती. कारण संसारसुखाची चढती कमान जें अपत्य तें होण्याची त्यांना कांहींच आशा दिसेना. नवससायास झाले, नेमधर्म झाले, सर्व कांहीं होऊन गेलें, पण अपत्यदर्शन मात्र झालें नाहीं ! सत्यभामाबाईनीं घातलेल्या प्रदक्षिणांनीं कित्येक पिंपळांचे पार, पार झिजल्यामुळें, पुनः बांधण्याची पाळी आली ! मांत्रिकांनी ताईत देऊन पाहिले, पण अपवादाशिवाय नियम सिद्ध होत नाहीं हें सिद्ध करण्यासाठींच कीं काय, हटकून गुण देणाऱ्या ताईतांचाहि अपत्यजननाच्या कामीं कांहींहि उपयोग झाला नाहीं. शेवटीं सर्व बाजूंनीं निराशा झाल्यावर आणखी कांहीं वर्षे देवावर व दैवावर हवाला ठेवून स्वस्थ बसावयाचें व मग एखादा योग्यसा मुलगा दत्तक घ्यावयाचा आणि अशा रीतीनें देवानें नाहीं तर नाहीं, पण निदान मानवानें तरी आपल्याला मुलगा दिला असें आपल्या मनाचें समाधान करण्याचें त्यांनीं ठरविलें.

शेजारणीपाजारणींत सत्यभामाबाईविषयीं बरेच वेळां विषय चालत. एखादे वेळीं सदर विषयास तोंड फुटलें व प्रत्यक्ष सत्यभामाबाई किंवा त्यांच्या बाजूनें एखाददुसरा शब्द बोलणारी त्यांची मैत्रीण त्या बैठकींत हजर नसली म्हणजे त्या सभासदांच्या वाग्गंगेला असा कांहीं पूर यावयाचा कीं, त्यांत नाहीं

नाहीं तें वाहून जावयाचें ! टवाळी करणाऱ्या बऱ्याच होत्या तरी सहानुभूति दाखविणारीहि एखादी शेजारीण असेच ! रंगूबाई म्हणजे 'सत्यंबाई'ची सर्वांत मोठी कैवारीण ! अपत्यजननाच्या कामीं खुद्द 'सत्यंबाई' किंवा 'मुरलीअण्णा' हताश झाले होते, पण रंगूताईचा मात्र आशावाद जबर ! त्यांना आपलें वाटे कीं, योग्य उपाय झाल्यास हा रोग–म्हणजे अपत्याबाबतचा हृद्रोग–नाहींसा होणें काहीं अशक्य नाही ! सत्यंबाईच्या व त्यांच्या पुष्कळदां यासंबंधानें गोष्टी चालत. एक दिवस असाच त्यांचा विषय चालला होता.

"पण मी म्हणत्यें सत्यंबाई, तुम्ही दाखवा ना कां त्यांना हात ? आतांपर्यंत तुमचा थोडा का खर्च झाला ?"

"इश्श ! खर्चासाठी का मी नको म्हणतें ? खर्चाचं काय मेलं ? तो तर रोजच्या रोज वाढतोच आहे. पण माझा मुळी या ज्योतिषी लोकांवर विश्वासच नाहीं !"

"मला तरी मेलं नवलच वाटतं हो तुमचं ! तुमचा आणि ज्योतिषी लोकांवर विश्वास नाहीं हें आतां तुम्हीच म्हणत आहांत म्हणून खरं मानायचं ! सारेच ज्योतिषी मेले खरं सांगतात असं नाहीं हो म्हणत मी ! पण या बाळशास्त्र्यांची आमचा बापू कितीतरी स्तुति करीत होता ! आमच्या बापूसारखा हपिसर माणूस (बापू–रंगूताईचा मुलगा–एका ऑफिसांत जात असे. तेथें त्याला कसलें काम करावें लागत असे हें बिचाऱ्या रंगूताईला काय माहीत ? तिला आपलें एकच माहीत कीं, ऑफिसांत जातो तो हपिसर !) का उगाच स्तुति करायचा आहे ?"

"माझी अगदींच ना नाही त्याला ! पण आपली त्यांची कांहीं ओळख नाहीं, कांहीं नाहीं ! त्यांना एखादा उणाअधिक प्रश्न विचारायचा म्हटला तरी संकोच !"

"त्यांत कशाचा संकोच धरायचा ? मारे वाटेल तसले प्रश्न विचारून त्यांची भंबेरी उडवून टाकायची ! त्यांच्याकडून बरोबर उत्तरें आलीं तर

तुमचीहि त्यांच्या सामर्थ्याबद्दल खात्री होऊन चुकेल. तुमच्या प्रश्नाला उत्तरं देतांना त्यांची तारांबळ उडाली तर अनायासेंच पीडा गेली ! मग सांगू का बापूला उद्यां त्यांना आणायला ? ”

“ तुमचा का शब्द रंगूताई, मला खालीं पाडतां येणार आहे ? आणवा त्यांना उद्यां—इतके प्रयत्न झाले त्यांत हा आणखी एक ! ”

“ तसं नव्हे हो सत्यंबाई. पण माझं म्हणणं इतकंच कीं, ज्योतिषी हा मनुष्य असल्यामुळें, तसं कांहीं होण्यासारखं नसलं तर तो निदान तसं सांगून तरी टाकील ! बरं, यांत कांहीं कोणाचं नुकसान करायचं नाहीं कीं कोंबडं—बकरं कापापुरायचं नाहीं ! झालाच तर आपला. फायदा, नाहीं तर कांहींच नाहीं ! ”

“ बरं चला, जाऊंच या आतां ! आज आले तर एक पाहुणे यायचे आहेत जेवायला. उशीर झाला तर फजितीची पाळी यायची ! ”

“ मग ठरलं ना हें ? म्हणजे तसं सांगतें बापूला—”

सत्यभामाबाई निघाल्याच होत्या. त्यांनीं फक्त मागें वळून पाहिलें व होकारार्थी मान हालविली. ठरल्याप्रमाणें बापू बाळशास्त्र्यांना घेऊन दुसऱ्या दिवशीं आला. रंगूताई अगोदरच आलेल्या होत्या. बाळशास्त्र्यांची ओळख करून दिल्यावर बापू निघून गेला.

बाळशास्त्र्यांचा चेहेरामोहरा व्यवस्थित होता. कपडे साधे पण अगदीं स्वच्छ असून त्यांस कसल्या तरी सेंटचा मंद वास येत होता. डोक्याला किरमिजी रंगाचा रुमाल बांधला असून त्यांनीं नुकतेंच पान खाल्लें असल्याचें त्यांच्या रंगलेल्या ओंठांवरून स्पष्ट होत होतें. बाळशास्त्री बोलूं लागले म्हणजे कसला तरी मंद व आल्हाददायक सुवास येई. बहुधा त्यांनीं आपल्या तोंडांत जिनतानची एकाददुसरी गोळी धरली असावी ! एकंदरींत, त्यांचें

नांव बाळशास्त्री असें जुन्या थाटाचें असलें तरी त्यांची वागणूक व बोलण्या-चालण्याची पद्धति आधुनिकच होती. त्यांचें बोलणें अत्यंत मृदु, कांहींसें संस्कृतमिश्रित व थोडेंसें सस्मित असें असल्यामुळें सत्यभामाबाईंवर त्यांची दोनचार मिनिटांतच विलक्षण छाप बसली. मातृसुख, पितृसुख, भ्रातृसुख वगैरेंची छाननी झाल्यावर ओघानेंच अपत्यसुखाचा प्रश्न निघाला.

"—वास्तविक रीतीनें पुत्रप्राप्ति यापूर्वीच व्हायला पाहिजे होती—"

" तेंच-तेंच- त्याचंच काय ते सांगा"—रंगूताई आतुरतेनें म्हणाल्या.

" परंतु शुक्रऽऽ ! एकदोन वेळां तर योग फारच बलवान् होते—( रंगूताई-कडे वळून ) बाईंना कधीं दिवस गेलेलेच नाहींत का ?"

" नाहीं हो—काय काय उपाय करून झाले—" रंगूताई अगदीं कळवळून बोलल्या.

" यजमानसाहेबांचा हात बघितल्याशिवाय यांतलें नक्की काय तें सांगतां नाहीं येणार !"

"त्यांचा हात पहायचा म्हणजे सकाळींच यायला पाहिजे—" रंगूताई म्हणाल्या.

" बरं, मग उद्यां सकाळी येऊं. मलाहि आतां डॉक्टराची पत्रिका पहायला जायचं आहे. उद्यां यजमानसाहेबाना सांगून ठेवा आम्ही येतों म्हणून—" बाळशास्त्र्यांनीं समारोप केला. आपल्या नेहमींच्या पद्धतीला अनुसरून मंदस्मित करीत रेशीमकांठी उपरण्यानें त्यांनीं तोंड पुसल्यासारखें केलें व पायांत जोडा घालावयास उठले.

बाळशास्त्री गेल्यावर त्या दोघींच्या त्यांच्यासंबंधानें बराच वेळ गप्पा चालल्या होत्या. सत्यभामाबाईंच्या बोलण्यावरून बाळशास्त्र्यांची त्यांच्यावर चांगली छाप पडली आहे, हें, रंगूताईंच्या लक्ष्यांत येऊन चुकलें. आपलें काम बहुतकरून साधणार याचा त्यांना आनंद झाला. कांहीं तरी निमित्त करून त्यांनीं सत्यभामाबाईंचा लौकरच निरोप घेतला.

मुरलीधरपंत घरीं आल्यावर त्यांच्या कानावर ही सर्व हकिकत पडलीच. पण त्यांच्या मुद्रेवरून त्यांना कांहीं तें फारसें बरें वाटलेंसें दिसलें नाहीं. परंतु पत्नीच्या मर्जीविरुद्ध कांहींहि करण्यास किंवा बोलण्यास त्यांना हिंमतच होत नसे. एवढी वेळ कशी तरी मारून नेण्याचा त्यांनीं निश्चय केला.

"अग पण उद्यां सकाळीं आपण इथं आहोंतच कुठं ! अगदीं कंटाळा आला होता मला—आजच संध्याकाळीं मी साहेबाला सांगितलं कीं, चार दिवस मुंबईस जातों म्हणून ! गोविंदरावांचीहि पुष्कळ दिवसांत भेट झालेली नाहीं—त्यांची यमू आतां मला वाटतं बारा तेरा वर्षांची झाली असेल !"

अजिबात नाहीं, त्यापेक्षां चार दिवसांचा अवधि काय वाईट, असा सत्यभामाबाईंनीं विचार केला.

"बरं तर, रंगूताईंना कळवतें तसं ! म्हणजे त्या बापूबरोबरच पाठवतील निरोप कीं, आम्ही मुंबईहून आल्यावर बघूं म्हणून !"

मुरलीधरपंतांची यावेळीं त्यांच्याकडे पाठ होती, म्हणून त्यांनीं "हूं" म्हणतांना त्यांच्या कपाळाला किती आंठ्या पडल्या होत्या हें सत्यभामाबाईंना दिसलें नाहीं.

मुंबईस आल्यावर दोनच दिवसांनीं सत्यभामाबाईंनीं आपल्या बंधुराजांजवळ एक चमत्कारिक मागणी केली. त्या मागणीनें गोविंदरावांस मात्र आनंद झाला. आपल्याला मूलबाळ नसल्याबद्दल खेद प्रदर्शित करून व आपल्या भावाला इतकें सुंदर कन्यारत्न प्राप्त झाल्याबद्दल आनंद व्यक्त करून, हळूच, आपल्या-बरोबर यमूला पुण्याला पाठविण्याबद्दल त्यांनीं आपल्या भावाजवळ प्रश्न काढला—! गोविंदराव काय उत्तर देतात न कळे, असा रमाबाईंना प्रश्न पडला. वास्तविक अशी धास्ती वाटण्यासारखें कांहींच घडलेलें नव्हतें. कारण सत्यभामाबाई या कांहीं कोणी परक्या नव्हत्या. परंतु त्या दोन दिवसांच्या अवधींत मुरलीधरपंत व सत्यभामाबाई यांच्या वागणुकींत

रमाबाईंना कांहींसा चमत्कारिकपणा दिसून आला. यमूचा आपणांला फार लळा लागला आहे असें भासविण्यासाठीं तीं दोघेंहि वरपांगी तिचे पुष्कळ लाड करीत. पण रमाबाईंच्या मातृदृष्टीला त्यांचें ढोंग पुरतेपणीं कळून चुकलें होतें. तेव्हां यमूला आपल्याबरोबर घेऊन जाण्यांत त्याचा कांहीं शुद्ध हेतु नसावा असा त्यांना संशय येऊं लागला. ही सगळी गोविंदरावांचीच कारवाई असली पाहिजे असेंहि त्यांना वाटलें. हीं दोघें आपल्या यमूचे हाल करण्यास कमी करणार नाहींत अशी त्यांना भीति वाटूं लागली. रमाबाईंच्या दुःखी जीवनांत यमू ही एकच समाधानाची जागा होती. यमूचा वियोग सहन करणें त्यांना अशक्य होतें. शिवाय यमूलाहि आपल्याशिवाय एक क्षणभरहि करमणार नाहीं, हें त्यांना माहीत होतें. म्हणून हातांतील काम अर्धवट टाकून त्या बहीणभावांचा संवाद लक्षपूर्वक ऐकूं लागल्या.

" गोविंदा, मग तूं यमूला आमच्याबरोबर पाठविण्यास आहेस ना तयार ? तिच्या शाळेबिळेची तुला कांहीं काळजी नको. आमच्याकडे तरी कामं काय असतात ? ते तिच्या अभ्यासाची नीट तयारी करून घेतील. आम्हांला तरी विरंगुळा कोणाचा आहे ? तूं तिची इथं काळजी घेतोस त्याहून आम्ही ती अधिक घेऊं ! "

" त्याबद्दल माझी खात्री आहे. तिलाहि आतांपर्यंत थारेपालट करायची संधि मिळालेली नाहीं. कारण, कोणी कधीं बोलावली तर ती लहान म्हणून कोणाकडे पाठवायची म्हणजे काळजी वाटत असे. पण आतां कांहीं ती तितकीशी लहान नाहीं. आणखी वर्षा दोन वर्षांनीं तिला दुसऱ्याच्या घरीं जावं लागणारच आहे. तेव्हां आतांपासूनच तिला आपल्या आईबापांपासून दूर रहाण्याची हलके हलके संवय झाली पाहिजे. मी पुष्कळदां पाहिलं आहे कीं, मुलं कायमचीं आईबापांजवळ असलीं तर अति लाडांनीं तीं पार बिघडून जातात. त्यांना शिस्त कशी ती लागतच नाहीं. यमूला आपल्याबरोबर पुण्यास घेऊन जा म्हणून मीच तुला सांगणार होतों."

" हो—तेंहि खरंच नाहीं तरी ! आपल्या आईबापांपासून कधींहि दूर न आलेल्या मुलींची सासरीं गेल्यावर सुरवातीला कशी दैन्यावस्था होते, हें आपण नेहमीं पहात नाहीं का ? मी तिला सगळ्या कामाधामांत तरबेज करून सोडीन. सासरीं गेल्यावर सासरच्या माणसांनीं तिची पाठच थोपटली पाहिजे. लाड खाण्यापिण्याचे ! "

इतक्यांत यमू माधवकडून परत आली. ती माधवाकडे गेलेली गोविंद-रावांना मुळींच खपत नसे. परंतु आईची संमति व स्वतःची उत्कट इच्छा यांमुळें ती कांहींहि करून आपल्या बापाच्या डोळ्यांत धूळ फेकीच ! आपली मुलगी आपल्या धाकामुळें आपल्या शब्दाबाहेर जाणें शक्य नाहीं, ही खात्री वाटत असल्यामुळें गोविंदराव तिला, ' कुठं गेली होतीस ? ' वगैरे विचारीत नसत. ती दारांत दिसल्याबरोबर सत्यभामाबाई जवळजवळ धांवतच तिच्या-जवळ गेल्या आणि तिचें तोंड त्यांनीं कुरवाळल्यासारखें केलें.

" यमू, येशील ना तूं आमच्या बरोबर पुण्याला ? तुला तिथं कितीतरी गंमत गंमत पहायला मिळेल. आमच्या वाड्यांत तुझ्या बरोबरीचीं कितीतरी मुलं आहेत तुला खेळायला. "

" मी नाहीं येणार जा तुझ्याकडे. मला नको ती गंमत. मी आपली आईजवळच राहीन ! "

रमाबाईंना आनंद झाला.

" हॅं—मी आपली आईजवळच राहीन-" गोविंदराव तोंड विचकीत म्हणाले, " उद्यां तुझं लग्न झालं म्हणजे तुझ्या नवऱ्याकडे आईच येणार असेल ? "

रमाबाईंना वाईट वाटलें. आतां त्या उंबरठ्यांत येऊन उभ्या राहिल्या व म्हणाल्या, "असं काय तें बोलायचं ? सगळ्याच लहान मुलांना आपल्या आई-जवळ रहावंसं वाटतं हो !"

" हो–हो–वा ! लहान तर ! अगदीं कुकुलं बाळच कीं नाहीं ? नशीबच म्हणायचं कीं, अन्न तरी गिळते–अंगावर पिण्याचा हट्ट धरून बसत नाहीं ! जुन्या पद्धतीप्रमाणें म्हणजे हिचं एव्हांना लग्नसुद्धां होऊन जायचं ! तें कांहीं नाहीं. आतांपासून आमच्यापासून दूर रहाण्याची हिला संवय केलीच पाहिजे. नाहींतर हिचं लग्न झाल्यावर हिच्याबरोबर हिची पाठराखीण म्हणून तुलाच जायची पाळी यायची ! ताईबरोबर हिला पुण्यास गेलंच पाहिजे. ताई कांहीं कोणी परकी नाहीं. ती तिचं कांहींसुद्धां कमी पडूं देणार नाहीं. वास्तविक माझी तर इच्छा अशीच आहे कीं, हिला कडक शिस्तींत वागण्याचाच सराव झाला पाहिजे. नाहीं तर उद्यां सासरच्या माणसांचीं आम्हांला बोलणीं खायला लागायचीं ! ताई, तूं हिचे फाजील लाड करतां कामा नयेत, बरं का ? मला नाहीं तें खपणार ! तूं तिला चांगली शिस्त लावणार असलीस तरच मी तिला तुझ्याबरोबर पाठवायला तयार आहें. तुझ्या वहिनीप्रमाणं सारा दिवस तिचे लाड करीत बसणार असशील तर मी तिला पाठवायला तयार नाहीं. आजपर्यंत लाड केले तेवढे बस् झाले. आतां यापुढें न्यायनिष्ठुरतेचाच अवलंब केला पाहिजे."

" त्याची नको तुला काळजी. मला स्वतःला जरी मूलबाळ नसलं तरी मुलांना–विशेषतः मुलींना–कसं वागवावं हें मला चांगलं समजतं हो ! पहा तर खरं ! यमू तुला पुनः भेटेल तेव्हां तुझं तुलाच दिसून येईल तिच्यांत किती फरक पडतो तो ! लहान मुलांचे लाड केव्हां करायचे व त्यांना शिस्त केव्हां लावायची याचं ज्ञान मला बरोबर आहे."

आपल्याला आतां मुंबई सोडून जावें लागणार याचें यमूला अतिशय वाईट वाटत होतें. ती जाऊन आपल्या आईला बिलगली आणि स्फुंदून रडूं लागली. आतां आपल्याला आपली आई आणि आपला माधव पुनः केव्हां दिसणार कोणाला ठाऊक ? आपल्या आईचा ममतेचा हात आपल्या पाटीवरून आतां फिरणार नाहीं. आपण रडूं लागतांच आपल्या आईच्या डोळ्यांतून वहायला लागणारे अश्रू आतां आपल्याला दिसणार नाहींत ! माधवाचा प्रफुल्लित व पाणी-

दार चेहेरा आपल्याला आतां पुनः केव्हां दिसेल? असे विचार एकसारखे तिच्या मनांत येऊं लागले. तिला घेऊन रमाबाई एका कोंपऱ्यांत गेल्या व तिची समजूत घालूं लागल्या.

"असं काय बरं यमू? तुला रडतांना पाहिलं म्हणजे मला माझं रडं आंवरत नाहीं हें तुला माहीत आहे ना?"

"होय आई, पण मी तरी काय करूं? रडं बंद करण्याचा जों जों मी प्रयत्न करतें तों तों मला अधिकच हुंदके येऊं लागतात. आई, तुला सोडून मी कशी जाऊं ग? तुझ्याशिवाय मला एक क्षण तरी चैन पडेल का ग? तुझा तरी, मी इथं नसल्यावर वेळ कसा जाईल? चारदोन तास मी कुठं तुझ्या दृष्टिआड झालें तर तुझा जीव खालींवर होऊं लागतो—मग किती दिवस कुणास ठाऊक-मला तुझ्यापासून दूर रहावं लागणार आहे, मग तुझी स्थिति काय होईल? काका तुला रागानं कांहीं बोलले तर मला आपल्याजवळ ओढून, माझ्या पाठीवर हात फिरवून, तूं आपलं मन पुनः आनंदित करीत असस. पण आतां मीं निघून गेल्यावर तूं कुणाच्या पाठीवरून हात फिरवशील? आई, माझं कसं होईल या विचारानं मला रडायला येतंच आहे, पण मी गेल्यावर तुझी स्थिति काय होईल या विचारानं तर मला अधिकच वाईट वाटत आहे." बोलतांना यमू मधून मधून हुंदके देतच होती.

"गुणी बाळ माझं तें!—" यमू बोलत असतांना आपल्या डोळ्यांत आलेलीं आंसवें पुशीत रमाबाई म्हणाल्या, "एव्हांपासून आपल्या स्वतःच्या सुखापेक्षां दुसऱ्याच्या सुखाची काळजी! आणि हिला म्हणे शिस्त लावण्याकरतां दूर ठेवायची! हीच शिस्त लावील जगाला! पण कशी तरी एकदां हिची ब्याद दूर करायची आहे ना मनांतून? हिच्या सहवासानें मला मिळत असलेलं सुख-सुद्धां तिकडच्या डोळ्यांना बघवत नाहीं. देवा, तिकडे तूं सुबुद्धि दे आणि त्यांना सदैव सुखांत ठेव. मला माझ्या निराळ्या सुखाची अपेक्षाच नाहीं.

पतीच्या सुखापेक्षां आम्हां आर्य स्त्रियांना इतर कोणत्या सुखाची अधिक मातब्बरी वाटणार ? उगी बाळ आतां ! आज रात्रीं मी तिकडे पुनः एकदां विनंति करून पाहीन. बहुतकरून माझ्या विनंतीचा फारसा उपयोग व्हायचा नाहींच ! पण आपली मनाची समजूत इतकंच ! तिकडून माझी विनवणी मान्य करणं झालं नाहीं तर मात्र तूं वन्संबरोबर जातांना हंसतमुखानं निघून जाशील ना ? कारण तूं मला पुनः दिसेपर्यंत तुझ्या जाण्याच्या वेळच्या चेहेऱ्याचीच मला एकसारखी आठवण होत राहील. त्यावेळीं तुझा चेहेरा जर रडवा असेल तर चोवीस तासांतील एकहि क्षण मला आनंदाचा जाणार नाहीं पण तोच जर तुझा चेहेरा आनंदी असेल तर मला प्रत्येक दुःखाच्या वेळीं त्या चेहेऱ्याचं आनंद-दायक कल्पनाचित्र आपल्या डोळयांसमोर उभं करून आपली वृत्ति उल्हसित करण्याचं भाग्य मला लाभेल. मग माझ्यासाठीं, तूं आनंदी आणि प्रफुल्लित चेहेऱ्यानं माझा निरोप घेशील ना ?

" हें काय बरं विचारतेस तूं मला आई ? तुला ज्यामुळं सुख होणार आहे असं तूं आपल्या तोंडानं सांगत आहेस तें मी करणार नाहीं असं होईल तरी कसं ? मी गच्चीवरून खालीं उडी मारली असतांना तुला आनंद होईल असं तूं म्हटलंस तर मी आत्तां उडी घेऊन दाखवीन ! "

" शाबास बाळ. तिकडे गेल्यावर माझी आठवण काढूं नकोस असं तुला सांगण्यांत काय अर्थ ? कारण त्या दिशेनं तूं जों जों प्रयत्न करशील तों तों अधिक तीव्रतेनें ती होऊं लागेल. पण माझ्याबद्दल कांहीं सुद्धां काळजी मात्र करूं नकोस. उभ्या आयुष्यांत माझ्या हातून—निदान मला कळत तरी—कोणतेंहि पातक घडलेलं नाहीं, आणि मी माझ्या कर्तव्यपालनांत समजून उमजून कधीं कसूर केली नाहीं. तेव्हां माझी काळजी त्या जगन्नियंत्याला वहावी लागणार हें निश्चित आहे. तूं आनंदांत असावंस अशी मी त्याची नेहमीं प्रार्थना करीत राहीन आणि त्याला माझी ती प्रार्थना ऐकावीच लागेल. बरं, जा तूं आतां

कुठं तरी. तुला इथं मला लगटून बसलेली पाहिली तर तुला उगाच बोलून घ्यावं लागेल !"

"खरंच आई, काका बाहेर आहेत ही गोष्ट इतका वेळ मी अजिबात विसरूनच गेलें होतें. नशीबच म्हणायचं माझं कीं, इतक्या वेळांत ते आंत आले नाहींत. आई, मी माधवकडे जाऊं का ?"

"जा, पण जातांना तिकडच्या दृष्टीस पडूं नकोस बरं का—"

गोविंदरावांची नजर चुकवून यमू हळूच माधवकडे निघून गेली. रमाबाईंनी तिला माधवाकडे जायला परवानगी दिली खरी, पण मागाहून त्याचें त्यांनाच वाईट वाटूं लागलें. कारण ती आणखी थोड्याच तासानीं आपल्या दृष्टिआड होणार, तेव्हां निदान ती आपल्याकडून जाईपर्यंत तरी तिचें दर्शनसुख आपणाला लाभावें अशी त्यांची इच्छा असणें स्वाभाविक होतें. पण माधवाला भेटल्यानें यमूला सुख होणार आहे या एकाच गोष्टीनें त्यानीं आपल्या मनाचें समाधान करून घेतलें.

यमू माधवाकडे आली तेव्हां तो कसलेंसें चित्र काढीत बसला होता. यमूला त्याच्याकडून जाऊन फारसा वेळ झालेला नसल्यामुळें ती इतक्यांत पुनः परत येईल अशी त्याला कल्पना नव्हती. म्हणून ती आलेली पाहून त्याला थोडेंसे आश्चर्यच वाटलें. ती आली खरी, पण तिच्या तोंडून शब्दच उमटेना. या आपल्या प्रेमळ सवंगड्याला सोडून आपल्याला जावें लागणार या विचारानें यमूचा कंठ भरून आला व ती स्फुंदूं लागली. इतक्यात हिला काय झालें असावें याची माधवाला कल्पनाच होईना. थोड्याच वेळापूर्वी ही आपल्याकडे येऊन गेली तेव्हां ती चांगली आनंदांत होती आणि इतक्यांत हुंदके देण्याची पाळी येईपर्यंत हिच्यावर प्रसंग तरी कसला आला ? त्यानें आपला कागद बाजूस ठेवला आणि प्रेमळपणानें तिच्या पाठीवरून आपला हात फिरविला. तिच्या अंगाला माधवाचा आतांचा स्पर्श होतांच तिला नवजीवन प्राप्त झाल्याचा भास झाला. या क्षणापर्यंत या जातीचा स्पर्श तिला कधींच अनुभविण्यास मिळाला

नव्हता. तिच्या आईचा प्रेमळ हात तिच्या अंगावरून हजारों वेळां फिरला होता. त्या स्पर्शानें तिला अतोनात आनंद होत असे हें खरें. पण आतांच्या माधवाच्या स्पर्शानें उत्पन्न झालेला आनंद निराळयाच प्रकारचा होता. दोन्हीं स्पर्श प्रेमळच, दोन्हींहि स्पर्शात परमावधीचा जिव्हाळा. पण माधवाच्या आतांच्या स्पर्शात असे काहीतरी होतें कीं, जें तिच्या आईच्या स्पर्शात नव्हतें. तें काय होतें हें तिला समजेना. तें काय नव्हते हें मात्र तिला सांगतां आलें असतें. यावेळीं माधव सारा सतरा वर्षांचा व यमू बारा वर्षांची होती. तेव्हां आपल्या प्रियकराचा स्पर्श झाला असतां तरुणीच्या ज्या भावना उद्दीपित होतात त्यांचा अंशहि यमूच्या ठिकाणीं असणें संभवत नव्हतें. त्याचप्रमाणें तो प्रियकर ज्या भावनेनें आपल्या प्रियेच्या अंगाला स्पर्श करतो ती भावना माधवाच्याहि स्पर्शात असणें अशक्य होतें. म्हणजे त्या स्पर्शात ज्याप्रमाणें आईच्या स्पर्शांतील वत्सलभाव नव्हता, त्याचप्रमाणें तारुण्यांतील कामुकताहि नव्हती. तिच्या रोमरोमांत वीज खळाळल्याचा तिला भास झाला. माधवाशिवाय इतरहि काहीं माणसें या जगांत अस्तित्वांत आहेत असें यावेळीं तिला कोणी सांगितलें असतें तर तिला तें पटलें नसतें. अखिल चराचर सृष्टींत आपण आणि माधव हीं दोनच माणसें आहोत आणि जगाच्या अंता-पर्यंत आपण दोघें आहोत याच स्थितींत असावें असें तिला वाटलें. पण दुसऱ्याच क्षणीं, या आपल्या जिवाच्या सोबत्याला आपणांस उद्यांपासून मुकावें लागणार आहे हा उद्वेगजनक विचार तिच्या डोळ्यांपुढें उभा राहिला. ती माधवाला बिलगली. तिला एकसारखें रडूं येऊं लागलें. तिनें आपली सर्व शक्ति एकवटली आणि त्याच्याकडे पाहून " माधव–" असें म्हणाली. तिच्यानें पुढें बोलवेना. तिचा कंठ भरून आला. माधवानें तिची पाठ हळुहळू थोपटल्यासारखें केलें.

" यमू, असं काय बरं करूं लागलीस तूं? आतांच तूं इथं आली होतीस तेव्हां चांगली हंसत खेळत होतीस आणि इतक्यांतच तुला एवढं दुःख कशाचं झालं? तुला हंसतांना पाहून मला हंसूं आंवरत नाहीं, हा तुझा नेहमींचाच

अनुभव आहे. तुला रडतांना पाहून माझ्या डोळ्यांत पाणी येत नाहीं, यावरून तुझ्या आनंदांत मात्र मी वांटेकरी होतों पण दुःखांत मात्र मी तुझा समभागी व्हायला तयार नाहीं अशी का तुला शंका येत आहे ? तुला हें विसरून चालणार नाहीं कीं, तूं व मी कितीहि प्रमाणांत एकरूप झालों तरी तूं मुलगी आहेस आणि मी मुलगा आहे. लौकरच तूं तरुणी होशील व मी तरुण होईन. आपलं दुःख जगाच्या नजरेला पडूं न देण्याची खंबीरता तूं ठेवली नाहींस तर तुझं चालण्यासारखं आहे. पण मला मात्र ती दक्षता बाळगलीच पाहिजे. तुझ्याप्रमाणें मला माझ्या अश्रूंना वाव देतां येत नाहीं. पण माझं हृदय तुला यावेळीं पहातां येईल तर तें स्फुंदत असलेलं तुला दिसेल. सांग यमू, माझ्या बोलण्यानं तुझं दुःख कमी होण्याऐवजीं वाढत का आहे ? तूं आपलं रडं आंवरणार नाहींस का ? तुझ्या डोळ्याचं पाणी खळलं नाहीं तर माझ्या हृदयाचं पाणी झाल्याशिवाय राहणार नाहीं. यमू, असं काय बरं ? मला काय तें सांगायचं नाहीं का ? तूं प्रत्येक गोष्ट मला सांगतेस आणि यावेळीं तरी तुला कसलं दुःख होत आहे तें मला सांगण्यासाठींच तूं इथं आलीस ना ?

" माधव, किती रे चांगला आहेस तूं ? मी तुला किती तरी आवडतें, नाहीं ? मी गेल्यावर तुला चैन तरी पडेल का ?" असें म्हणून यमू डोळे पुसूं लागली.

" हें काय म्हणत आहेस तूं यमू ? कुठं जाणार आहेस तूं ? "

आपल्याला आपल्या आत्याबाईबरोबर जवळजवळ कायमचें पुण्याला रहावें लागणार आहे हें यमूनें माधवाला कसें तरी सांगून टाकलें.

" यमू, पण तुझ्या आईनं तुझ्या काकांच्या या विचाराला कशी संमति दिली ? "

" अरे, ती कशी संमति देईल ? मला ती म्हणाली आहे कीं, मी आज रात्रीं काकांचं मन वळविण्याचा प्रयत्न करतें म्हणून ! पण या प्रयत्नांत तिला फारसं यश येईलसं वाटत नाहीं. "

"तुझ्यावर हें खरोखरच फार मोठं संकट आलं आहे. तुला आतांपर्यंत बापाचं सुख कसं तें माहीत नाहीं. तुला काय तें आईचं सुख माहीत आहे. तुला तरी तुझ्या आईवांचून मायेचं असं कोण आहे ?" माधव आणखी कांहीं बोलणार होता, तों यमूनें मध्यें बोलून त्याला अडथळा केला.

"असं रे काय म्हणतोस तूं माधव ? मला आई जितकी आवडते तितकाच तूंहि आवडतोस हें मी आजपर्यंत तुला इतक्यांदा सांगितलं तरी तुला कांहीं तें खरं वाटत नाहीं ना ! मग ज्याचं बोलणं आपल्याला खरं वाटत नाहीं तें माणूस आपल्यापासून दूर झालं तर कोणालाहि बरंच वाटणार ! मी आतां उद्यां निघून जाणार म्हणून तुला आनंदच वाटत असला पाहिजे तर मग !"

"अगदीं कशी तूं खुळी यमू ? अग, मी तुला आवडतों हें मला पुनः एकदां तुझ्या तोंडून ऐकायचं होतं म्हणून मी मुद्दामच तसं बोललों. उद्यां तूं इथून जाणार हें तूं मला सांगितल्यापासून तुला स्वतःला होत नसेल एवढं दुःख मला होत आहे. असा एक दिवस तर राहोच पण एक क्षणहि जाणार नाहीं कीं, जेव्हां मला तुझं विस्मरण होईल. इतकंच काय, पण तूं तिकडे दुःखांत आहेस असा मला नुसता संशय आला तर मला माझे नित्याचे व्यवहार सुरळितपणें पार पाडणंहि मुष्किलीचं होईल. यमू, तूं उद्यां निघालीस म्हणजे मी तुला अखेरचीं पाहीन तेव्हां तरी कृपा करून तूं आपला चेहेरा आनंदी ठेव. हे तुला सहजासहजीं शक्य होणार नाहीं, हें मी जाणून आहें. कारण तुला असा उपदेश करतांना, माझी आंत उडालेली खळबळ तुझ्या नजरेस पडूं न देण्याची खबरदारी बाळगतांना माझी किती तारांबळ उडत आहे याचा मी प्रत्यक्षच अनुभव घेत आहें. पण त्यावेळीं जर मला तुझा चेहेरा उतरलेला दिसला तर तूं मला पुनः प्रत्यक्ष दिसेपर्यंत तीच तुझी दुःखी मुद्रा माझ्या अंतःचक्षूंसमोर उभी राहील आणि मग आपले दुःखी विचार जगाला दिसूं न देण्याची दक्षता बाळगितांना माझ्यावर कदाचित् वेड लागण्याची सुद्धां पाळी येईल."

"माधव, हेंच मला माझी आईहि आतां सांगत होती. तुम्हां दोघांशिवाय मला तरी माझं असं या जगांत काय आहे? तुम्हां दोघांना ज्यानं बरं वाटेल तें मला केलंच पाहिजे."

"यमू, किती ग चांगली आहेस तूं?" असें म्हणून माधवानें तिला घट्ट कवटाळून धरलें. कोणत्याहि संकटापासून आपला बचाव करण्यास समर्थ अशा बाहूंनीं आपल्या शरिराला वेष्टिलें आहे असा तिला भास झाला. दोघेंहि कांहीं क्षण त्याच स्थितींत होतीं. माधवानें हा वेळपर्यंत महत्प्रयासानें दाबून ठेवलेले अश्रू यमूच्या अंगावर गाळून टाकले. तरुणतरुणींना आपल्या भावना परस्परांना मुक्यानें सांगतां येतात यांत कांहीं आश्चर्य नाहीं. पण एकमेकांवर निःस्वार्थ प्रेम करणाऱ्या त्या बालकांना परस्परांच्या भावना आपोआप समजल्या. आम्ही दोघेंच एकमेकांसाठीं जन्मलों आहोंत, असें त्यांना वाटूं लागलें. आपली आतां लौकरच ताटातूट होणार हेंहि त्या वेळच्या निरुपम आनंदांत तीं विसरून गेलीं. दोन निःस्वार्थ व प्रेमळ जीवांची ताटातूट करण्याचा क्षुद्र मानव प्राण्यांनीं कितीहि प्रयत्न केला तरी दयाघन परमेश्वर त्या दोघांना एकत्र ग्रथित केल्यावांचून कधींहि रहात नाहीं. कांहीं काळपर्यंत आपल्या प्रयत्नांत आपल्याला यश आल्याचा भास होऊन कांहीं मूढ मानव आपलें समाधान करून घेत असतात पण त्यावेळीं सुद्धां ते प्रेमळ जीव अदृश्य अशा सूत्रानें एकमेकांशीं निगडीत आलेलेच असतात.

सर्वतोपरी निरपराधी अशा या दोन प्रेमी जीवांची पुढे काय अवस्था होणार? आजपर्यंत त्यांनीं आपल्या अंतःकरणांत जतन केलेल्या आशेच्या लता परमेश्वराच्या सुधामय प्रसादानें फलपुष्पांनीं बहरणार का मानवाच्या दानवी दुर्विलासांनीं त्या करपून जाणार?

---

## ‘ हिंदु नवरा ’–   ४

रात्रीं सर्वांची निजानीज झाल्यावर रमाबाई गोविंदरावांच्या खोलींत गेल्या. यमूच्या जन्मापासून त्यांची व गोविंदरावांची जवळजवळ फारकतच झालेली होती. इतर लोकांना हें कळूं नये म्हणून गोविंदराव शक्य तितकी खबरदारी घेत असत. पण अशा सोंगानें जग फसलें तरी पति हयात असतांनाच विधवेला अनुभवाव्या लागणाऱ्या दुःखांचा अनुभव रमाबाईंना घ्यावा लागत असल्या-मुळें त्यांची फसवणूक होणें शक्य नव्हतें. गेल्या नऊ दहा वर्षांत गोविंदरावांच्या घरीं रमाबाईची स्वयंपाकीणबाईपेक्षां अधिक योग्यता नव्हती. जी स्वयंपाकीण म्हणूनच असते तिला बिचारीला अधिक योग्यता प्राप्त होण्याची फारशी आशाहि नसते व अपेक्षाहि नसते. परंतु रमाबाई कांहीं गोविंदरावांच्या स्वयं-पाकीणबाई नव्हत्या. त्या त्यांच्या धर्मपत्नी होत्या. गृहिणीपदावर आरूढ झालेल्या लक्ष्मीची अपेक्षा, पतिराजांना स्वयंपाक करून घालण्याइतकाच आपला अधिकार असावा, अशी असणें केव्हांहि शक्यच नाहीं. पण त्यापलीकडची तिची अपेक्षा अगर आशा सफल करणें हें सर्वस्वीं तिच्या पतीच्याच स्वाधीन असतें! रमाबाई हिंदु पत्नी असून गोविंदराव हिंदु पति होते. हिंदु पति आणि हिंदु पत्नी हें परमेश्वरी सृष्टींतील अनेक गूढ कोड्यांपैकीं एक अत्यंत गूढ पण त्याहून जास्त केंविलवाणें असें कोडें आहे. कांहीं अपवाद सोडून दिले तर बहुतेक हिंदु नवऱ्यांची आपल्या बायकांशीं वागणूक ते मालक व त्या त्यांच्या गुलाम अशा प्रकारची निर्दयतेची असते. जगाच्या उघड्या मैदानांत वावरण्याचें काम

त्यांच्यावर येऊन पडत असल्यामुळें आपल्या घरांतील गृहिणींचा त्यांना कित्येकदां विसर पडत असतो. अशांपैकीं एखाद्या गृहस्थाची बाहेरील मोकाट वागणूक पाहिली म्हणजे त्याच्या साध्वी पत्नीची कींव तर येतेच पण त्याच्या पशुतुल्य वर्तनाचा संतापहि आल्याशिवाय रहात नाहीं. घरांतून बाहेर पडल्या-बरोबर, आपण पुरुष आहोंत आणि म्हणून वाटेल तसें वागण्याचा आपणाला जन्मसिद्ध हक्क आहे अशी हलकट कल्पना करून घेऊन दीडदमडीच्या बाजार-बसवीपुढें, पैशांची व अब्रूची खैरात करून, गोगलगाय बनून व गुडघे मोडून तो बेशरमपणें कुर्निसात करतो! आणि त्याच्या घरीं बिचारी त्याची लग्नाची बायको, आपला पति आपला पुरुषार्थ गाजवायला बाहेर पडला आहे आणि लवकरच आपल्याला भेटण्यासाठीं तो आतुरतेनें परत येईल अशा भोळ्या कल्पनातरंगांत दंग होऊन आशाळभूत आनंद मानीत असते. त्या बिचारीला हें माहीत नसते कीं, आपल्या पतीच्या पुरुषार्थाविषयीं लोकोत्तर कल्पना आहेत! त्याचें पुरुषार्थाचें कोष्टकच निराळें असतें. ज्याची कामवासना पशूहूनहि प्रबल त्याचा पुरुषार्थ फारच श्रेष्ठ अशी त्याची व्याख्या असते. 'मी मर्द आहें म्हणून या फंदांत पडलों,' असें छाती वर काढून सांगण्यांतच पराक्रमाचा पाया आहे, अशी त्यानें आपली समजूत करून घेतलेली असते. म्हणजे त्याच्या मताप्रमाणें आपल्या धर्मपत्नीशीं एकनिष्ठपणें वागणारे किंवा आजन्म ब्रह्मचर्यव्रताचें खडतर पालन करणारे सर्व नामर्द असून तोच काय तो एक मर्द असतो ! कारण तो आपल्या धर्मपत्नीची तम्मा न बाळगतां बाहेरख्यालीपणा करीत असतो ना? त्या नीचाच्या हे लक्षांत येत नाहीं कीं, व्यभिचारकर्मावरच जर मर्दपणाचें कोष्टक बसवावयाचे असेल तर आपल्या लज्जेचें राजरोस प्रदर्शन मांडून बसणाऱ्या बाजारबसव्यांच्या मर्दपणाला तर दुनियेंत जोडच नाहीं! विकारच नसणें हें निःसंशय नामर्द-पणाचें लक्षण आहे. पण विकार उसळून तुफान झाले असतां त्यांचे गुलाम बनून त्याप्रमाणें आचरण करणें हें मर्दपणाचें लक्षण नसून सद्विचाराभावाचेंच तें द्योतक आहे. बेफाम झालेल्या विकारांना आपल्या हुकमतींत ठेवणें म्हणजे आपण

त्यांच्या आधीन न होतां त्यांनाच आपले गुलाम बनविणें हेंच खऱ्या मर्दपणाचे लक्षण आहे. दुसरी गंमत अशी कीं, हा वाटेल तिकडे वाटेल तसें निर्लज्जपणें शेण खात फिरत असतां, घरीं आल्याबरोबर, आपल्या पत्नीचें तोंड हुंगण्याची बेशरम तत्परता दाखवीत असतो ! तो घरीं आल्यावर, त्याची पत्नी जरी देवदर्शनासाठीं बाहेर गेली असली तरी त्या माउलीचे आईबाप उद्धरण्याचा शहाणपणा करण्यास तो सहसा चुकत नाहीं. पाजी माणसाच्या सडलेल्या मेंदूंतून दुर्गंधीखेरीज दुसरा कशाचा उद्भव होणार ?

आपल्या नेहेमींच्या-म्हणजे झोंपण्यास गोविंदराव घरीं असत तेव्हांच्या रिवाजाप्रमाणें रमाबाई गोविंदरावांचे पाय चेपण्यास बसल्या. रमाबाईंच्या त्या देवाचे शरीर रमाबाईंच्या संनिध असलें तरी त्याचें मन मात्र निराळयाच देवते-कडे लागून राहिलें होतें. आपल्या वहिणीच्या व मेहुण्याच्या लाजेस्तव गेले तीन-चार दिवस गोविंदराव रात्रींचे बाहेर पडत नसत. त्यांच्या उपपत्नीचा एवढा विरह त्यांना महिन्यामहिन्यांत घडत नसे. त्यामुळें त्यांचा जीव आपल्या त्या लाडकीच्या भेटीसाठीं विलक्षण आतुर झाला होता. आपण करीत असलेल्या सेवेकडे आपल्या पतीचें लक्ष नाहीं याबद्दल रमाबाईंना मुळींच वाईट वाटत नव्हतें. पतीची अशा रीतीनें सेवा करण्याची त्यांना कांहीं कोणी सजा फर्मावलेली नव्हती. हें काम त्यांचें त्यांनींच आपणांवर ओढवून घेतलें होतें. त्या आपल्या पतीची सेवा सर्वस्वी निःस्वार्थ बुद्धीनें व करीत होत्या. ज्याचें कर्म त्याच्याबरोबर ! आपला पति देवाब्राह्मणांच्या साक्षीनें घेतलेल्या शपथांना पारखा झाला असला म्हणून त्याच्याप्रमाणें आपणाला आपला अधःपात थोडाच करून घ्यायचा आहे, अशी आपली रमाबाईंची जुनी विचारसरणी ! पर्वतावरील पाषाणाचें हृदय-सुद्धां पाण्याच्या संतत प्रवाहानें दुभंगतें पण गोविंदरावांच्या हृदयाचें पृथक्करण करणें एखाद्या निष्णात शास्त्रज्ञालाहि जड गेलें असतें. आपल्या पत्नीच्या एकनिष्ठ सेवेनेंहि त्यांच्या हृदयाला कधीं करुणेचा पाझर फुटला नाहीं. रमाबाई त्यांच्याशीं बेताबेतानें बोलूं लागल्या,

" मग यमूला अगदीं पाठविणारच का वन्संच्या बरोबर ?"

" होय— "

" पण त्या विचारीला काय वाटेल याचा कांहींच नाहीं का विचार करायचा ?"

" तिला काय वाटेल यापेक्षां तुला स्वतःला काय वाटेल याचाच विचार तुझ्या डोळयापुढें उभा आहे मला वाटतं !"

" नाहीं बरं. माझ्या सुखदुःखाची मला मुळीच पर्वा नाहीं. त्या बिचारीला माझ्यावांचून मायेचं असं दुसरं कोणीच नाहीं. माझ्यापासून तिला दूर केल्यावर तिची काय स्थिति होईल हाच एक विचार माझ्या डोळयासमोर उभा आहे, इकडच्याच पायाची शपथ घेऊन सांगतें."

" हो–हो–वा ? माझ्या पायांची शपथ तर ? माझे पाय म्हणजे तुला अगदीं परब्रह्मच वाटत असेल, नाहीं ? तुझ्या खोट्या शपथेमुळें माझे पाय एकदांचे गळून पडले म्हणजे ते चेपीत बसण्याची तुझ्या मागची यातायात तरी एकदांची सुटेल, नाहीं ? ढोंग म्हणून कां होईना ? पण ते चेपण्याची तसदी तूं घेतेसच कीं नाहीं ?"

" शिव शिव ! काय बोलायचं हें ?"

" समजलं नाहीं वाटतं मी काय बोललों तें ? कानपिळीचा अहेर हवा असेल ? का तुझ्या मठ्ठ मेंदूवर हीं पदकमळें वाहूं ? म्हणजे तरी मी काय बोललों तें समजलं तर समजेल !"

" एवढं कुठं आहे माझं भाग्य ? आपल्या पदकमळांनीं आपण माझी पूजा बांधली तर त्यांत मला धन्यताच वाटणार आहे."

" बस्–बस्–पुरे ! तुझ्या असल्या लाघवी भाषणांनीं हुरळून जाण्याइतका कांहीं मी आतां उल्लू राहिलों नाहीं !"

"मग त्या बिचारीच्या सुखदु:खाचा नाहींच का कांही विचार करायचा ?"

"नाहीं—नाहीं करायचा ! मग काय म्हणणं आहे तुझं ? म्हणजे काय गंमत आहे पहा ! जशी कांहीं तिची तुला एकटीलाच काळजी ! तूं तिची आई असलीस तर ती बापाच्या जागीं माझं नांव तरी लावतेच कीं नाहीं ?"

"हर हर ! आपलं हें संशयपिशाच्च जन्मभर असंच का— "

"जग तरी मला तिचा बाप समजतंच कीं नाही ? आणि तुझ्या आग्रहाप्रमाणं मी तिचा बाप असलोंच तर मला तिच्याबद्दल मायाहि वाटत असली पाहिजे हें निसर्गानंच प्राप्त होतं."

"कांहीं असलं तरी आईच्या आंतड्याची सर नाहींच कोणाला यायची !"

"आईचं आंतडं आणि बापाचं काय ?"

"तें राहूं दे मेलं. पण मी काय म्हणतें तें ऐकायचं ना ? यमूला बिचारीला आपल्यापासून एव्हांपासून दूर ठेवण्याइतकं तिच्या हातून पातक तरी काय घडलं ?"

"माझ्या चेहेऱ्याशीं न जुळणारा चेहेरा घेऊन ती तुझ्या पोटीं जन्माला आली हाच तिचा अपराध !"

"पण तें तिच्या हातचं का होतं ?"

"तिच्या हातचं नसलं म्हणून काय झालं ? गुन्हा तो गुन्हाच ! कांचेला चुकून अंग घासलं तरी ती काहीं कापल्याशिवाय सोडीत नाहीं. पण हा वादविवाद कशाला ? आतांपर्यंत हजारदां या विषयाचा उहापोह झाला असेल ! माझं डोकं एकदां बिथरलं तें बिथरलं ! दुर्दैव म्हणा तुम्हां मायलेकींचं हवं तर कीं, तुम्ही माझ्या गळ्यांत पडलांत ! मी काय करणार त्याला ? मला बरं वाटेल तसाच मी वागणार ! माझ्याशीं जन्म काढण्याची पाळी तुमच्यावर, आपल्याबद्दल तुम्ही आपल्या दैवाला पाहिजे तर दूषण द्या.

"तें कांहीं चालणार नाहीं. आपली वाटेल तशी वागणूक चालूं असतां आपला कोणताहि शब्द मीं आजपर्यंत खाली पडूं दिला नाहीं. पण आतां या बाबतींत मी माझाच हट्ट चालविणार! यमू जन्मल्यापासून आतांपर्यंत तिच्या अंगावरून प्रेमानें हात फिरवणेंहि आपल्या हातून कधीं झालें नाहीं. तिच्या रागावर माझ्याशीं सुद्धां आपण धर्मानें वागत नाहींसे झालांत. पण माझ्या बाबतींत कांहींच बोलण्याची माझी इच्छा नाहीं. असें वागूनच आपल्याला सुख लागत असेल तर मला तरी त्यांत वाईट वाटण्याचें कारण काय? आपल्या सुखांतच माझें सुख आहे. कारण मी आपली धर्मपत्नी आहें. पति आपल्या धर्मापासून च्युत झाला तरी आपला पत्नीधर्म सोडण्याचें पातक कोणाहि खऱ्या आर्यस्त्रीच्या हातून घडणार नाहीं. आपल्या पतीची कानउघाडणी करण्याचा ती फार तर प्रयत्न करील. पण तिच्या दुर्दैवानें त्या प्रयत्नांत तिला यश आलें नाहीं तरी ती कांहीं आपल्या पतीचा घाणेरडा धडा गिरवायला तयार होणार नाहीं. पण या वेळीं माझ्या पत्नीधर्माबरोबरच माझा मातृधर्महि मला रक्षण करायचा आहे. आपण आपल्या पतिधर्माला पारखे झालांत तर झालांत पण आतां निदान पितृधर्माला तरी पारखे होऊं नका, एवढीच माझी आपल्या पायांशीं विनंति आहे," असें म्हणून रमाबाईंनीं गोविंदरावांच्या पायांवर खरोखरच डोकें ठेवलें.

सारासार विचाराची शक्ति माणसांत असते. माणुसकी सोडून पशूंत जाऊन बसण्याची आपली लायकी ज्यानें आपल्या पशुतुल्य आचरणानें प्राप्त करून घेतली त्याचा आणि सारासार विचाराचा संबंध काय? गोविंदराव फक्त आकृतीनें माणूस होते,—त्यांची कृति माणुसकीला धरून नव्हती. मनुष्यपणाचा भास उत्पन्न होण्यासारखा एखादा तरी सद्गुण त्यांच्या अंगीं उरला होता कीं नाहीं याची शंकाच आहे. आपले पाय आपल्या लग्नाच्या बायकोनें धरले असून त्यांवर आपलें मस्तक ठेवलें आहे असें पहातांच, त्यांच्या मनश्चक्षूंपुढें एक तसल्याच प्रकारचें उलट चित्र उभें राहिलें. ज्या बाजारबसवीपुढें पैशांची

कुरबानी करून तिच्या चरणांवर ते लोटांगण घेत असत तिची ती सत्त्वगुणप्रधान मूर्ति त्यांच्या डोळ्यांसमोर उभी राहिली. त्याच वेळीं, त्या देवतेनें आपल्या टाळक्यावर हाणलेली लाथहि त्यांना आठवली. त्यांचा पुरुषार्थ जागृत झाला. त्या वेळीं त्यांच्या चेहऱ्याकडे कोणी पाहिलें असतें तर कोंकराचा बळी घेण्यास मग्न झालेल्या लांडग्याचीच त्याला आठवण झाली असती. वाघिणीची नुसती डुरकाळी ऐकल्याबरोबर भुईवर मान टाकणारा लांडगा कोंकरूं पहातांच जसा स्फुरावतो, त्याप्रमाणें त्यांच्या त्या हलकट रांडेच्या नुसत्या डोळे वटारण्यानेंच गोगलगाय बनणारे गोविंदराव आपल्या दीन पत्नीला अशा याचनेच्या स्थितींत पहातांच नृसिंह बनले. त्यांनीं त्या माउलीच्या डोक्यावर अशी कांहीं लाथ मारली कीं, त्यामुळें तिच्या डोळ्यांपुढे काळोखीच आली. आपल्या पुरुषत्वाची आज सार्थकता झाली अशा भावनेनें गोविंदरावांच्या हलकट मनाला तामसी समाधान वाटलें !

किंचित् भानावर आल्यावर रमाबाईच्या लक्षांत आलें कीं, आपण आपल्या पतिदेवाच्या चरणांवर मस्तक ठेवलें असतांना आपल्याला लत्ताप्रसाद मिळाला ! आज इतकीं वर्षें आपण यांची निरपेक्ष सेवा केली याबद्दल हेंच का फळ आपल्या कपाळीं होतें ? पण त्यांच्या डोक्यांत आलेला हा विचार एक क्षणभरच टिकला. असला विचारहि आपल्या मनांत येऊं देणें हें त्यांना पातक वाटत होतें ! रमाबाईची तारीफ करावी कीं कींव करावी !

त्या साध्वीला हें माहीत नव्हतें कीं, या व्यवहारी जगांत दुर्बलता हेंच सर्वांत मोठें पातक आहे. दुर्बल आपल्या परीनें कितीहि सचोटीनें, कितीहि निष्ठेनें, इतकेंच काय पण कितीहि प्रेमानें वागले तरी त्या सचोटीचें, निष्ठेचें व प्रेमाचें पर्यवसान जुलुमी प्रबलांच्या लाथा मिळण्यांतच व्हावयाचें ! व्यक्ति काय, समाज काय अगर राष्ट्र काय, जोंपर्यंत दुर्बलतेचें महापातक त्यांच्या अंगाला चिकटून बसलेलें असेल तोंपर्यंत त्यांच्या कपाळच्या लाथा चुकणें शक्य नाहीं ! या धकाधकीच्या मामल्यांत दुबळेपणासारखा दुर्गुण नाहीं, दुबळेपणासारखें पातक

नाहीं! याला लाथ मारणें तर दूरच—पण नुसती उगारल्याबरोबर—हा आपल्या नरडीचा घोंट घेण्यासाठीं सिंहासारखी झडप न घालतां, गाढवाप्रमाणें आपल्याला उलट कुर्निसातच करील अशी प्रबलाची खात्री असेपर्यंत त्यानें त्या दुर्बलाचें कंबरडें लाथेनें कां मोडूं नये?

हा जगाचा न्याय प्रत्यहीं डोळ्यांना दिसत असूनहि असल्या प्रकारचा छळ सहन करणारीं—नव्हे—त्यांत भूषण मानणारींहि माणसें, समाज व राष्ट्रें पृथ्वीच्या पाठीवर आहेतच! त्यांतील कांहीं, जुलुमी प्रबलांचा जाच निमूटपणें सहन करीत बसण्यांतच आपली बलोपासना आहे—आपला उद्धार आहे—असेंहि मानतात! आध्यात्मिकतेच्या पायावर उभारलेल्या या तत्त्वज्ञानाची आराधना व जोपासना करण्याचें खूळ जोंपर्यंत जनतेनें आपल्या डोक्यांतून काढून टाकलें नाहीं तोंपर्यंत तिचा उद्धार होणें हें सशाला शिंग फुटण्यासारखेंच अशक्य आहे.

तें कांहीं असलें तरी आपण आपलें कर्तव्य चोख बजावीत असतांना आपला पति आपलें कर्तव्य तर पाळीत नाहींच पण उलट आपला छळ मात्र करतो असें प्रत्यक्ष अनुभवाला आल्यानंतरहि, त्याचा धिःकार न करतां त्याच्या विषयींचा आपला पूज्यभाव कायम टिकविण्याचें दिव्य एका आर्यस्त्रीशिवाय इतर कोणतीहि स्त्री करूं शकेल असें वाटत नाहीं. गोविंदरावांच्या या क्रूर कृत्याबद्दल त्यांना दोन शब्द बोलणें किंवा 'असा काय अपराध घडला माझ्या हातून आपला?' असा त्यांस प्रश्न विचारणें यांत रमाबाईच्या पतिव्रताधर्माला बाध आला असता असें मुळींच नाहीं. पण रमाबाईंना तसें वाटलें, त्याला कोणी काय करावें? कांहींहि न बोलतां त्या पुनः गोविंदरावांचे पाय चेपूं लागल्या!!

यमूच्या ठरलेल्या प्रयाणाची वार्ता माधवानें आपल्या आईच्या कानावर घातलीच होती. यमू उद्यां जाणार तेव्हां आपल्या माधवाला किती वाईट वाटेल व आपल्या आईपासून दूर होण्यांत यमूला किती दुःख होईल, अशी दुहेरी भीति पार्वतीबाईंना वाटत होती. कांहीं केल्या त्यांना झोंप म्हणून येईना.

गंगाधरपंतांना त्यांतील कांहीं समजूं देण्यांत कांहींच अर्थ नव्हता. कारण यमू त्यांना अगदींच आवडत नव्हती असें नसलें तरी तिचा त्यांना फारसा ळळाहि नव्हता. याला कारण एकच. गोविंदरावांच्या फाजील चढेल व आढ्यताखोर वागणुकीमुळें त्यांच्याविषयीं बनलेला गंगाधरपंतांचा ग्रह त्यांच्या मुलीच्या बाबतींतहि जवळजवळ तसाच बनलेला होता. आपल्याला शत्रुसमान वाटणाऱ्या माणसाची कोणतीहि गोष्ट वाईटच, अशी कित्येकांची मनोरचना असलेली आपल्या अनुभवास येते. गंगाधरपंतांची वृत्ति अशाच प्रकारची असल्यामुळें पार्वतीबाई आणि माधव यांना आकर्षिणारे यमूच्या अंगांतील सद्गुण त्यांना ओढ लावूं शकले नाहींत. त्या रात्रीं पार्वतीबाईंना एक क्षणहि झोंप आली नाहीं. गंगाधरपंतांनीं एकदोनदां विचारल्यावरून त्यांनीं आपलें डोकें दुखत असल्याचा बहाणा करून वेळ मारून नेली. जागें राहून त्या काय करणार होत्या ? आपल्या प्रेमाची एखादी व्यक्ति आजारी असली तर तिच्याबरोबर जागरण करून तिला क्वचित् तहान लागली तर तिच्या तोंडांत दोन थेंब पाणी घालण्याचें समाधान तरी आपणाला लाभतें, पण या परिस्थितींत जागें राहून पार्वतीबाईंना कसलें समाधान मिळणें शक्य होतें ? पण प्रत्येकाची प्रत्येक हालचाल समाधानासाठींच असते असा थोडाच सिद्धांत आहे ? आपणाला समाधान वाटेल म्हणून नव्हे किंवा आपणाला आपल्या लाडक्या मुलाला जी अप्रिय परिस्थिति प्राप्त होणार आहे त्यावर कांहीं उपाय सुचला तर पहावा म्हणूनहि नव्हे–पण त्यांना झोंपच येईना, मग त्या जागें रहाण्याखेरीज काय करणार ? आपल्या आवडत्या माधवाचें किंवा त्याला प्रिय वाटत असणाऱ्या यमूचें हित करण्यासारखी जर एखादी गोष्ट त्यांच्या हातीं असती तर ती करण्यास त्यांनीं यत्किंचितहि कसूर केली नसती. पण वैद्यकशास्त्रानें असाध्य ठरविलेला रोगी आपल्या प्रेमाचें माणूस असलें म्हणजे त्याच्याविषयीं वाटत असलेल्या आपुलकीच्या भावनेनें उत्पन्न झालेल्या काळजीमुळें ज्याप्रमाणें आपणास निद्रा लागूं शकत नाहीं त्याचप्रमाणें प्राप्त होणाऱ्या परिस्थितीला कलाटणी देण्यासारखें कोणतेंहि साधन आपल्या हातीं

नाहीं ही खात्री असूनहि, त्या दोन प्रेमळ व कोंवळया जीवांची ताटातूट होणार या एकाच खिन्न विचारानें त्यांच्या डोक्यांत थैमान मांडल्यामुळें त्यांची स्थिति अनिर्वचनीय झाली. प्रेमाचा जीव असाच वेडा असतो !

माधवाची स्थिति तर फारच केविलवाणी झाली होती. त्याला आणि यमूला निसर्गानें प्रेमबद्ध केलें होतें. त्यांच्या प्रेमांत मानवी मलिनता नव्हती. मानवी प्रेम स्वार्थरहित असणें सहसा शक्य नसतें. मानवी प्रेमसागरांत स्वार्थी कणांनीं दूषित झालेला एखादा बिंदु तरी सांपडावयाचाच ! पण माधव आणि यमू या दोघांचीं हृदयें निसर्गदेवतेनेंच ग्रथित केलीं होतीं—हा किंवा ही माझ्यासाठीं काय करील हा विचार त्यांच्या मनांत नसून मी त्याच्यासाठीं किंवा तिच्यासाठीं काय करूं शकेन हाच त्यांना विचार पडत होता. म्हणजे दुसऱ्यापासून आपणाला कोणत्या सुखाची प्राप्ति होईल, असल्या तामसी विचारांनीं त्यांचे मेंदू दूषित झालेले नव्हते तर आपण दुसऱ्याला किती सुख देऊं शकूं, या सात्विक विचारानें ते भूषित झालेले होते.

परमेश्वराच्या कारुण्याबद्दल व न्यायप्रियतेबद्दल माधवाच्या आईने त्याच्या मनावर लहानपणापासून बिंबविलेले संस्कार आतां डळमळूं लागले. परमेश्वर खरोखरच दयाघन व न्यायप्रिय असता तर एकमेकांना प्राणांहून प्रिय असणाऱ्या दोन व्यक्तींची ताटातूट होण्याचा राक्षसी प्रसंग त्यानें कसा आणला असता ? माधवाला आपल्या अंथरुणावर चैन पडेना. तो उठून बसला. कांहीं वेळानें तो खोलींतल्या खोलींत येरझारा घालूं लागला. तेवढया अवकाशांतील निराशामय विचारांनीं त्याची खात्री झाली कीं, परमेश्वर म्हणजे भाविकांच्या भोळया मेंदूची पैदास आहे—परमेश्वर ही एक कल्पना आहे—तें कांहीं सत्य नव्हे; आणि यदाकदाचित् परमेश्वर ही चीज अस्तित्वांत असलीच तर ती आपण आपल्या कल्पनेनें दिलेल्या जातीची असणें शक्य नाहीं. एवढेंच नव्हे तर परमेश्वराइतका क्रूरकर्मा तोच ! !

त्यानें दिवा मोठा केला. इतके दिवस तो स्वतःला श्रीरामचंद्राचा भक्त म्हणवीत असे. त्यानें आपल्या वडिलांकडून रामपंचायतनाची तसबीरहि मिळविली होती. त्या तसबिरीकडे तो आतां तिरस्कारानें पाहूं लागला. ती तसबीर त्यावेळीं जमिनीवर असती तर त्यानें तिचा लाथेनें चुराडाच उडविला असता. पण ती भिंतीचा आश्रय घेऊन असल्यामुळें बिचारीच्या कपाळची लाथ तरी चुकली ! त्यानें आपल्या मुठी वळल्या आणि त्या तसबिरीवर प्रहार करण्यासाठीं तो जवळ गेला. आपल्या मुठीचा तो प्रहार करणार इतक्यांत श्रीरामचंद्राची ती शांत व हास्यपूर्ण मुद्रा त्याला दिसली व त्याचा हात लुला पडला. आतां आपण या तसबिरीवर आघात केला तर आंतील राम कायमच राहील पण आपला हात मात्र काचेच्या तुकड्यांनीं रक्तबंबाळ होईल हा विचार आपल्या डोक्यांत आला नाहीं म्हणूनच राम आपल्याला खिजवतो आहे असें त्याला वाटलें. तेव्हां तर त्याचें डोकें अधिकच भडकलें. त्यानें हातांत हातोडी घेतली आणि ती तसबिरीवर मारण्यासाठीं तो धांवला. तरी राम हंसतच होता. रामावर तो अधिकच चिडला. आतां तो हातोडी मारणार इतक्यांत त्याचें लक्ष रामाच्या उजव्या हाताकडे गेलें. तो आपणास 'थांब—' असें सांगत आहे असा त्याला भास झाला. 'थांबूं कशासाठीं ? आजपर्यंत मी तुझी मनोभावानें भक्ति केली त्याचं मला काय फळ मिळालं ? तुझी भक्ति करण्याचा मूर्खपणा यापुढें कोणाच्याहि हातून घडूं नये म्हणून आज मी तुझा चुराडाच उडवून टाकणार आहें !' इतक्यांत रामाच्या वामांकावर बसलेल्या सीतामाई आपल्याकडे बघत आहेत असें त्याला वाटलें. त्या सतीची ती सात्विक मुद्रा पाहून त्याचा राग लुप्त झाला व तो त्या देवीकडे आदरानें पाहूं लागला. ती आपणाशीं कांहीं तरी बोलत आहे असें त्याला वाटूं लागले. 'ज्या मुलीवर तूं एकनिष्ठेनें व निःस्वार्थपणें प्रेम करीत आहेस ती तुझ्यापासून आतां दूर होणार या क्षुल्लक संकटानें तुझ्यासारख्या एका आर्यांच्या वंशजानें इतकें भांबावून जावें ? मग आमची भक्ति करून तूं शिकलास काय ? माझ्या पतिदेवांना प्रत्यक्ष

श्रीविष्णूचा अवतार मानतात ना ? माझी महापतिव्रता म्हणून गणना होते व माझा पति एकपत्नीव्रताचें खडतर आचरण करणारा म्हणून लोकप्रसिद्ध आहे. पण आम्हांवरहि एकमेकांपासून दूर होण्याचा प्रसंग आलाच कीं नाहीं ? आम्हां दोघांपैकीं कोणी आपल्या कर्तव्यापासून व धर्मापासून क्षणमात्र तरी च्युत झालें होतें काय ? मग आमच्यावर असा प्रसंग कां आला ? वेड्या, आमच्यावर असा प्रसंग येता ना तर खरी पतिव्रता आर्यस्त्री व मूर्तिमंत पुरुषार्थ हीं दोन महान दृश्यें जगाला कशीं पहावयास मिळालीं असतीं ? त्रिभुवनात अजिंक्य म्हणून गणल्या गेलेल्या रावणासारख्या महावीराच्या कारावासांत मी एकाकी असतांहि, माझें पातिव्रत्य कायम टिकवूं शकलें व माझ्या पतीनें यःकश्चित् वानरांच्या सहाय्यानें चौदा चौकड्यांच्या त्या धन्याला धारातीर्थी लोळविलें ! खऱ्या आर्यकन्येला एकच पति माहीत असतो व खरा आर्य फक्त आपल्या पत्नीसाठींच पुरुषार्थाची सीमा गांठतो. यमूला व तुला विधात्यानें ही संधीच आणून दिली आहे. ही तुमच्या दिव्य प्रेमाची कसोटी आहे. प्रत्येक गोष्ट तुमच्या मनाप्रमाणें घडत गेली तर तुमच्या जीवनांत काव्य तें काय राहिलें ? ज्या जीवनांत काव्य नाहीं तें जीवन तरी कसलें ? आपल्या मनाविरुद्ध गोष्टी घडत असतात त्याच वेळीं आपण कोण हें जगाला दाखविण्याची संधि आपणांला मिळत असते. तुझ्या अंगांत आर्याचें म्हणजेच अस्सल मर्दाचें जातिवंत रक्त खेळत असेल तर तूं या कसोटीला उतरशील व जगांत धन्य होशील. माझा तुला पूर्ण आशीर्वाद आहे.'

खरें पाहिलें तर हें सर्व विचार माधवाच्याच मनांत चाललेले होते. पण कोणीतरी अदृश्य शक्ति आपणाशीं बोलत आहे असा त्याला भास होत होता. त्यानें आतां डोळे उघडले. त्याला अननुभूत उल्हास वाटूं लागला. त्यानें त्या तसबिरीला वंदन केलें व म्हणाला, " सीतामाते, तूं मला—निराशेनें किंकर्तव्यमूढ बनलेल्या या बालकाला—योग्य वेळीं योग्य उपदेशामृत पाजलेंस याबद्दल मी तुझा फार आभारी आहे. प्राप्त झालेल्या प्रसंगाचा मी योग्य उपयोग करून घेईन. कांहीं

लोकांच्या दृष्टीनें माझें वर्तन दोषास्पद ठरलें तरी लोकापवादाला मी भीक घालणार नाहीं. यासंबद्दल मला पूर्ण विश्वास आहे. या काळींसुद्धां खरी आर्य स्त्री व खरा आर्य पुरुष असूं शकतात हें आम्ही जगाच्या प्रत्ययाला आणून देऊं, हीच माझी तुझ्या पायाशी प्रतिज्ञा !"

माधवानें दिवा बारीक केला. त्याचें मन यावेळीं इतकें पवित्र झालें होतें कीं, थोड्याच क्षणांत त्याला गाढ झोंप लागली.



## ‘ ताटातूट ’— ५

ज्याच्या विषयीं आपणाला प्रेम वाटत असतें त्याच्या सामर्थ्याबद्दल आपल्या कांहीं तरी विलक्षणच कल्पना असतात. हा आपला मूर्खपणाच असतो असें कांहीं म्हणतां येणार नाहीं. हा आपल्या निरतिशय प्रेमाचाच परिणाम असतो. आपल्या आईनें आपल्या वडिलांचें मन वळविण्याचें कबूल केलें आहे एवढ्याच समाधानानें यमूला गाढ झोंप लागली. आपल्या बापाजवळ आपल्या आईची कांहींच किंमत नाहीं, हें त्या बिचारीला काय माहीत !

पहांटेच्या वेळीं आपल्या पाठीवरून कोणीतरी प्रेमळपणें हात फिरवीत आहे असा तिला भास झाला. त्याबरोबर तिला हुंदकेहि ऐकूं आले. तिनें डोळे उघडले व ‘ आई ’ म्हणून हांक मारली.

“ हळूं बाळ, मोठ्यानें बोलूं नकोस,” रमाबाई म्हणाल्या.

“ काय म्हणाले काका ?”

“ त्यांनीं कालचाच बेत नक्की केला. माझ्या विनवणीचा कांहीं देखील उपयोग झाला नाहीं.”

आपल्याशिवाय आपल्या आईला एक क्षणहि करमत नाहीं, मग आतां इतके दिवस आपण तिला सोडून जाणार, तेव्हां तिची स्थिति काय होईल या विचारानें यमूला रडें येऊं लागलें.

' ताटातूट '–

" आई, तुला आतां कोणाची करमणूक होणार ?"

" बाळ, मला माझी काळजी वाटत नाहीं. तिकडे तुझी काळजी घ्यायला मी नाहीं तेव्हां तुझं कसं होईल याचीच मला चिंता वाटते आहे. तूं आपल्या अंगच्या गुणांनीं नवीन परिचयाच्या माणसांनाहि आपलींशीं करून टाकशील याविषयीं मला खात्री वाटते. पण वेड्या मायेचा जीव रहातच नाहीं."

" आई, तूं माझी काळजी करूं नकोस. मी आतांपासून सासरींच गेलें आहें असें मी समजेन. काकांचीच तशी इच्छा आहे, मग आपण तरी काय करणार, नाहीं का ?"

गोविंदरावांना गाढ झोंप लागली आहे अशी रमाबाईची कल्पना होती. पण त्यांना झोंप लागणें शक्य तरी होतें का ? सदसद्विवेकबुद्धि काळजाला एकसारखे भाले मारीत असतां मेंदूला स्वस्थता मिळणें कसें शक्य आहे ! आपला विवाह झाल्यापासून आपलें आपल्या धर्मपत्नीशीं कसें आचरण आहे याचें त्यांना आजपर्यंत विस्मरण झालें होतें अशांतील मुळींच भाग नाहीं. पण ती आपली हरामखोरी आज त्यांना विशेष जाणवूं लागली होती. आपल्या पत्नीचा प्रत्यक्ष असा यत्किंचितहि अपराध आपण पाहिला नसतांना आपण तिचा अनन्वित छळ केला या जाणीवेनें त्यांना किंचित् वाईट वाटूं लागलें. एखाद्या सरळ मनोवृत्तीच्या माणसाला आपल्या नीच कर्माचा पश्चात्ताप झाला म्हणजे तो पुनः तसलें नीच कर्म न करण्याची शपथ वहातो व प्रत्यक्ष सत्कृत्यानें शुद्ध होतो. परंतु गोविंदरावाचा स्वभाव मनस्वी जिद्दखोर होता. आपल्या हातून चूक झाली आहे किंवा होत आहे हें कळून आल्यानंतरहि ती दुरुस्त करणें म्हणजे त्यांना स्वतःची भयंकर मानहानि वाटत असे.

" हो–हो–तशीच माझी इच्छा आहे, मग काय म्हणणं आहे तुम्हां मायलेकींचं ?" गोविंदराव संतापानें चिडून पण दांत चावून दाबलेल्या आवाजांत पिचावले.

कांहीं तरी बोलावें असें रमाबाईंच्या मनांत आलें होतें. परंतु आपलें बोलणें वायां जाणार ही त्यांची खात्री असल्यामुळें त्यांनीं आपली जीभ आंवरली.

"कां ? दांतखिळी कशानं बसली ? उघडायला पाहिजे वाटतं ?" गोविंदराव स्फुरावून पण आवाज दाबून गरजले. तरीहि रमाबाई कांहींच बोलेनात. गोविंदरावांचा पारा अधिकच चढला. ते वस्कन् त्या मायलेकींच्या अंगावर घुमले. रात्रीं त्यांच्या तावडींत रमाबाई एकट्याच सांपडल्या होत्या व यमू सुटली होती म्हणूनच कीं काय न कळे, त्या बिचारीचा त्यांनीं जोरानें गालगुच्चा घेतला. ती बिचारी पोर अगदीं कळवळून गेली. आतां मात्र रमाबाईंना स्वस्थ रहावेना.

"पण आम्ही आपल्या मर्जीप्रमाणें वागायला तयार आहोंत ना ? मग त्या बिचारीचे आणखी हाल कां करायचे ?"

"तूं पुनः आपल्या मूळपदावर आलीस का ? आणखी हाल करायचे म्हणजे काय ? असलं चोरटं बोलणं मला समजत नाहीं, अशी तुझी समजूत आहे वाटतं ? मी हिला पुण्याला पाठवीत आहें हे मी तिचे हालच करतों आहें, नाहीं का ? उद्यां ती चांगली शिकलीसंवरली आणि सर्व लोक तिची वाहवा करूं लागले म्हणजे तूंच म्हणशील—"

"मग कशाला ? मी तर आत्तांच पाहिजे तर कबुलीजबाब लिहून देतें कीं, यमूबद्दल माझ्यापेक्षां इकडेच अधिक काळजी वाटते म्हणून !"

"वा—वा—फार समजूतदार बायकोच कीं नाहीं तूं ? रात्रींची मात्रा बरोबर लागूं पडली म्हणायची !" असें म्हणून गोविंदराव इतक्या बेशरमपणें हंसले कीं, त्यांची पत्नी या नात्यानें रमाबाईखेरीज दुसरी कोणी स्त्री असती तर तिला त्यांचा खात्रीनें संताप आला असता. पण रमाबाई फार पुराणमतवादी पतिव्रता होत्या. पति म्हणजे देव, त्याच्याशीं कायेनें, वाचेनें किंवा मनानेंहि विरोध कसा करावयाचा ?

कांहीं वेळानें चांगलें दिसूं लागलें. सर्व जगाला जागें होण्याची इशारत देणें एवढेंच त्या बिचाऱ्या सूर्यनारायणाचें काम! त्याच्या उदयाबरोबर सर्व लोक आपल्या कामाला लागतात. सज्जन आपल्या सत्कृत्यांस सुरुवात करतात त्याच-प्रमाणें दुर्जनहि आपल्या दुष्कृत्यांचा प्रारंभ त्याच मुहूर्तावर करीत असतात. पण दुष्टांना शासन करण्यासाठीं म्हणून आपण आपलें तोंड एक दिवस दाखविलेंच नाहीं तर बिचाऱ्या सुष्टाचे विनाकारण हाल व्हावयाचे हें त्या महात्म्याला माहीत असतें! म्हणूनच आपला उदय झाल्याबरोबर यमू व माधव या दोन निरपराध व प्रेमळ जीवांची, गोविंदराव आपल्या नीच लहरीनुसार ताटातूट करणार हें पक्कें माहीत असूनहि त्यानें आपलें उगविण्याचें कर्तव्य केलेंच!

आत्याबाईनीं आपल्या निघण्याची झटपट तयारी केली व यमूची तयारी करण्यासहि त्यांनीं आळस केला नाहीं. स्टेशनवर जाण्यासाठीं यमूला घेऊन यजमानांसह त्या गाडींत बसल्या.

त्या वियोगाच्या वेळीं त्या मायलेकींची काय स्थिति झाली ती त्यांची त्यांनाच माहीत. माया वेडी असते. निरपेक्ष माया जितक्या प्रमाणांत अधिक तितक्या प्रमाणांत दुःख करण्याचे प्रसंगहि अधिक येत असतात. आपल्या पोटचा गोळा आपल्यापासून दूर होणार, कदाचित् कायमचा दूर होणार, ही जाणीव झाल्यानंतर मातेच्या हृदयाला किती यातना होत असतील हें कोणाहि सहृदय माणसाला सांगायला नको. आपल्यावर जिवापाड प्रेम करणाऱ्या आपल्या आईला सोडून आपणाला जावें लागत आहे—आपला पिता म्हणविणाऱ्या एका दुष्ट माणसाच्या हट्टाग्रहामुळें आपणाला आपल्या आईच्या प्रेमास मुकावें लागत आहे, हें मनांत येऊन यमूला प्राण कंठीं आल्यासारखें वाटूं लागलें. पण तिच्या आईनें आदल्या दिवशीं, 'तूं जातांना आपला चेहेरा आनंदी ठेव, म्हणजे मला तेवढेंच समाधान वाटेल' असें तिला सांगितलें होतें याचा तिला विसर पडला नव्हता. वय इतकें लहान असूनहि समजूतदारपणांत तिनें वडील

माणसांनाहि धडा घालून दिला असता. अर्थात् आपल्या मनांत उडालेली करुणास्पद कालवाकालव आपल्या चेहेऱ्यावर उमटूं न देण्याची सावधगिरी बाळगीत असतांना तिला फारच कष्ट पडत होते. पण त्यामुळें आपल्या आईला बरें वाटणार आहे तेव्हां ते कष्ट आपणाला सहन केलेच पाहिजेत असा तिचा निश्चय होता.

"ये हो यमू—" असें ज्यावेळीं निरोप देतांना रमाबाईनीं म्हटलें व ते शब्द उच्चारतांना त्यांच्या आवाजांत उत्पन्न झालेला कंप व गहिंवर तिच्या कानांत शिरून तिचें चिमुकलें कोंवळें हृदय ज्यावेळीं चिरलें गेलें तेव्हां मात्र तिनें इतका वेळ कडेलोटाचा प्रयत्न करून दाबून ठेवलेला अश्रूंचा बांध फुटून ते सैरावैरा धांवूं लागले. तिचें नशीबच म्हणावयाचें कीं, त्याचवेळीं घोडा चालूं लागला व त्यामुळें तिच्या गालावरून वहात असलेले अश्रूंचे ओघळ तिच्या आईला दिसले नाहींत. यमूला तेवढयानेंहि समाधान वाटलें. कांहीं क्षणानीं तिला आणखी एका व्यक्तीची आठवण झाली. आजपासून मी त्याच्या जवळ-जवळ कायमची दृष्टिआड होणार हें माहीत असूनहि माधव मला नुसता निरोप द्यायलासुद्धां कसा आला नाहीं याचें तिला राहूनराहून आश्चर्य वाटूं लागलें. तो अजून निजलेलाच असेल का? कारण तो फार झोंपाळू आहे. पण मी आज जाणार तेव्हां माझ्यासाठीं एक वेळ—व ती वेळ म्हणजे जवळजवळ शेवटचीच—आपल्या निद्रासौख्याचे कांहीं क्षण फुकट दवडणें हें त्याचें कर्तव्य नव्हतें का? पण हें कांय मलाच कळतें व त्याला कळत नाहीं? मी आज जाणार असें काल त्याला मी सांगितलें तेव्हां त्याचा चेहेरा किती सुकून गेला? माझ्यावर तो किती बरें प्रेम करतो? हां—असेंच असेल. माझें दुःख मला आंवरतां येणार नाहीं व माझा रडका चेहेरा पहाण्याचा प्रसंग त्याच्यावर येईल या भीतीनेंच त्यानें मला निरोप देण्याचें टाळलें असेल! पण नाहीं—हेंहि शक्य वाटत नाहीं. कारण त्याची भेट न झाल्यामुळें मला किती वाईट वाटेल याची त्याला पूर्ण जाणीव आहे; आणि ज्यामुळें मला दुःख होईल अशी

कोणतीहि गोष्ट माझ्या माधवाच्या हातून घडणें शक्यच नाहीं. मग त्यानें मला निरोप देण्यास न येण्याचें कारण तरी काय असावें ? तिला कांहीं कल्पना करतां येईना. तिच्या कितीदां तरी मनांत आलें कीं, आत्याबाईंना, मला माधवाला भेटावयाचें आहे असें सांगून टाकावें. पण तसें करण्यास तिला संकोच वाटूं लागला—भीति वाटूं लागली—लाज वाटूं लागली ! आत्याबाईंना तसें सांगण्यास आपणांस लाज कां वाटावी याचें तिला नवल वाटलें. आपणाला लाज तरी कसली वाटते ? आईला भेटावयाचें आहे असें म्हणतांना लाज वाटते पण ती निराळ्या प्रकारची. एवढी मोठी झालीस तरी आईचा मोह कांही तुला सुटत नाहीं ना, असा प्रश्न आपणाला आत्याबाई विचारतील अशा भीतीमुळें उत्पन्न झालेली ती लाज होती. पण माधवाची भेट घेण्याची इच्छा आहे असें सांगण्यास तिला ज्या प्रकारची लाज वाटत होती तो प्रकार तिच्या परिचयाचा नव्हता. हा एक नवीनच अनुभव तिला आला. गाडी चालूच होती. यमू स्टेशनच्या प्लॅटफॉर्मवर जाऊन पोहोंचली तरी माधवासंबंधाचे विचार कांही तिला सोडीनात ! ती गाडीच्या डब्यांत जाऊन बसली. इतक्यांत माधवासारखा दिसणारा एक मुलगा प्रत्येक डब्यांत वांकून पाहून व निराशा झाल्यामुळें खिन्न चेहेरा करीत येत असलेला तिला दिसला. मनुष्य ओळखण्याइतक्या अंतरावर तो येतांच, तो माधवच असल्याबद्दल तिची खात्री झाली. तिच्यानें आतां धीर निघणें शक्य नव्हतें. तिनें एकदम हांक मारली–“माधव–”

स्टेशनवर बरीच गर्दी होती. उतारूंची धांवपळ व हरतऱ्हेच्या वस्तू विकणारांची आरडाओरड सुरू होती. तरी सुद्धां यमूची हांक माधवाला ऐकूं आली. तिचा आवाज त्यानें बरोबर ओळखला. दुसऱ्या कोणी त्याहून कमी अंतरावरून व अधिक मोठ्या आवाजांत त्याला हांक मारली असती तर ती त्याला ऐकूं गेलीच असती असें नाहीं. पण यमूची हांक मात्र त्यानें इतक्या लांबूनहि ऐकली व ओळखली. तो धांवतच तिच्या डब्याशीं गेला व खिडकीच्या बाहेर आलेलीं तिचीं बोटें त्यानें लडिवाळपणें आपल्या हातांत धरलीं. त्याच्या त्या

हाताचा स्पर्श झाल्याबरोबर यमूला आपल्या सर्व अंगांत वीज संचारल्याचा भास झाला. तिच्या अंगाला कंप सुटला. त्या कंपामुळें माधवाच्या हातालाहि निराळ्या तऱ्हेची भावना झाली. आपल्या अंगांत कांहीं तरी दैवी सामर्थ्य संचारल्यासारखें त्याला वाटूं लागलें. त्यानें मृदु आवाजांत हांक मारली–"यमू–"

त्याच्यानें पुढें बोलवेना. आपली जीभ आंतून कोणीतरी ओढून धरीत आहे असें त्याला वाटूं लागलें. हें असें काय होत आहे त्याला कांहीं समजेना. आपल्या मनांतून यमूशीं कितीतरी बोलावयाचें आहे पण आपल्या तोंडून शब्दच बाहेर पडूं शकत नाहीं याचा त्याला मनस्वी राग आला. त्याची नजर यमूच्या चेहेऱ्यावर खिळून बसली होती. यमूचे डोळे तर आपल्याला गिळून टाकीत आहेत असा त्याला भास होत होता. आजपर्यंत त्यांनीं एकमेकांकडे थोडे वेळां का पाहिलें होतें ? पण आजच्या त्यांच्या पहाण्यांत कांहीं तरी विलक्षण जादू भरलेली होती. एकमेकांशीं प्रत्येक बोलण्यापेक्षां एकमेकांशीं डोळ्यांची मूक भाषा करण्यांतच त्यांना अधिक समाधान वाटूं लागलें. सिग्नल पडला. गार्डाच्या शिटीमागून लगेच गार्डीनें कर्कश शीळ फुंकली. गाडी चालू झाली. त्याबरोबर माधवानें यमूचीं घट्ट धरून ठेवलेलीं बोटें सुटलीं. दोघांनीं एकमेकांचा डोळ्यांनीं निरोप घेतला. माधवाच्या रोमरोमांत यमू संचरली होती व यमूचें सारें शरीर व मन माधवानें व्यापून टाकलें होतें. यापुढें एकटा माधव किंवा एकटी यमू यांचें अस्तित्व राहिलें नाहीं. दोघांनीं आपला अर्धा भाग दुसऱ्याला देऊन टाकला होता. दोघेंहि एकमेकांचें 'अर्धांग' झालीं होती !

माधव खालीं मान घालून खिन्न वदनानें आपल्या घरीं निघाला. आपलें शरीर फक्त येथें राहिलें असून त्यांतील चैतन्य यमूच्या रूपानें निघून गेलें आहे असें त्याला वाटूं लागलें. आतां हें शरीर अशा निर्जीव अवस्थेंत धारण करून ठेवण्यांत तरी अर्थ काय ! आत्महत्त्येचा विचारहि त्याच्या मनांत आला. पण आदल्या रात्रींच्या प्रसंगाची त्याला आठवण झाली व बहकूं पहाणाऱ्या

आपल्या मनाला त्यानें आंवरून धरलें. त्याची ही मात्र खात्री झाली कीं, यापुढें आपणाला निस्तेज अवस्थेंतच या जगांत दिवस कंठावे लागणार. आपल्यामधील तेजाचा उगम यमूपासूनच झाला होता व तो उगमच नाहींसा झाल्यावर प्रवाहाची आशा तरी कशाला बाळगावयाची, असें त्याला वाटूं लागलें.

तिकडे यमूचीहि तीच अवस्था झाली. आपलें निर्जीव शरीर गाडींतून पुण्याच्या मार्गानें जात असून आपला प्राण माधवाचें शरीर धारण करून मुंबईत राहिला आहे असें तिला वाटूं लागलें. असल्या निर्जीव पुतळीच्या हातून आतां काय होणार ? परमेश्वरी संकल्प असेल तितके दिवस लौकिकदृष्ट्या जगावयाचें इतकेंच !

हा वेळपर्यंत सत्यभामाबाई व मुरलीधरपंत यांनीं, जणूं काय, कांहीं घडलेंच नाहीं व घडलें असलें तरी त्यांत आपल्यासारख्या थोरांनीं लक्ष घालण्यासारखें कांहींच नाहीं अशा प्रकारची बेफिकीर वागणूक चालविली होती. पण गाडी चालू झाली व यमू आतां सर्वस्वीं आपल्या ताब्यांत आली अशी खात्री होतांच त्यांनीं आपापलीं शस्त्रास्त्रें सरसावण्यास सुरुवात केली.

"हा कोण ग स्टेशनावर आला होता, यमू ?" सत्यभामाबाईनीं पहिला प्रश्न टाकला.

यमू आपल्याच विचारांत गढून गेली असल्यामुळें आत्याबाईचा प्रश्न तिला ऐकूं आला नाहीं.

"कान फुटले वाटतं ? ओढून लांब करूं का थोडे, म्हणजे नीट ऐकूं येईल !"

आतां मात्र, आत्याबाईनीं आपणाला कांहीं तरी विचारलें होतें व आपण आपल्याच तंद्रींत असल्यामुळें आपण त्यांना उत्तर दिलें नाहीं म्हणून यमूला ओशाळल्यासारखें झालें. ती आत्याबाईकडे नुसती पहातच राहिली.

" अग, अशी वेंधळ्यासारखी माझ्या तोंडाकडे पहात काय राहिलीस ? चित्रं का काढलीं आहेत कसलीं माझ्या चेहऱ्यावर ? "

" आत्याबाई, मघांशीं तुम्ही काय विचारलंत तें मी ऐकलंच नाहीं हो ! "

" मग हें तर मला माहीतच आहे; आणि म्हणूनच तर तुझे कान जरा लांब करूं का म्हणून तुला विचारलं. अशा कोणत्या विचारांत तूं अगदीं तल्लीन झाली होतीस ? "

" माधवबद्दल-माधवबद्दल माझे विचार चालले होते-"

यमू थोडी अधिक जाणती असती तर आपले विचार कोणासंबंधानें चालले आहेत हें तिनें इतक्या सरळपणें सांगितलें असतें कीं नाहीं याची शंका आहे. बालपणींच्या निर्व्याज व शुद्ध अंतःकरणांत आणि तारुण्यांतील जाणत्या अंतःकरणांत हाच फरक असतो. म्हणजे तरुणतरुणींचीं अंतःकरणें शुद्ध व सरळ असतच नाहींत किंवा मलिनच असतात असें नव्हे. निव्वळ शुद्धतेच्या दृष्टीनें विचार केला असतां लहान बालकाइतकेंच शुद्ध अंतःकरण असलेलीं कित्येक तरुण माणसें आपणांस पहावयास सांपडतील. पण अशा दोन्ही प्रकारचीं अंतःकरणें आपण आपल्यासमोर धरलीं तर त्यांमध्यें आपणांस जमीन-अस्मानाची तफावत दिसल्याशिवाय रहाणार नाहीं. बालकांच्या अंतःकरणांत संकोचाची अगर भीडेची छटासुद्धां नसते. आपलें कोणावर प्रेम आहे अगर आपलें हृदय कोणी व्यापून टाकलें आहे हें जाहीर करतांना त्यांच्या मनाला यत्किंचितहि संकोच वाटत नाहीं. आपण आपलें मन प्रकट केलें तर त्याचा कांहीं विपरीत परिणाम तर होणार नाहीं ना, लोक आपल्यावर भलतीसलती टीका तर करणार नाहींत ना, हा विचार त्यांच्या मनाला शिवत सुद्धां नाहीं. पण तरुणांची गोष्ट याच्या अगदीं उलट असते. त्यांच्या स्वतःच्या मनांत पापबुद्धि असतेच असें नाहीं. पण लोक आपल्यावर कोणत्या हीन प्रकारचा आरोप करतील किंवा आपल्यासंबंधीं कसल्या कुत्सित टीका करतील याची

त्यांना कल्पना असते; आणि ही कल्पना असल्यामुळेंच आपल्या प्रेमाचें माणूस जगाला जाहीर करतांना त्यांना संकोच वाटतो. खरें पाहिलें असतां अशा प्रकारच्या भीतीमुळें त्यांच्या मनांतील प्रेमरज्जु ढिला पडतो अशांतील मुळींच भाग नाहीं. उलट, तो मनुष्य तेजस्वी असला तर तो रज्जु अधिकच बळकट होत असतो.

यमूनें आपल्या मनांतील विचार सरळपणें सांगितले. पण आत्याबाईच्या नागमोडी मनाला मात्र तें एक भक्ष्यच मिळालें.

"म्हणजे ! या वयांत का हे असले थेर तुला करतां येऊं लागले ! मग वळण लागण्यासाठीं म्हणून तुझ्या बापसानें तुला माझ्याबरोबर पाठविली ती बरोबर ! आम्हाला नव्हते ग बाई या एवढ्याशा वयांत असले भलभलते थेर करतां येत ! "

यमूला आत्याबाईच्या बोलण्याचा रोखच समजेना. माधव आपणाला भेटायला आला व आपण त्याचा प्रेमानें निरोप घेतला, यांत आपण थेर ते कसले केले ? ती गांगरली. तपकिरीची चिमूट नाकांत कोंबीत मुरलीधरपंत बोलते झाले,

"कशी घुम्म बसली आहे पहा ! काय ग, हा माधव कोण आणि थेट स्टेशनपर्यंत हा कशाला आला होता ? "

"तो आमच्या शेजारींच रहातो. मला आणि आईला तो भारी आवडतो—"

"तुला तो आवडतो हें तर मी आत्तां प्रत्यक्षच पाहिलं ! पण तो तुझ्या आयशीला देखील का आवडतो ? मग बरोबर गोविंदाचं तिच्याशीं असं तुसडं वर्तन आहे तें ! मी इतके दिवस वेड्यासारखी आपली त्यालाच डोकंफिरू म्हणत होतें ! काय ग बाई तरी ! ऐकावं तें आपलं एकेक नवलच हो नाहीं म्हटलं तरी ! " असें म्हणून आत्याबाईनीं 'हं:' असा सुस्कारा सोडला.

आत्याबाईचें हें बोलणें यमूला कसें समजावें ? ज्या माउलीनें देवाब्राह्मणांच्या साक्षीनें हात धरलेल्या माणसाला तो आपला भूलोकींचा देव या पूज्य भावनेनें पूजिलें, प्रत्येक बाबतींत आपणाशीं त्याची होत असलेली वंचनेची वागणूक पाहूनाहि आपल्या त्याच्याविषयींच्या कर्तव्यपालनांत यत्किंचितहि कसूर केली नाहीं, तो आपल्या कर्तव्यांत सर्वस्वीं चुकत असल्यामुळें त्याच्याशीं दिलफरकानें वागण्याचा तिला पूर्ण अधिकार प्राप्त झाला असतांहि त्या अधिकाराची अंमलबजावणी करणें जिनें पापास्पद मानलें, तिच्याविषयीं असें कुजकें बोलून ती जखीण कोणता मोक्ष साधणार होती हें तिलाच किंवा परमेश्वरालाच माहीत ! माधव ही व्यक्ति कोण किंवा त्याचें वय काय हें आत्याबाईंना माहीतच नसतें तर या त्यांच्या बोलण्यावरून, कोणताहि पुरुष व कोणतीहि स्त्री एकमेकांवर कोणत्याहि जातीचें प्रेम करणारीं असलीं तरी त्याचा आपल्या नीच विचारसरणीला अनुसरून पाजीपणाचा अर्थ करणारांच्या सांच्यांत तरी त्यांना बसवितां आलें असतें ! पण रमाबाईंचा मुलगा शोभण्याइतका व सतरा वर्षें वयाच्या त्या सात्विक बालकाला प्रत्यक्ष पाहून सुद्धां त्यांना असल्या प्रकारचे हलकट विचार आपल्या काळया कुळकुळीत काळजांतून आपल्या चवचाल जिभेवाटें काढण्यास यत्किंचितहि शरम वाटली नाहीं त्याअर्थी सत्यभामाबाईंना घडवितांना ब्रह्मदेवानें कांहीं तरी जादा कसब उपयोगांत आणलें असलें पाहिजे असेंच म्हणावें लागतें. सारा जन्म असल्या नरकघाणींत घालविला असल्याशिवाय अशा भलत्याच मार्गानें मेंदु काम करूं शकत असेल असें वाटत नाहीं. यमूला बिचारीला आत्याबाईच्या बोलण्यांतील खोंच न कळल्यामुळें त्यांनीं विचारलेल्या प्रश्नाला आपण उत्तर दिलें एवढेंच तिला वाटलें. पुण्यास जाऊन पोहोंचेपर्यंत त्या नरनारींनीं त्या कोमल व अजाण बालिकेवर आपल्या कठोर वाग्बाणांचे असंख्य प्रहार केले. परंतु यमूच्या बालिश अज्ञानाच्या कवचानें तिचें संरक्षण केलें. परमेश्वर कोणाचें कसें रक्षण करतो हें कांहीं

सांगतां येत नाहीं. असल्या घाणेरड्या विषयाचें अज्ञानच यावेळीं यमूचें संरक्षण करूं शकलें. नाहीं तर आपल्या प्रिय माणसांवर केलेले असले नीच आरोप ऐकून घेऊन, प्रत्यक्ष प्रतिकार करणें अशक्य झाल्यावर, निदान डब्याच्या बाहेर उडी टाकून जीव देण्याची तरी इच्छा तिला झालीच असती !



## छळाला सुरुवात— ६

माधव घरीं येतो तों गंगाधरपंत आपलीच वाट पहात बसले असल्याचें त्याला दिसलें. माधव सकाळीं उठल्याबरोबर कोठें आणि कशासाठीं गेला असावा याबद्दल त्यांना कांहींच तर्क करतां येईना. कारण कोठेंहि कशासाठींहि जावयाचें झालें तरी आपण कोठें जातों हें सांगून जाण्याची माधवाची वहिवाट होती. माधव कोठें गेला होता हें पार्वतीबाईंना मात्र माहीत होतें. गोविंदरावांच्या घरांत सारखा वावर सुरू असल्यामुळें व गोविंदरावांना माधवाबद्दल कितीसा लोभ वाटतो हें त्यांना पुरतेपणीं माहीत असल्यामुळें माधवाला त्यांच्या घरीं जाऊन यमूशीं दोन शब्द बोलण्याची संधि मिळणें शक्य नाहीं हें त्यांस ठाऊक होतें. म्हणूनच त्यांनीं माधवाला परस्पर स्टेशनवर जाण्याची युक्ति सुचविली होती. गंगाधरपंतांनीं पार्वतीबाईजवळ माधवाबद्दल चौकशी केली होतीच पण पार्वतीबाईंनीं त्यांना जाणूनबुजूनच उडवाउडवीचें उत्तर दिलें होतें. कारण माधवावर गंगाधरपंतांचें प्रेम असलें तरी गोविंदरावांशीं त्यांचें बरें नसल्यामुळें यमूविषयींच्या त्यांच्या मतावरहि प्रतिकूल परिणाम झालेला होता हें पार्वतीबाईंना पक्कें माहीत होतें; व म्हणून माधव यमूला निरोप देण्यासाठीं स्टेशनवर गेला हें त्यांना समजलें तर ते त्याच्यावर रागावल्याशिवाय रहाणार नाहींत ही त्यांची खात्री होती. आपल्या पतीशीं खोटें बोलणें—पतीशींच काय, पण कोणाशींहि खोटें बोलणें—हें पाप आहे हें पार्वतीबाईंना

समजत नव्हतें असें नाहीं. पण आपण कशासाठीं खोटें बोलत आहोंत याची त्यांना जाणीव होती. माधव कांहीं अयोग्य कामासाठीं गेला असता व तो कोठें गेला आहे हें माहीत असूनहि ' माहीत नाहीं ' असें सांगणें हें पाप झालें असतें. पण माधव आपल्या प्रेमी व्यक्तीचा निरोप घेण्यास गेला होता. ती व्यक्ति आपल्या पतीच्या दृष्टीनें कदाचित् प्रेम करण्यास योग्य नसेल. पण माधवाच्या दृष्टीनें तरी ती तशी होती कीं नाहीं ? निष्कपट व निर्व्याज प्रेम ही दैवी भावना आहे— हा दैवी प्रसाद आहे. मानवांच्या आकुंचित दृष्टीला त्यांत कांहीं दोषास्पद वाटलें तर तो दोष कांहीं त्या भावनेचा नव्हे किंवा त्या व्यक्तींचाहि नव्हे. प्रेम ही एकच भावना परमेश्वराला प्रिय आहे. मात्र ती सात्त्विक व निर्मळ पाहिजे. माधव आणि यमू यांची अशीच भावना होती हे पार्वतीबाईंना माहीत असल्यामुळें, अशा वेळीं खोटें बोलणें हें पातक तर नाहींच पण उलट तें आपलें कर्तव्यच आहे असें त्यांना वाटत होतें.

"कां रे माधव, एवढ्या सकाळींच कुठें गेला होतास बाहेर ? " माधवाला आलेला पाहून गंगाधरपंतांनी कांहींशा गंभीरपणानें प्रश्न केला.

" स्टेशनवर – " अगदीं निर्विकार मुद्रेनें माधवानें उत्तर दिलें.

" स्टेशनवर ? स्टेशनवर कशाला ? "

" यमूचा निरोप घ्यायला—"

" यमूचा निरोप ? म्हणजे ? मी नाहीं समजलो याचा अर्थ ! "

" नाना, यमू आपल्या आत्याबाईच्या बरोबर जवळजवळ कायमची पुण्यास रहाण्यासाठीं गेली आहे. ती मला पुनः केव्हां भेटेल हें सांगतां येण्यासारखें नसल्यामुळें मी तिचा निरोप घेण्यासाठीं स्टेशनवर गेलों होतों. "

" पण एवढा खटाटोप करण्याचं तुला कारणच काय होतं ? यमूशीं तूं कोणताहि संबंध ठेवता कामा नये हें मी तुला आजपर्यंत कैकदां बजावलं आहे कीं नाहीं ? " गंगाधरपंतांनीं जरा वजनांत विचारलें.

" तें माझ्या लक्षांत होतं, नाना. पण तुमच्या आज्ञेप्रमाणं वागणं मला शक्य झालं नाहीं. तुम्हीं मला जी शिक्षा कराल ती मी मोठ्या आनंदानं भोगीन."

माधव गंगाधरपंतांना इतक्या निर्भीडपणें उत्तरें देत आहे याचें पार्वतीबाईंना आश्चर्य वाटलें. कारण या एका बाबतींत त्यांच्याशीं खोटें बोलावें लागलें तरी बोल, असें पार्वतीबाईनीं त्याला पढवून ठेवलें होतें. या शिकवणुकीचा त्यानें तीनचारदां उपयोगहि केला होता हें पार्वतीबाईंच्या लक्षांत होतें. पण आज तो कसलाहि आड-पडदा न ठेवतां सर्व गोष्टी अगदीं सरळपणें सांगत आहे याचें त्यांना आश्चर्य तर वाटलेंच पण त्याबरोबरच थोडी भीतिहि वाटली. भीति अशासाठीं कीं, माधव हा गंगाधरपंतांचा इतर बाबतींत कितीहि लाडका असला तरी या बाबतींतील आज्ञाभंगाबद्दल ते त्याच्यावर रागावल्याशिवाय रहाणार नाहींत अशी त्यांची खात्री होती. बोलणें खावेंच लागणार, मग तें माधवानें खाण्यापेक्षां आपणच खाल्लें तर काय वाईट, असा विचार करून त्या मध्येंच म्हणाल्या,

" मींच सांगितलं होतं हो त्याला स्टेशनवर जायला. त्या बिचाऱ्याला अगदीं चैनच पडेना, मग काय करणार ? आज एका वेळेनें काय होईल तें होईल !"

" तें मला माहीतच होतं. फक्त मला तें तुझ्या तोंडून वदवायचं होतं. तो तर काय, अजून लहानच आहे. पण तूं तर अगदीं मोठ्ठी समजूतदार ना ? माझ्या सांगण्याची तूं एवढी पर्वा बाळगतेस हें पाहून तुझ्याविषयींचा माझा अभिमान बळावत आहे."

" हं काय असं लावून बोलायचं ! या एका बाबीशिवाय इतर कोणत्या तरी बाबींत मी आपल्या सांगण्याबाहेर आजपर्यंत गेल्यें आहे का ? या एका बाबींत मात्र मी जाणूनबुजूनच आपली अवज्ञा केली आहे."

" हं तुझं बोलणं ऐकून माझ्या अंतरात्म्याला फार समाधान वाटत असेल, नाहीं ?"

" बायको आपल्याशीं सडेतोडपणें वागूं लागली म्हणजे पुरुषाला तें फारसं आवडत नाहीं. इतकंच नव्हे तर त्याची तिच्यावर गैरमर्जी होते हें मला माहीत आहे. पण आपल्या पतीचा सर्वस्वीं निरपराध व सद्गुणी अशा एखाद्या व्यक्तीबद्दल निष्कारण झालेला गैरसमज दूर करण्याचा प्रयत्न न करणं हा त्या बाईचा मी गुन्हाच समजतें. गोविंदरावांची वागणूक आपल्याशीं मगरूरपणाची असली म्हणून बिचाऱ्या रमाबाईंनीं किंवा यमूनें आपलं काय घोडं मारलं आहे ? गोविंदराव त्या मायलेकींशीं तरी आजपर्यंत कधीं प्रेमानं वागले आहेत ? मी आपल्याला खरोखरच सांगतें कीं, आपण जर यमूशीं दोन शब्द कधीं प्रेमानं बोलला असतां तर आपल्याला तिचा इतका लळा लागला असता कीं, आज मी माधवाला स्टेशनवर जाण्याची नुसती परवानगीच दिली, पण आपण तर स्वतःच तिला निरोप द्यायला जायचं झालं असतं ! "

" रसाळ आणि गोमटीं फळं वाटेल तसल्या बीजाच्या पोटीं जन्म घेत नसतात. कण्हेरीच्या झाडाला का कधीं हपूसचे आंबे लागतात ? माझ्याशीं ताठ्यानें वागतात म्हणूनच कांहीं मी गोविंदरावांना नीच समजत नाहीं. त्यांच्या एकेका काळ्या कृत्याचा पाढा वाचूं लागलों तर तें एक महाभारतच होईल ! नीच ! पाजी ! असल्या माणसाची मुलगी इतकी सद्गुणी निपजणंच शक्य नाहीं. आतां, माझ्यापेक्षां तुम्हां मायलेकांना अधिक अक्कल असेल तर मात्र भाग वेगळा ? "

" एवढ्याशा साध्या गोष्टीवरून एकदम असं एकेरीवर काय यायचं तें ? "

" एवढीशी साधी गोष्ट ? तुम्ही बायका कितीही शहाण्यासुरत्या झालांत तरी तुमची बुद्धीच मुळांत आकुंचित यांत कांहीं शंका नाहीं. तुम्हांला दूरचा पोंच नाहीं. यमूशीं तुम्ही दोघांनीं प्रेमानं वागणं यांत तुम्हां दोघांच्या कोंवळ्या मेंदूला विशेष कांहीं दिसत नाहीं हें ठीक आहे. पण माझ्यासारख्या प्रगल्भ बुद्धीच्या माणसाला त्यांत नुसतं विशेषच नव्हे तर भयंकर अपमाना-

स्पदहि दिसतं. तुम्ही त्या मायलेकींशीं इतका निकट संबंध ठेवलात व हें त्या गोविंदरावाला समजलं तर ती गोष्ट त्याला अभिमानास्पदच वाटणार नाहीं का ?"

"यमू तर त्यांना डोळ्यासमोरहि नकोशी असते. मग तिला कोणीहि प्रेमानं वागविलं तर त्यांना उलट चीडच येण्याचा संभव अधिक ! तेव्हां मला वाटतं कीं, आम्ही दोघं यमूशीं प्रेमानं वागलों याबद्दल आपल्याला आनंदच झाला पाहिजे !"

"तुझीच माधवाला संमति मिळाली आहे म्हणून माझा नाइलाज झाला आहे. तुझं यांत अंग नसतं तर माझ्या आज्ञेचं उल्लंघन केल्याबद्दल मी त्याला योग्य शासन करण्यास कमी केलं नसतं. त्याच्या इतर सद्गुणांमुळें तो मला कितीहि आवडत असला तरी माझी आज्ञा मोडण्यापर्यंत जर त्याच्या शहाणपणानं धांव मारली तर त्याच्या शहाणपणाच्या फाजील गतीला मला अडसर घालावाच लागेल. त्याच्यावरील माझ्या लोभाचा तो वाजवीपेक्षां जास्त फायदा घेऊं लागला तर मला त्याला समजूत देणं भाग आहे."

इतका वेळ माधव आपल्या आईबापांचं संभाषण ऐकत स्वस्थपणें व गंभीर मुद्रा करून बाजूला उभा होता. पण गंगाधरपंतांचें एवढें बोलणें झाल्यावर त्यांना उत्तर देण्याची त्याला अनिवार इच्छा झाली. पण पार्वतीबाईंच्या हें लक्षांत येतांच, हा वादविवाद येथेंच थांबविणें बरें असें वाटून त्या म्हणाल्या,

"जाऊं दे ना आतां. आपल्या मतभेदाचा विषयच आतां इथून नाहींसा झाल्यावर त्याची उगाच विचक्षणा कशाला ? माधवच्या वतीनें पाहिजे तर मी क्षमा मागतें, मग तर झालं ?"

"तूं म्हणजे अशी वस्ताद आहेस कीं, सांगायची सोय नाहीं. मनाविरुद्ध वागून परत गोड बोलून संधि करण्यांत अगदीं हातखण्डा !"

" पुरे झाली माझी स्तुति ! याचं सारं श्रेय आपल्यालाच आहे हें कांहीं मी ओळखीत नाहीं असं नाहीं. लगीन होण्यापूर्वी माझ्या माहेरच्या माणसांनी मला अगदीं बावळटांत काढली होती. पण आपला सहवास मला आज इतकीं वर्षं मिळाला म्हणूनच कुठें, केव्हां व काय बोलावं हें तरी मला समजं लागलं ! "

खरें पाहिलें तर गंगाधरपंत जें बोलले तें कांहीं पार्वतीबाईंच्या स्तुतिपर म्हणून बोलले नव्हते. पार्वतीबाईचें पहिलें वाक्य ऐकल्याबरोबर आपल्या बोलण्याचा अर्थ विपरीत केल्याबद्दल त्यांचा गंगाधरपंतांना रागहि आला होता. परंतु पार्वतीबाईनीं आपल्या बोलण्याला जेव्हां मोठ्या खुबीनें गंगाधरपंतांच्या स्तुतिपर वळण दिलें तेव्हां मात्र ते विरघळले. मी मी म्हणणारे स्तुतीनें हुरळून जातात, मग गंगाधरपंतांची काय कथा ?

" बरं, तें जाऊं दे बरं आतां. मला अगोदर आंघोळीला पाणी काढ. नाहीं तर या तुमच्या भानगडींत मला ऑफिसला जायला लेट् व्हायचा. आज तो मोठा साहेब इन्स्पेक्शन घ्यायला यायचा आहे. "

आपल्या कल्पनेपेक्षां पुष्कळच लवकर गंगाधरपंतांनीं आवरतें घेतलेलें पाहून पार्वतीबाईना बरें वाटलें. त्या लगबगीनें पाणी काढण्यास गेल्या व माधवहि आपले कपडे काढून आपला त्या दिवसाचा अभ्यास करण्याच्या खटपटीला लागला. त्याचे डोळे पुस्तकावरून फिरत होते पण मेंदु त्या पुस्तकांतील विषय ग्रहण करण्याच्या परिस्थितींत नव्हता. त्यानें एकेक ओळ दहादां वाचली पण त्यांतील एक अक्षरहि त्याच्या डोक्यांत शिरेना. अभ्यास करण्याचा त्याचा नेहमींचा परिपाठ असा कीं, तो कोणताहि विषय दोन फार तर तीन वेळां वाचीत असे. आज आपलें असें काय होत आहे त्याला कांहींच समजेना. प्रत्येक अक्षरांत त्याला यमूची मूर्ति दिसत होती. थोड्याच वेळांत त्याची खात्री होऊन चुकली कीं, आज वाचण्याचा प्रयत्न करणें म्हणजे निव्वळ ढोंग करणें आहे. त्यानें पुस्तक मिटलें व स्वस्थ बसला.

असत्याची व ढोंगाची त्याला पहिल्यापासूनच चीड होती. पण स्टेशनवर त्यानें यमूची अखेरची म्हणून भेट घेतल्यानंतर तर या दोन दुर्गुणांची त्याच्या मनांत इतकी शिसारी बसली कीं, यापुढें केव्हांहि असत्य बोलावयाचें नाहीं व ढोंग करावयाचें नाहीं असा त्यानें आपल्या मनाशीं निर्धार केला. या अशाश्वत जगांत सत्य हेंच काय तें शाश्वत आहे आणि तें सत्य निर्व्याज व निर्हेतुक प्रेमानेंच सिद्ध होत असतें आणि मनुष्यमात्राच्या अंतःकरणावर ठसत असतें. यमूसारख्या निःस्वार्थ प्रेमदेवतेनें माधवाच्या अंतःकरणाचा पुरा कबजा घेतल्यानंतर त्यानें वरीलप्रमाणें निर्धार करावा यांत आश्चर्य कसलें ?

जेवतांनासुद्धां त्याला अडल्या अडल्यासारखें होऊं लागलें. गंगाधरपंतांना आज ऑफिसांत जाण्याची विशेष घाई असल्यामुळें त्यांना इकडेतिकडे लक्ष देण्यास अवसरच नव्हता; नाहीं तर समेट झालेल्या विषयाला पुनः तोंड फुटल्याशिवाय राहिलें नसतें.

गंगाधरपंत ऑफिसांत निघून गेले. आपण पढवून ठेवलेलें असतांना गंगाधरपंतांच्या प्रश्नाला माधवनें खरें उत्तर कां दिलें याबद्दल पार्वतीबाईनीं चौकशी करण्यास सुरुवात केली.

" माधव, दुसरीकडे कुठेंतरी गेलों होतों, असं नव्हतं का मघांशीं तुला सांगतां येत ? का आजपर्यंत या बाबतींत तूं कधीं खोटं बोललासच नाहींस ? "

" आई, तुझ्या सांगण्यावरून व मलाहि तें मुत्सद्देगिरीचं वाटल्यावरून मी आजपर्यंत पुष्कळ वेळां या बाबतींत खोटं बोललों आहें हें माझ्या लक्षांत आहे. पण आजपर्यंतची गोष्ट निराळी होती. आजपर्यंत यमू मला फक्त आवडत होती. पण आज, यमूशिवाय दुसरं कांहीं या जगांत आहे किंवा नाहीं याचीच मला शंका वाटूं लागली आहे. अखिल विश्वाची प्रेरकशक्ति यमूच असली पाहिजे अशी माझी आज भावना झाली आहे. मला असं वाटतं म्हणून तूं मला वेडाहि म्हणशील कदाचित् ! म्हण बापडी ! पण मला मात्र असं वाटतं खरं. मी तिचा

छळाला सुरुवात—

शेवटचा निरोप घेतल्यानंतर माझ्यांतील निम्मा ‘ मी ’ तिनं हरण केला व आपल्यांतील निम्मी ‘ ती ’ तिनं मला देऊन टाकली ! आई, यापुढं तुला पूर्वीचा माधव दिसणार नाहीं. आतां तुला दिसेल तो एक यमूचा माधवच दिसेल. ती माझ्या दृष्टिआड झाली तेव्हां माझ्यांतील तेजाचा सांठाच नाहींसा झाला असं मला वाटलं आणि त्याचवेळीं मी निर्धार केला कीं, निदान यमूच्या बाबतींत तरी कधींहि खोटं बोलायचं नाहीं व ढोंग करायचं नाहीं. नानांनीं मला प्रश्न विचारल्याबरोबर एवढयासाठींच मी त्यांना खरं सांगितलं आणि यापुढंहि तिच्या बाबतींत मला ते जे प्रश्न करतील त्यांचीं मी खरीं तींच उत्तरं देईन. मग त्या माझ्या खरं बोलण्याचा परिणाम कांहींहि झाला तरी मला त्याची पर्वा नाहीं. ”

एखाद्या पोक्त माणसाप्रमाणें माधवाला बोलतांना पाहून पार्वतीबाईंना विस्मय वाटला. आपला माधव शहाणासुरता आहे ही त्यांची खात्री होती. पण आतांच्या त्याच्या बोलण्यावरून त्यांना समजून चुकलें कीं, फारच थोड्या अवधींत त्याच्यांत विलक्षण बदल झाला ! अकालीं वृद्धपणा पावलेला एखादा तरुण असावा त्याप्रमाणें अकालीं तरुण बनलेला हा बालक आहे कीं काय, असेंहि त्यांस वाटल्याशिवाय राहिलें नाहीं.

“ आज तूं धड जेवलासुद्धां नाहींस. यमूला आतां आपण पारखीं झालों म्हणून मला नाहींच का कांहीं वाईट वाटत ? पण करायचं काय ? आपल्या हातच्या का गोष्टी आहेत या ? ”

“ ही गोष्ट आपल्या हातची नाहीं हें मी जाणून आहें. पण या विचारानं तूं जसं आपल्या मनाचं समाधान करून घेऊं शकतेस तसं मी करून घेऊं शकत नाहीं. याचं कारण एकच कीं, यमू तुझ्या दृष्टिआड झाल्यावर तिचं कल्पना-चित्र तुझ्या मनश्चक्षूंपुढें उभं राहूं शकतं, इतकंच ! पण माझ्यापुढें तिचं नुसतं चित्रच उभं रहात नसून ती माझ्यांत प्रत्यक्षपणें वावरते आहे असा मला भांस होतो आहे. मला तिला विसरतां येत नाहीं. यापुढं कोणतीहि गोष्ट माझ्या-कडून धड़पणें होईलसं मला वाटत नाहीं. ”

" माधव, माणसानं थोडातरी विवेक केला पाहिजे. ती तुला कितीहि आवडत असली तरी चोवीस तास तिचाच ध्यास धरून कसं बरं चालेल ? तूं अजून लहान आहेस. या संसारी आयुष्यांत प्रेमी माणसांच्या विरहापेक्षांहि अधिक दारुण प्रसंग माणसावर वारंवार ओढवत असतात. तेव्हां असल्या क्षुल्लक प्रसंगानं जर तुझं मन इतकं गटंगळया खाऊं लागलं तर याहून विपरीत गोष्टींना तोंड देण्याचा प्रसंग तुझ्यावर आला म्हणजे तुला जीवाचं कांहींतरी बरंवाईट करून घ्यावंसं सुद्धां वाटूं लागायचं ! "

" आई, हा प्रसंग तुला क्षुल्लक वाटतो. वरवर पहाणाऱ्या कोणालाहि हा प्रसंग क्षुल्लकच वाटेल. पण मला, याहून विशेष असा प्रसंगच कोणता वाटत नाहीं. माझ्या हातून आजचा अभ्यास सुद्धां झाला नाहीं आणि पुढेंहि कधीं होईलसं वाटत नाहीं. "

माधवाचें चित्त यावेळीं अगदींच अस्थिर झालें आहे व त्याला आपण कशाहि प्रकारें उपदेश करण्याचा कितीहि प्रयत्न केला तरी त्याचा कांहीं सुद्धां उपयोग होणं शक्य नाहीं, ही पार्वतीबाईची खात्री झाली. सध्यां तो भांबावल्यासारखा झाला असला तरी कालांतरानें त्याला आपल्या दुःखाचा विसर पडून तो पूर्वीप्रमाणें हंसूंखेळूं लागेल असा त्यांना भरंवसा वाटत होता.

त्या दिवशीं शाळेंत मास्तरांनीं काय शिकविलें याची माधवाला दादहि नव्हती !

दुसरा दिवस उजाडला. कालच्यापेक्षां आज आपलें मन जरा ताळयावर आल्यासारखें माधवाला वाटलें. पण यामुळें त्याला आनंद न होतां वाईटच वाटलें ! आणखी आठदहा दिवस गेल्यावर त्याला आपल्या नेहमींच्या गोष्टी हलुहळूं करतां येऊं लागल्या. मात्र त्याला यमूची पुष्कळदां आठवण होई.

एक महिन्याचा अवधि लोटल्यावर त्याच्या सर्व गोष्टी लौकिकदृष्टया सुरळित-पणें चालूं लागल्या. तशाच एखाद्या प्रसंगीं त्याला यमूची आठवण होई व त्या

वेळेपुरतें तो बावचळल्यासारखें करी. पण ती स्थिति फार वेळ न टिकतां तो पुनः ताळयावर येई व आपल्या उद्योगाला मनापासून लागे !

काळ ही अशीच जालीम मात्रा आहे. अशक्यप्राय वाटणाऱ्या गोष्टी तो सहज करून दाखवूं शकतो. तसें नसतें तर जगांतील व्यवहार सुरळितपणें चालणें शक्य झालें नसतें व जगांतील एक मोठेंच काव्य नाहींसें झालें असतें— इतिहासाची तर आवश्यकताच उरली नसती–जग हा निर्जीव नकाशा ठरला असता !

प्रेमळ मातापितरें व इतर परिस्थितीची अनुकूलता यामुळें माधवाच्या जीवाला लवकरच विरंगुळा वाटूं लागला. इतर परिस्थिति अनुकूल नसती तर मात्र कदाचित् विरहदुःखाची विस्मृति त्याला इतक्या लवकर पडली नसती. काळाला सुद्धां अनुकूल परिस्थितीच्या सहाय्याची अपेक्षा असतेच. नाहींतर तो एकटा बिचारा काय करूं शकणार ?

अनुकूल परिस्थितीची साथ न मिळाल्यामुळें तोच काळ यमूच्या बाबतींत हतप्रभ ठरला. मातेच्या प्रेमळ सहवासाला तर ती आंचवली होतीच. पण सत्यभामाबाई व मुरलीधरपंत यांनीं जरी तिच्याशीं वागतांना थोडीफार माणुसकी ठेवली असती तरी तेवढ्यानें सुद्धां माधवाचा विषय विसरण्याला तिला मदत झाली असती. मुंबईस असतांना बापाच्या छळाबरोबरच आईच्या प्रेमाची पांखर तिच्यावर असे. त्यामुळें बापाच्या छळाला आईच्या वात्सल्याचा छेद जाऊन बाकी शून्य उरत असे. कधींकधीं वात्सल्यानें छळावर मात केल्यामुळें आनंद वाटण्याचें सद्भाग्यच तिला लाभत असे. पण आतां माधवाचा वियोग, प्रेमळ आईची ताटातूट व त्या जोडप्याचीं हृदयाचा छेद करून जाणारीं कुजकीं बोलणीं, यामुळें त्या कोंवळया बालिकेचें शुद्ध अंतःकरण अगदीं करपून गेलें. तिच्या चेहेऱ्यावरील आरोग्यदर्शक गुलाबी छटा नाहींशी होऊन ती अगदीं काळवंडल्यासारखी दिसूं लागली. कोणी मायेच्या माणसानें तिला तशा स्थितींत पाहिलें असतें तर ती यापुढें फार दिवसांची सोबतीण नाहीं अशी त्याला

खात्रीनें भीति वाटली असती. परंतु मुरलीधरपंत व सत्यभामाबाई या जोड-प्यानें तिच्या मलूल प्रकृतीचा भलताच अर्थ केला. पुण्यास जाऊन यमूला आतां जवळजवळ वर्ष झालें होतें.

" पोरीनं लग्नाचा ध्यास घेतला वाटतं ? हल्लीं कशी दिसायला लागली आहे पहा—" मुरलीधरपंत म्हणाले.

" मी आज किती दिवस हेंच आपणांला सांगणार होतें. गोविंदानं हिला पाहिलं तर म्हणेल कीं, ताई हिला धडपणें खायला तरी घालते कीं नाहीं कोण जाणें ! गेली आहे कुठें ती पोर इतक्या वेळची ? "

" बसली असेल जाऊन त्या सुदाम्याकडे ! मुंबईहून निघतांनाच मी तर्क बांधला होता कीं, या पोरीची बाजू कांहीं ठीक दिसत नाहीं ! तिकडे तो महाद्या होता इकडे हा सुद्या आहे ! असलीं कार्टीं जातील तिकडे गूण उधळायचींच ! "

" त्या बाळशास्त्र्यांना तरी एकदां हिची पत्रिका दाखवावी ! "

" आला का तुझा बाळशास्त्री पुनः ? येऊं दे तर खरा गुलाम—तंगडीच मोडून टाकतों आणि वर फौजदारी करतों ! मला त्या चोराचीं सर्व बिंगं समजलीं आहेत—बायकांना सांगण्यासारखीं नाहींत तीं ! "

मुरलीधरपंतांची कल्पना होती त्याहून सत्यभामाबाईंना बाळशास्त्र्यांची पुष्कळच अधिक माहिती होती. शास्त्रीबुवांचें नांव आपल्या तोंडून कुठून निघालें असें त्यांना झालें. विषयाला कलाटणी देण्यासाठीं त्या म्हणाल्या—

" पण मी म्हणतें, या एवढ्याशा वयांत या असल्या गोष्टी हल्लींच्या पोरींना सुचतात तरी कशा ? त्या सुदाम्याबद्दल या कार्टीला आजपर्यंत मी शंभरदां तरी सांगितलं असेन ! पण पालथ्या घड्यावर पाणी ! मेल्याला बायको नाहीं—मूल-बाळ नाहीं—मुलाबाळाचं असो मेलं ! पण संसारआचार कांहीं तरी आहे का ? असल्या फटिंगाच्या नादाला लागणं बरं नाहीं, एवढं का या घोडीला आतां पटूं नये ? "

छळाला सुरुवात—

" अग, पण तिला असलाच गरजू मनुष्य हवा असला तर ? "

" हें असं नुसतं बोलत बसून भागणार नाहीं. आतां अगोदर तिला हांक मारतें आणि दाखवितेंच चांगला इंगा ! "

सत्यभामाबाईंनीं यमूला बोलावून घेतली व मुरलीधरपंतांच्या हातांत धरण्याच्या काठीनें तिला इतकी बेदम झोडपून काढली कीं, तिचें सर्वांग काळेंनिळें झालें व ती बेशुद्ध पडली !



## बाळशाह्याचा प्रताप— ७

ज्या वाड्यांत मुरलीधरपंत रहात होते त्याच वाड्यांतील एका खालच्या खोलींत सुदामा रहात असे. सुदाम्याचे आईबाप त्याच्या लहानपणींच निवर्तले होते. त्याचा बाप जिवंत असेपर्यंत त्याचे दिवस सुखांत गेले असल्याचें त्याला ओझरतें आठवत होतें. त्याच्या नांवावर त्याच्या बापानें पांच हजार रुपये ठेवले असून त्याच्या चुलत्याला त्यानें ट्रस्टी नेमलें होतें, अशी कुणकुण त्याच्या कानावर आली होती. पण त्याच्याजवळ लेखी पुरावा कांहींच नसल्यामुळें व त्याची स्वतःचीहि वागणूक त्या बाबतींत बेपर्वाईची असल्यामुळें चुलत्याचें चांगलेंच फावलें. त्या चुलत्यानें सुदाम्याला निदान थोडेंफार शिक्षण देऊन मग उरलेले पैसे दाबले असते तर पापाच्या पर्वतातील एखादें ढेंकूळ तरी कमी झालें असतें. पण एवढीहि माणुसकी त्यानें दाखविली नाहीं. सुदामा अवघ्या सात वर्षांचा असतांना चुलत्यानें त्याला घरांतून हांकून लाविलें ! -

आतां या पोरक्या व निरक्षर पोरानें या गजबजलेल्या व आपमतलबी जगांत दिवस तरी काढावे कसे ? त्यांतल्या त्यांत दुःखांत सुखाची गोष्ट एवढीच कीं, त्याला मानापमानांच्या विशेषशा कल्पना नव्हत्या. विशेषशा म्हणण्याचें कारण असें कीं, टीचभर पोटाची खळगी भरण्यासाठीं आपण अमूक एक उद्योग पत्करावा कीं नाहीं, अमूक एक धंदा हलक्या दर्जाचा आहे कीं काय, याची त्याला कांहींच कल्पना नव्हती. घरांतून हकालपट्टी झाल्यावर कोठें जावें व काय करावें हें त्याला न समजल्यामुळें तो उगाच इकडेतिकडे फिरत राहिला होता. ती

सकाळची दहा वाजल्याची वेळ होती. भटकतां भटकतां तो एका खाणावळीच्या दाराशीं येऊन पोहोंचला. गोरागोमटा व धडधाकट गरजू पोर पाहिला, लगेच त्या खाणावळीच्या मालकाच्या नजरेंत भरला. त्यानें त्याला बराच वेळ तेथें उभा असलेला पाहून आंत बोलावलें व कोणाचा मुलगा, काय, वगैरे सर्व चौकशी केली. न जाणों, एखाद्या घरंदाजाचा सुखवस्तु मुलगा असला तर! सुदाम्यानें आपली सर्व हकिकत सांगितली व आतां यापुढें आपण काय करावें हें आपल्याला सुचत नसल्यामुळें आपण असे वणवण फिरत आहोंत असेंहि सांगितलें. खाणावळीचा मालक वयानें चांगला पोक्त असून त्याला चार मुलें-बाळेंहि होतीं. त्याला साहजिकच सुदाम्याची कींव आली व 'तूं माझ्याकडे रहातोस का?' असें त्यानें सुदाम्यास विचारलें. सुदाम्यानेंहि रहाण्याचें आनंदानें कबूल केलें. पोट भरण्यासाठीं कांहींतरी काम करावें लागतें याची त्या बिचाऱ्याला या दिवसापर्यंत कल्पनाच नव्हती. कारण घरीं असतांना, एवढयाशा मुलाला खेळण्याशिवाय दुसरें कसलें काम असणार? मालकानेंहि त्यांतल्या त्यांत सौजन्य दाखवून कमी त्रासाचें व कमी घाणीचें असें, मेंबर लोक जेवणास बसले म्हणजे त्यांस पाणी वाढण्याचें व आंघोळीस बसले म्हणजे विसाण घालण्याचें काम सुदाम्यावर सोंपविलें व कामाच्या मोबदल्यादाखल म्हणून त्याचें जेवणखाण व कपडालत्ता त्यास देण्याचें कबूल केलें. देवाच्या कृपेनें सुदाम्याला एक वेळहि उपाशीपोटीं रहावें लागण्याचा प्रसंग सहन करावा लागला नाहीं.

जसजसा तो वयानें मोठा होत चालला तसतशीं त्याच्यावर जास्त मेहेनतीचीं कामें पडूं लागलीं. पाणी वाढण्याच्या ऐवजीं त्याच्यावर इतर पदार्थ वाढण्याचें काम आलें व त्याबद्दल त्याला थोडासा पगारहि मिळूं लागला. हळुहळूं तो त्या खाणावळींतील मुख्य आचारी बनून त्याला वीस रुपये पगार मिळूं लागला. यावेळीं तो बावीसएक वर्षांचा होता. तो लहान असतांना, इतर लोकांप्रमाणें आपणालाहि चार अक्षरें लिहितांवाचतां यावींत असें त्याला वाटत असे. पण दुर्दैवानें तें त्याला साध्य झालें नाहीं. खाणावळींत रहाण्यापूर्वी त्याला

जी अगदीं थोडीशी अक्षरओळख होती तिच्यावरहि एवढया अवधींत पाणी पडलें.

मुरलीधरपंतांच्या जागेच्या खालच्या खोलींत तो रहात असे हें वर सांगितलेंच आहे. त्याच्या खोलीला दीड रुपया भाडें होतें. खाणावळींतील दोन्ही वेळचा स्वयंपाक त्याच्यावर पडत असल्यामुळें तो रात्रीं घरीं येई तेव्हां अगदीं थकून गेलेला असे. पहिल्यानें इतर चार लोकांप्रमाणें त्यालाहि पानसुपारीचें व विडीचें व्यसन लागलें. पुढेंपुढें त्या व्यसनांनीं त्याचें समाधान होईनासें होऊन तो मधूनमधून दारूहि पिऊं लागला. पहिल्यानें तो फक्त निजण्याच्या वेळींच थोडीशी घेत असे. पण पुढें पुढें दुपारीं त्याला दोनचार तास विश्रांति मिळे, तेव्हांहि तो घेऊं लागला.

यमू पुण्यास आल्यावर आठव्याच दिवसाची गोष्ट. शनिवार असल्यामुळें तिच्या शाळेला दुपारची सुटी होती. करमणुकीला कांहींच विषय नसल्यामुळें कांहीं गंमत दिसली तर पहावी म्हणून ती खिडकीशीं उभी राहून बाहेर पहात होती. एकदोन मित्रांच्या आग्रहामुळें आज सुदाम्याला थोडी अधिक झाली होती. त्यामुळें, तो घरीं आला तेव्हां त्याचीं पावलेंहि एकमेकांत गुरफटल्यासारखीं होत होतीं. कोट कसातरी अंगांत अडकवलेला, टोपी डोक्याचा केव्हां ठाव सोडील याचा नेम नाहीं इतकी वांकडी झालेली, अशा स्थितींत स्वारी झुकतझुकत वाड्यापर्यंत येऊन ठेपली. दिंडींतून आंत शिरतांनाच स्वारीचा झोंक गेला व डोक्यांत दगड शिरून भळभळां रक्त वाहूं लागलें. यमूला तें पहावेना. ही हकिकत आत्याबाईंना सांगण्यासाठीं म्हणून ती धांवतच आंत गेली. आत्याबाई त्यावेळीं वामकुक्षीचें मधुर सुख अनुभवीत होत्या. त्यांची झोंपमोड केल्यास आपणांस कदाचित् मारहि बसावयाचा अशा भीतीमुळें यमू त्यांना उठविण्याच्या भानगडींत पडली नाहीं. हाताला मिळालें तें एक फडकें तिनें पाण्यांत भिजविलें व धांवत धांवत खालीं गेली. सुदाम्याच्या डोक्यांतून वहात असलेलें रक्त तिनें

साफ पुसून काढलें. डोक्यावर सणसणीत आघात झाल्यामुळें सुदाम्याची अर्धी-अधिक उतरली होतीच. त्यांत रक्त पुसलें गेल्यावर त्या फडक्याच्या गारव्यानें तो चांगलाच शुद्धीवर आला व यमूच्या मदतीनें त्यानें आपली खोली गांठली. यमूला, सुदाम्याची अशी स्थिति कशामुळे झाली हें कांहीं माहीत नव्हतें म्हणून तिनें त्याला त्यासंबंधानें विचारलें. त्यानेंहि तिला मनमोकळेपणानें सर्व सांगितलें.

"मग अशी स्थिति जीमुळं होते ती दारु पिणं चांगलं का? पिण्यासाठीं इतर थोड्या का वस्तू असतात? चहाचा कंटाळा आला तर एखादे वेळीं काफीच प्यावी," यमू म्हणाली.

यमूच्या अज्ञानाचें व साधेपणाचें सुदाम्याला कौतुक वाटलें. दारूंत व चहाकॉफींत काय फरक असतो हें तिला समजावून देण्याचाहि त्यानें आपल्या-कडून प्रयत्न केला. हा विषय सुदामा समजावून देणार आणि यमूसारखी परकरी पोर तो ग्रहण करणार, मग काय विचारतां? एकच गोंधळ माजला. पण आश्चर्य हें कीं, त्या थोड्याशा अवधींत सुदाम्याच्या मनांत यमूबद्दल विल-क्षण आदर उत्पन्न झाला. चौदा पंधरा वर्षांच्या दीर्घ अवधींत आपलेपणाचा प्रेमळ शब्द सुदाम्याच्या कानावर पडलेला नव्हता. आपल्या एवढ्या दीर्घ काळाच्या तपश्चर्येनंतर परमेश्वराला आपली करुणा येऊन त्यानेंच आपल्याला ही भगिनी—ही निष्पाप मनाची अल्लड बालिका—प्रसाद म्हणून दिली कीं काय, असें त्याला वाटूं लागलें. तिची शपथ घेऊन "आजपासून मी दारूच्या एका थेंबालाहि स्पर्श करणार नाहीं," अशी त्यानें प्रतिज्ञा केली. मात्र अशी प्रतिज्ञा करितांना त्यानें तिला एक अट घातली. ती अट अशी कीं, यमूनें दररोज निदान एक तास तरी त्याच्याकडे येऊन बसावें. तिनेंहि ही अट मान्य केली. पण त्या बिचारीला आपलें वचन अमलांत आणणें शक्य झालें नाहीं. कारण सुदामा सकाळीं उठून आपल्या कामावर जाई त्या वेळीं ती कधीं कधीं उठलेलीहि

नसे. त्याची दुपारची विश्रांतीची वेळ तेव्हां हिची शाळेची वेळ. मधल्या सुट्टींत घरीं यावें म्हटलें तर शाळा घरापासून इतकी दूर कीं, सुट्टीच्या अवधींत घरीं नुसतें जाऊन येणेंहि तिला शक्य नव्हतें. तो रात्रीं घरीं यावयाचा त्यावेळीं हिची मध्यरात्र झालेली असावयाची ! यामुळें शनिवारीं सुदाम्याची अट मान्य केल्यानंतर फक्त रविवारींच ती आपला शब्द पाळूं शकली. दुसऱ्या शनिवारी जेव्हां त्यांची गांठ पडली तेव्हां या विषयाचा पुनः उहापोह होऊन असें ठरलें कीं, या अडचणीवर तोड म्हणून दररोज एक तासप्रमाणें सात दिवसांच्या सात तासांची भरपाई यमूनें शनिवार व रविवार या दोन दिवसांतच करावयाची ! बोलतां बोलतां सुदाम्यानें आपला सर्व वृतान्त तिला सांगून टाकला. इतक्या वर्षांत दिलजमाईनें व मनमोकळेपणानें असा तो कोणाशींच बोलला नव्हता. यमूचा व आपला कितीतरी दीर्घ काळचा दाट परिचय आहे असें त्याला वाटूं लागलें. सुदामा वयानें एवढा मोठा असूनहि तो अगदीं निरक्षर आहे हें यमूला पहिल्यानें खरेंच वाटेना. पण तो तसें जेव्हां शपथेवर सांगूं लागला तेव्हां तें तिला खरें मानणेंच भाग पडलें. पुष्कळ मोठ्या माणसांना शपथ म्हणजे तोंडांतून निघून हवेंत मिसळणारा फवारा वाटतो. परंतु अशिक्षितांना व लहान बालकांना शपथ म्हणजे एक फार भयंकर चीज वाटत असते. श्रद्धेच्या बाबतींत–कधीं कधीं ती अंधहि असते–सुशिक्षितांपेक्षां व वडीलधाऱ्या माणसांपेक्षां अशिक्षित लोक व लहान बालक श्रेष्ठ असतात.

यमूनें, आपण होऊन, आपणाला जितकें लिहितांवाचतां येतें तितकें सुदाम्याला शिकविण्याचें कबूल केलें. दोघें एकमेकांना इतकीं आवडूं लागलीं कीं, त्या आनंदाच्या भरांत, दोघांनीं एकमेकांना बहीणभाऊ मानावयाचें असा त्या दोघांचा शपथविधीहि झाला.

मुरलीधरपंत व सत्यभामाबाई पुण्यास आल्यानंतर बाळशास्त्री ठरल्याप्रमाणें एका दुपारीं आलेच. मुरलीधरपंत ऑफिसांत गेले होते व यमूचीहि शाळा होती.

अर्थात् सत्यभामाबाईशीं त्यांना अगदीं मनमोकळेपणानें बोलतां आलें. सत्यभामाबाईवर त्यांची चांगलीच छाप पडली. आपल्या पतिराजांना बाळशास्त्र्यांचा राग येतो याच्या मुळाशीं त्यांची मत्सरबुद्धीच असली पाहिजे अशी त्यांची खात्री होऊन चुकली. बाळशास्त्र्यांच्या तोंडून जेव्हां त्यांनीं ज्योतिषशास्त्राच्या अचुकतेपणाविषयींचीं वर्णनें ऐकलीं तेव्हां तर त्या गारच पडल्या. बाळशास्त्री त्यांना भूदेव वाटूं लागला. बाळशास्त्री चांगले अनुभवी असल्यामुळें रबर किती मर्यादेपर्यंत व केव्हां ताणावयाचा हें त्यांना बरोबर माहीत होतें. रबर तुटेपर्यंत ताणण्याइतके ते व्यवहारशून्य नव्हते! मर्यादा न सोडतां पण हंसूनखेळून व मनमोकळेपणानें वागण्याची पद्धति बाळशास्त्री अवलंबीत असल्यामुळें त्यांचा सहवास सत्यभामाबाईंना निरुपद्रवी पण हवा हवासा वाटूं लागला. आपणांला दुसरीकडे कोठें जावयाचें नसेल तेव्हां खुशाल घटका दोन घटका येथें येत जा, असेंहि त्यांनीं बाळशास्त्र्यांस विनंतिवजा सांगितलें. बाळशास्त्री पडला पक्का धूर्त! सावज आपल्या जाळ्यांत सांपडण्यास आतां फारसा उशीर नाहीं हें त्यानें तेव्हांच ओळखलें. परंतु अशा प्रसंगीं आपण अगदीं बेपर्वाईची वृत्ति दाखविणेंच परिणामीं फायद्याचें ठरत असतें हा त्याचा अनुभव होता. चारपांच दिवसांत तो पुनः सत्यभामाबाईकडे फिरकला सुद्धां नाहीं. त्यानंतर एक दिवस आला तोसुद्धां अगदीं उभ्या उभ्या! त्याच्यामागें कामाची गडबड फार ना? त्याच्या अटकळीप्रमाणें सत्यभामाबाईंनीं त्याला आग्रह करकरून पंधरावीस मिनिटें बसवून घेतलेंच! तो अगदीं निघाला तेव्हां, "मला नाहीं बाई असं हें आवडत! माणसाला अगदीं तास अर्धा तास सुद्धां बसवत नाहीं म्हणजे काय? पुनः यायचं असलं तर चांगली सवड काढून येत जा—" असाहि त्याला निरोप देण्यास सत्यभामाबाई विसरल्या नाहींत. बाळशास्त्र्याची बालंबाल खात्री झाली कीं, सावज घायाळ झालें! खडा मारून पहाण्याचा त्यानें निश्चय केला व चटकन् 'बरं—बरं—' असें म्हणून त्यानें सत्यभामाबाईंच्या गालावर हळूंच चापट मारली व जिनाच उतरूं लागला. त्याचें

गणित खरें ठरलें ! ' पुढच्या वेळीं मी वचपा काढीन बरं याचा—' असे शब्द जिना उतरतांना त्याच्या कानीं आले ! !

नंतर दोनच दिवसांनीं बाळशास्त्री पुनः दुपारीं सत्यभामाबाईकडे आला ! ! रंगूताईला एकदांचें ' हायसें ' वाटलें ! ! !

यमूच्या वर्गांत पुष्कळ जाणत्या मुली होत्या. त्यांपैकीं एकदोघींचीं तर लग्नेंहि झालेलीं असल्यामुळें त्या थोड्याफार अनुभवीहि होत्या. महिन्या दोन महिन्यांच्या अवधींत यमूच्या व्यावहारिक ज्ञानांत बरीच भर पडली ! तिला आतां बऱ्याच गोष्टी समजूं लागल्या होत्या.

एक दिवस दुपारीं यमूच्या शाळेला अचानक सुट्टी मिळाली. शिक्षणखात्यां-तील कोणसासा वारला ! यमू घरीं आली तों दाराला आंतून कडी ! दोनचारदां आत्याबाईना हांका मारल्यावर व तीनचारदां दार ठोठावल्यावर कडी काढली गेली. यमूनें बाळशास्त्र्याला आजपर्यंत कधींच पाहिलें नव्हतें. तिला कांहींतरी चमत्कारिक वाटलें. सत्यभामाबाईहि पक्क्या वस्ताद होत्या.

" कां ग ? आज शाळा लवकर सुटली ? "

" कोणसंसं मेलं, त्याची आम्हांला सुटी मिळाली ! "

" भावजी, ही माझ्या गोविंदाची यमू हो ! फार हुषार आहे. नेहमीं पहिला दुसरा नंबर असतो. यमू, यांचं नांव बाळासाहेब हो. हे माझे मामेदीर. नमस्कार कर यांना. अशी वेंधळ्यासारखी पहात काय राहिली आहेस ? ते आजच मलकापूरहून आले. आज संध्याकाळींच त्यांना जवळच्या कुठल्या खेड्यांत कामाला जायचं आहे. "

" वाः ! तुमची यमू फारच चुणचुणीत दिसते. आज तर काय, मजाच उडाली तिची ! " बाळशास्त्री म्हणाले.

" यमू, तुला खेळायला जायचं असलं तर जा हो–" आत्याबाईनीं आज कमाल केली.

" खायचं असलं तर खाऊनच जा, " असें म्हणून त्यांनीं लाडवांचा डबा काढला सुद्धां. अर्थात् एका बशींत दोन 'गोळ्या' टाकून ती बशी बाळशास्त्र्यांपुढें ठेवण्यास त्या विसरल्या नाहींतच. यमूला आत्याबाईचें नवल वाटलें. तिला थोडासा आनंदहि झाला. खाऊन झाल्यावर, ' जातें मी ' असें म्हणून यमू खालीं सुदाम्याकडे जाऊन बसली. सुदाम्याला अतिशय आनंद झाला.

" सत्यभामाबाई, आतां यापुढें मी कधींहि इकडे येणार नाहीं."

सत्यभामाबाईंना आश्चर्य वाटलें, वाईटहि वाटलें. "म्हणजे काय ? माझं कांहीं चुकलं का? "

" तुमच्या यमूनं सगळं ओळखलं आहे. पोरीचे डोळेच सांगत होते. ती आपल्या या कटांत सामील होण्याचा कांहीं संभव असेल तरच यापुढं मी इकडे येणं शक्य आहे. "

" तिला सामील करावयाची म्हणजे काय करायचं ? "

" आतां उगाच अज्ञानाचं पांघरूण घेऊं नका. तुम्हाला आतां सगळ्या गोष्टी उघड सांगण्याइतक्या कांहीं तुम्हीं नवशिक्या राहिलां नाहींत ! "

" असं म्हणतां होय ? त्यांत कांहीं फारसं कठीण नाहीं. तिची छाती नाहीं माझ्या शब्दाबाहेर जाण्याची ! "

" ठीक तर, उद्यां कसंहि करून तिला घरीं राहवून घ्याच. मी जातों आतां," असें म्हणून बाळशास्त्री निघून गेले.

सुदाम्याशीं बोलतां बोलतां यमूनें सत्यभामाबाईंचा मामेदीर वर आला असल्याचें त्याला सांगितलें तेव्हां तो हंसूंच लागला.

" हंसायला रे काय झालं ? "

" किती भोळी आहेस तूं यमू! अग, ते बाळासाहेब नव्हत, तो बाळशास्त्री आहे! साऱ्या मुलखाचा पाजी! आज कितीतरी दिवस तो तुझ्या आत्याबाईंकडे दुपारचा येत असतो. मजा मारतो आहे लेकाचा!"

" असं रे काय म्हणतोस तूं? असलं पाप का कोणी करतं?"

सुदाम्यानें तिला कसें तरी पटवून दिलें व म्हणाला, " यमूताई, तूं सुद्धां सावध रहा हं—ते मांग तुझ्यावर सुद्धां कांहीं तरी प्रसंग आणल्याशिवाय रहाणार नाहींत. तुला नुसता असा संशय आला तरी मला सांग. मी माझे प्राण देऊन तुझं रक्षण करीन."

दुसऱ्या दिवशीं कांहीं तरी सांगून सत्यभामाबाईनीं यमूला शाळेंत जाऊं दिलें नाहीं. तिला शंका आलीच. आत्याबाई कसल्या तरी विधींत गुंतल्याची संधि साधून यमूनें सुदाम्याला हें सांगितलें व पुन: वर येऊन बसली.

ठरल्या वेळीं बाळशास्त्र्यांची स्वारी आली. सत्यभामाबाईनीं त्यांना खिडकींतून खूण केली. बाळशास्त्री सुदाम्याच्या खोलीवरून जाऊं लागले. तोंच सुदाम्यानें त्यांचें उपरणें मागच्या मागेंच पकडलें. बाळशास्त्री मागें वळून पहातो तों सुदाम्यानें खाडकन् त्याच्या मुस्कुटांतच भडकाविली.

" हलकटा, आरडाओरड करून अधिक शोभा करून घेऊं नकोस. यमूकडे नुसतं पाहिलंस तर तुझे डोळे काढून हातावर देईन."

बाळशास्त्र्यानें उपरणें सांवरलें व पाय काढला. सत्यभामाबाई आपल्या वाट पहात बसल्या होत्या. पांच मिनिटें झालीं—दहा झालीं. हे अजून वर कसे येत नाहींत? सत्यभामाबाई खालीं उतरल्या. सुदामा आपल्या दारांतच उभा होता.

" पाठवणी केली त्याची मी—" तो म्हणाला.

ऐकलें न ऐकलेसें करून सत्यभामाबाईनीं वर पळ काढला, दाराला आंतून कडी लावली आणि यमूला बदड बदड बडविलें!

**बाळशास्त्र्याचा प्रताप—**

एका रविवारीं यमू सुदाम्याला शिकवीत बसली असतांना मागील प्रकरणाच्या शेवटीं दिलेला मुरलीधरपंत व सत्यभामाबाई यांचा संवाद झाला व त्याचें पर्यवसान यमूला मरेपर्यंत मार मिळण्यांत झालें !

" कार्टे, आल्यागेल्या–उठल्याबसल्या–त्या सुदाम्याशीं तुझं काय पुरलेलं असतं ग ? " सत्यभामाबाईनीं विचारलें.

" आत्याबाई, मी फक्त शनिवारीं आणि रविवारींच त्याच्याकडे जातें हो. "

" अस्सं अस्सं ! अग टवळे, शनिवार आणि रविवार हे आठवड्यांतील दोन मुहूर्त तुम्ही ठरविले आहेत का ? बाकीच्या पांच दिवसांचं पारणं या दोन दिवसांत फेडायचं असतं वाटतं ? "

" त्याला कांहींसुद्धां लिहितांवाचतां येत नाहीं म्हणून मी त्याला शिकवायला जात असतें. "

" वा–वा ! तूं मोठी प्रोफेसरीणच पडलीस कीं नाहींस ? अग कार्टे, तुला तरी धड लिहितांवाचतां येतं का त्याला शिकवायला जातेस ती ? "

" आत्याबाई, त्याला अगदीं मुळींच येत नाहीं तेव्हां मी त्याला अक्षरें, बाराखड्या वगैरे शिकवितें. "

" आणि त्याबद्दल तो तुला काय देतो ? कांहीं पगार वगैरे ठरला आहे का ? "

" मी कांहीं त्याची मास्तरीण नाहीं आहे पगार घ्यायला ! त्यानं मला प्रेमानं बोलावलं म्हणून मी जाऊं लागलें ! "

" त्या मेल्याचं काय जातं आहे प्रेमानं बोलवायला ? आणि काय ग, त्याचं आणि तुझं एवढं प्रेम जमायला त्याची नि तुझी ओळख कशी ग झाली ? "

यमूनें सुदाम्याची व आपली ओळख कशी झाली तें सांगितलें व आपण त्याला शिकवूं लागलों तर दारूचें व्यसन सोडण्याचें त्यानें वचन दिल्याचेंहि सांगितलें.

" साऱ्या जगाचा उद्धार करण्याचं महत्कार्यच तुझ्या डोक्यावर येऊन पडलं आहे कीं नाहीं ? तें कांहीं नाहीं. मला हें सर्व गोविंदाच्या कानावर घातलंच पाहिजे. लग्नाच्यापूर्वी या असल्या गुप्त भेटी घेण्याची तुला संवय झाली ! कार्टी सरसावली आहे पहा कशी सगळ्या बाजूंनीं ! असल्या संवयीशिवाय का हें असं होतं ? ही संवय तुला कांहीं आज नवीनच लागलेली नाहीं म्हणा ! मुंबईला असतांनाच ही कुणकुण माझ्या कानीं आली होती ! आतां इकडेहि तूं आपले गूण उधळूं लागलीस ! आतां यापुढं तुझी गय करण्याची सोय उरलेली नाहीं. इतक्या लहान वयांत सासुरवासाचं दुःख नको असं आपलं मी इतके दिवस म्हणत होतें. पण आतां तें कांहीं नाहीं. ऐकलं का ? आत्तांच्या आतां गोविंदाला पत्र घालून कळवायचं हो कीं, या कार्टीचं लक्षण कांहीं ठीक दिसत नाहीं. या हिच्या गुणांचा अधिक बभ्रा होऊं देण्यापेक्षां हिची आपली पिंवळी केलेली बरी ! कार्टी कुठल्या नक्षत्रावर जन्माला आली आहे न कळे ! मी इतकं जीव तोडून बोलत्यें आहें पण रांडेचीला त्याची कांहीं लाज आहे का ? " असें म्हणून सत्यभामाबाईंनीं गालगुच्चांपासून सुरुवात करून काठीनें बडवून तिला बेशुद्ध पाडण्यांत शेवट केला. तिची कांहींच हालचाल दिसेना, तेव्हां त्यांनीं तिला उचललें व आंतल्या खोलींत नेऊन टाकलें !

यमू बेशुद्ध अशी नव्हती. पण मार असह्य झाल्यामुळें तिला हालचाल मात्र करतां येत नव्हती. ती धड जागीहि नव्हती व झोंपेंतहि नव्हती. यांनीं आतां काकांना पत्र लिहिलें म्हणजे ते आकाशपाताळ एक करून सोडतील अशी तिला भीति वाटली हें तर खरेंच; पण हें आपल्या आईला कळलें म्हणजे तिला काय वाटेल या विचारानें तिच्या काळजाचें पाणीच झालें. ही वार्ता आतां माधवच्याहि कानावर जाईल ! त्याला काय वाटेल ? अर्धवट गुंगीच्या स्थितींत तिच्या डोक्यांत विचारांच्या लहरींवर लहरी उठत होत्या. माधवचें माझ्यावर किती प्रेम आहे ! आणि मी दुर्वर्तनी निघालें अशी त्याची समजूत झाली तर माझ्यावरील त्याचें प्रेम कायम रहाणें शक्य आहे काय ? त्याचें माझ्यावरील

प्रेम जर नाहींसें झालें तर या जगांत जिवंत तरी कशाला रहावयाचें ? प्रेमाच्या ओलाव्याशिवाय मनुष्य जिवंत रहाणें शक्य आहे काय ? आतां हीं माणसें माझ्या लग्नाच्या खटपटीला लागणार ! हीं माझें लग्न करणार तरी कोणाबरोबर ? ज्या माणसाला मी कधीं पाहिलेलं सुद्धां नाहीं अशा माणसाच्या गळ्यांत हे मला बांधणार आणि त्याच्याशीं म्हणे मी जन्मभर इमानेंइतबारें वागावयाचें ! इतकेंच नव्हे तर जगांतील इतर कोणत्याहि माणसापेक्षां त्याला पूज्य मानावयाचें ! ज्याला देव मानावयाचा तो दगड कां असेना, पण मी मात्र त्याला देव मानलाच पाहिजे ! एखादें जनावर दुसऱ्याच्या गोठ्यांत नेऊन बांधणें आणि आपली मुलगी दुसऱ्याच्या स्वाधीन करणें या दोन्ही गोष्टी यांना सारख्याच वाटतात कीं काय ? पण करायचें काय ? मुलीनें वडीलधाऱ्या माणसांविरुद्ध ब्र काढणें म्हणजे समाज अक्षम्य अपराध समजतो ना ? बाप सांगेल त्याच्या गळ्यांत मुलीनें जाऊन पडलेंच पाहिजे ! ज्या मुलींना लग्नापूर्वीं कोणाचीहि ओढ लागलेली नसते त्यांच्या बाबतींत ही पद्धत फारशी घातुक ठरेलच असें नाहीं. पण माझ्यासारख्या मुलीच्या बाबतींत—जिनें ‘ लग्न करीन तर तुझ्याशींच करीन ’ अशी माधवाला प्रेमाची शपथहि देऊन टाकली आहे—ही गोष्ट शक्य तरी आहे का ? ज्या मुलाशीं हीं माणसें माझें लग्न लावणार तो कदाचित् माधवापेक्षांहि सर्व गुणांनीं अधिक श्रेष्ठ असला तरी मला त्याची काय पर्वा ? इतर लोकांप्रमाणें पाहिजे तर मीहि त्याच्या सद्गुणांची तारीफ करीन—त्याला चांगला म्हणेन ! पण तो माझ्या हृदयाचा स्वामी कसा होऊं शकेल ? माझ्या हृदयाच्या सिंहासनावर माधवाला अभिषेक झालेला ! त्याला दूर सारून त्या सिंहासनाचा कबजा घेण्याला कोणी बंडखोर तयार झाला तर मला माझ्या प्राणांचें मोल देऊनहि माधवाचा—माझ्या राजाचा—बचाव केलाच पाहिजे. माझ्या राजाकरितां माझ्या सर्वस्वाचा होम करणें हा माझा पवित्र धर्मच आहे ! दुसरा कोणी उपटसुंभ ‘ मला आपला राजा मान ’ म्हणून माझ्यावर सक्ती करूं लागला तर मला त्याच्याविरुद्ध कायदेभंगाचें शस्त्र उभारणें भागच पडेल ! मी कायदे-

भंग कां करूं नये ? प्रामाणिक बुद्धीनें विचार न करतां रूढ झालेल्या कायद्याच्या बंधनांनीं मी स्वतःला कां म्हणून जखडून घ्यावें ? माझ्या हातीं कायदे करण्याचा अधिकार असता तर मी असल्या उपटसुंभाला तोफेच्या तोंडींच देण्याची सजा ठेवली असती ! तेव्हां तें कांहीं नाहीं. मी माधवाची वाग्दत्त वधू आहें. माझें पाणिग्रहण करण्याचा अधिकार फक्त माधवालाच आहे. माझ्या नातलगांशीं-जे मला परक्याच्या पायाशीं बळी द्यायला सिद्ध झाले आहेत अशा नातलगांशीं-मला कांहींहि कर्तव्य नाहीं. स्वार्थी व पक्षपाती समाजाची मला पर्वा नाहीं ! या जगांत मी माझ्या पतीच्या—माझ्या राजाच्या—माझ्या सर्वस्वाच्या नात्यानें फक्त एका माधवालाच ओळखणार ! त्याच्यासाठींच जगणार, त्याच्यासाठींच मरणार व पुनः जन्म घेणार तर तोहि त्याच्यासाठींच जन्म घेणार ! मला जन्माला घालणाऱ्या माझ्या पित्यानें विवाहाच्या ढोंगी संस्कारानें मला दुसऱ्या कोणाच्या गळ्यांत बांधलें तर मी त्याला आपला पति कां मानावा ? त्याला मी पति मानणें यांत मी माझी स्वतःची वंचना करणें तर आहेच पण त्याचबरोबर ज्या समाजाची मी पर्वा बाळगावी म्हणून जग अपेक्षा करतें, त्या समाजाचीहि ती वंचनाच होणार नाहीं का ? कारण समाजाच्या तोंडापुरतें, ज्याला मला माळ घालावी लागणार त्याला मी पति म्हणेन ! पण मनांतून मी त्याला पति कसा मानीन ? माझें मन आतां माझें आहे कुठें ? तें ज्यानें आपलेंसें करून घेतलें आहे तोच माझा पति ! माझ्या सर्वस्वाचा तोच सर्वाधिकारी ! मान या म्हटल्यानें तो जसा मिळत नाहीं त्याचप्रमाणें प्रेम करा म्हटल्यानें प्रेमहि उत्पन्न होऊं शकत नाहीं. या प्रसंगीं मी गोगलगाईप्रमाणें वागलें तर तें ढोंग होईल ! कोणी म्हणेल कीं, लौकिकासाठीं हें ढोंग मला केलेंच पाहिजे ! पण ज्या लौकिकाची जोपासना करण्याकरितां ढोंग उभारावें लागतें तो कसला लौकिक ? माझा लौकिक मातींत मिसळून गेला तरी बेहेत्तर पण ढोंग उभारून मी त्याचें संरक्षण करणार नाहीं. सच्चा माणसापेक्षां ढोंग्याचीच समाजाला अधिक प्रतिष्ठा वाटते तर ? पण मला ढोंगी चोंचले नको आहेत; व असल्या क्षुद्र वृत्तीच्या समाजाची

अनुयायी होणें तर त्याहूनहि नको आहे! समाजांत कांहीं सत्व असेल तर तो समाज म्हणावयाचा व त्याची आज्ञा पाळणें हें त्याच्या घटकांचें कर्तव्यहि ठरतें. परंतु पक्षपाती, एककल्ली व ढोंगी समाजाविरुद्ध आचरण करणें हा त्याच्या प्रत्येक घटकाचा जन्मसिद्ध हक्क आहे व तो बजावल्याशिवाय मी रहाणार नाहीं! फार तर काय, समाज मला उच्छृंखल म्हणेल—जारिणी म्हणेल! समाजानें मला पतिव्रता म्हटलें तर मला मोक्ष मिळेल असें नाहीं व जारिणी म्हटलें तर मला रौरव प्राप्त होईल असेंहि नाहीं! उलट समाजानें मला पतिव्रता समजणें म्हणजेच माझ्या जारकर्माचा पुरावा आहे! कारण माधवाला मीं आपला पति मानला आहे; मग ज्याला आपला पति मान म्हणून पित्यानें मला गळ घातली त्याच्याशीं मी निष्ठापूर्वक वागणें हें जारकर्मच नव्हे काय? पाहूंच या समाज काय म्हणतो तें. माझ्या विचारसरणीला अनुकूल असे कितीसे घटक या समाजांत सांपडतील हा प्रश्नच आहे. माझ्या अशा वर्तनामुळें समाज मला छळून-छळून पुरेंसे करील. पण त्या छळाला सादर होण्यास मला सज्ज झालेंच पाहिजे. फार तर काय, मला साऱ्या जन्मांत सुखाचा एक क्षणहि लाभणार नाहीं! पण माझा सारा जन्म दुःखांत गेल्यानें समाजाला तर समजेल कीं नाहीं कीं, अशा गोष्टी समाजांत असूं शकतात? मुलीचें लग्न करून देतांना तिची संमति घेणें आवश्यक असतें एवढें तरी मुलींच्या बापांना समजेल कीं नाहीं? पुष्कळ झालें. माझ्या एकटीच्या नाशानें जर पुढील सर्व भगिनींचें कल्याण होणार आहे तर माझ्या स्वतःच्या नाशाला मला तयार झालेंच पाहिजे. लग्नाच्या वेळीं माझी संमति घेतली जाणार नाहीं, लग्न झाल्यानंतर कसें वागावयाचें हें मीहि ठरवून टाकलें आहे. माझा पति—माझा स्वामी—माझा राजा—माझा देव—एकच आहे! माझा विश्वास आहे कीं, तो माझ्याशीं बेमान होणार नाहीं. माझी मुलीची जात असल्यामुळें मला बाप सांगेल त्याच्या घरीं जाणें भाग पडणार आहे. यावरहि मला उपाय करतां येईल पण तो करण्याची माझी इच्छा नाहीं. या वेळीं मी माझ्या हट्ट चालविण्यापेक्षां मी माझ्या सुखाचा

होम करण्यांतच अधिक महत्त्व आहे. लग्न झाल्यावर कसें वागावयाचें हें ठरविण्याचा अधिकार माझा आहे. त्या बिचाऱ्याची स्थिति मात्र करुणास्पद होणार ! त्याची मला आतांपासूनच कींव वाटूं लागली आहे. पण त्याला कसें करणार ? लग्नसंबंध चांगला झाला तर ज्याप्रमाणें उभयतांची दिवाळी त्याचप्रमाणें तो बळजबरीचा झाला तर उभयतांची होळी झालीच पाहिजे ! मी स्त्री असलें तरी माझा माधव पुरुष आहे—नांवाचा पुरुष नव्हे—अस्सल मर्द आहे. भलत्याच मुलीचें पाणिग्रहण करून तो माझा व तिचा विश्वासघात कधींच करणार नाहीं. मी व माझा माधव जर इतकीं एकजीव झालों आहोंत तर त्याचे व माझे विचार एकाच दिशेनें व एकाच सुरांत चाललेले असणार. माझ्या मनांत आतां जे विचार येत आहेत तेच विचार माझें लग्न ठरलेलें समजल्यावर त्याच्याहि मनांत चालू होणार व माझ्या निश्चयाप्रमाणें त्याचाहि निश्चय होणार कीं, यमू हीच आपली स्वामिनी आहे व तिच्याशिवाय इतर कोणत्याहि मुलीशीं आपण लग्न करणें हा व्यभिचार आहे ! झाला माझा निश्चय—मला यांनीं कोणाच्याहि गळयांत बांधलें तर मी त्याच्याशीं पत्नी या नात्यानें प्राणांतींहि संबंध ठेवणार नाहीं ! !

हे सर्व विचार तिच्या मनांत स्फुरत असतां यमू अर्धवट गुंगींत होती. विचारांच्या वादळांत तिला खरोखरच झोंप लागली.



## रमाबाईचा मृत्यु—

## ८

मुरलीधरपंतांनीं ठरल्याप्रमाणें गोविंदरावांना यमूविषयीं पत्र लिहिलेंच. त्या पत्रांत त्यांनीं आपल्या जहरी अंतःकरणांतील कालकूट शक्य तेवढें ओकलें होतें. आधींच गोविंदरावांच्या हृदयांत यमूविषयीं फार वत्सलभाव आणि त्यांत या विषाची भर पडल्यावर काय विचारतां? यमूच्या विरहानें व्यग्र झालेल्या रमाबाईंच्या अंतःकरणाला डागण्या द्यायला त्यांना अधिकच अवसान चढलें व चालून आलेल्या या संधीचा त्यांनीं पुरेपूर उपयोग करून घेतला.

" पूर्वीपासूनच मी तुला सांगत होतों कीं, पोरीचं लक्षण कांहीं ठीक दिसत नाहीं म्हणून ! तिला यापूर्वीच पिवळी करून मोकळा झालों असतों तर कुळाला काळोखी लागण्याचा आजचा हा प्रसंग तरी टळला असता ! "

" ते मुरलीधरपंत वन्संच्या सांगण्यावरून लिहिणार आणि आपण त्यावर विश्वास ठेवणार ! यमूचं वय तें किती आणि ते भलतंसलतं लिहितात तरी काय ? ती आपल्या डोळ्यासमोर नसली आणि ती अगदीं वाईटांतील वाईट आहे असा आपला पूर्वग्रह असला तरी शक्याशक्यतेचा कांहीं विचार नको का करायला ? तेरा चौदा वर्षांच्या परकऱ्या पोरीसंबंधानं असलं कांहींतरी लिहायला त्या मुरलीधरपंतांचा हात धजावला तरी कसा म्हणतें मी ? "

" तेरा चौदा कां ? चौदा पुरीं झालीं तिला ! आणि शिवाय असं कीं, तुला परकरी वाटणारी तुझी पोरगी वाटेल तसले थेर करायला जर धजूं शकते तर तिचा तो चवचालपणा मला कळविण्यास मुरलीधरपंत धजले तर त्यांत आश्चर्य कसलं आलं आहे ? तुझ्या पोटच्या पोरीनं माझ्या कुळाला काळोखी फांसली याचं मला वाईट वाटतं. पण त्याचबरोबर मला वेळींच सावध होण्याचा इषारा दिल्याबद्दल मुरलीधरपंतांचे मी आभार न मानणं म्हणजे कृतघ्नपणाचा दोष पदरीं बांधून घेण्यासारखं आहे. आतां या विषयाची अधिक वाच्यता करणं व्यवहाराला धरून होणार नाहीं. कोळसा उगाळावा तितका काळाच ! जो मुलगा त्यांनीं यमूसाठीं पाहून ठेवला असल्याचं ते लिहितात, त्याला ती एकदम देऊन टाकून मोकळं होणं एवढाच एक मार्ग या चमत्कारिक परिस्थितींत अवलंबिण्यासारखा आहे. मुरलीधरपंत कांहीं परके नाहींत कीं वैरी नाहींत. त्यांनीं जो मुलगा यमूसाठीं पाहिला असेल तो तिला सर्वथैव अनुरूप असाच असणार. आतांच मी त्यांना पत्र घालून कळवितों कीं, त्यांच्या बेताला माझी पूर्ण संमति आहे म्हणून ! "

" आपण या गोष्टीचा आधीं पुरतेपणीं विचार केला आहे का ? आपल्या पोरीची जन्माची गांठ घालतांना अविचार केल्यामुळें आजपर्यंत हजारों आई-बापांना आपलें म्हातारपण रडत घालवावें लागलें आहे. यमूचं लग्नच करायचं असेल तर तिला योग्य असा एकच नवरा मुलगा आहे. पण मुळीं ती लग्न करण्याइतकी मोठी झाली आहे हेंच मला पटत नाहीं ! "

" मग तिनें चालविलेले हे घाणेरडे ढंग पटतात वाटतं ? ती इकडे असतांना मी कांहीं बोललों तर पूर्वग्रहानं माझं मन दूषित झालं असल्यामुळें मला तिची प्रत्येक गोष्ट वाईट दिसते, असं तरी तुला म्हणतां येत होतं. पण आतां परस्पर तिऱ्हाईतांकडूनहि त्याच तक्रारी येऊं लागल्या आहेत एवढं बरं आहे. मीच अशा मजकुराचं पत्र मुरलीधरपंतांना लिहायला सांगितलं होतं असं तर नाहीं ना तुझं म्हणणं ? त्यांनीं जें प्रत्यक्ष पाहिलं तें त्यांनीं मला कळविलं.

नाहींतर उद्यां मीच त्यांना दोष दिला असता. उभ्या जन्माचा सत्यानाश करण्यासारखं एखाद्या मुलीसंबंधानं खोटंनाटं लिहून त्यांना काय फायदा ?"

"आपला स्वतःचा काडीचाहि फायदा नसतांना केवळ आपल्या कुजक्या मनाचं समाधान करून घेण्यासाठीं सर्वथैव निरपराध व्यक्तीवर नाहीं नाहीं तसले आरोप करणारे काळ्या काळजाचे मांग समाजांत कांहीं थोडेथोडके आढळत नाहींत ! त्यांत त्यांचा कांहीं स्वार्थ साधत असता तर त्या त्यांच्या वागणुकींत, कनिष्ठ जातीचा कां होईना, पण कांहीं अर्थ आहे असं म्हणतां येणं शक्य होतं ! पण केवळ आपल्या सडक्या काळजाची तहान भागविण्यासाठीं कोणावर तरी भलभलते आरोप करायचे व ते खरे असल्याबद्दल लोकांची खात्री करून देण्याचा खटाटोप आरंभायचा, म्हणजे असल्या नरपशूंकरितां ब्रह्मदेवानं स्वतंत्र सांचा केला असला पाहिजे असंच म्हणणं भाग पडतं. बिचाऱ्या यमूबद्दल असं खोटंनाटं लिहून त्या थेरड्याला काय मिळालं कुणास ठाऊक ! माझी अगदीं पक्की खात्री आहे कीं, असल्या कसाबांचा सारा जन्म असलीं काळीं कृत्यें करण्यांतच गेला असल्यामुळें त्यांचं अंतःकरण व त्यांचं डोकं तसल्याच दूषित विचारांनीं सडून गेलेलं असतं; आणि त्यामुळें कोणाची कोणतीहि गोष्ट त्याच एका घाणेरड्या अर्थानं घेण्याची त्यांना संवयच लागलेली असते."

मुरलीधरपंत हे गोविंदरावांच्या वडील भगिनीचे पतिराज ! तेव्हां त्यांच्याबद्दल अपमानास्पद असा उल्लेख केल्याबरोबरच गोविंदरावांचें पित्त एकदम भडकलें होतें. पण रमाबाईंनीं त्यांना सवडच दिली नाहीं. सर्व बोलून झाल्यावर त्यांनाच विचार पडला कीं, इतकें आपल्याला बोलवलें तरी कसें ?

"निष्कारण दुसऱ्यावर आरोप करून स्वतःच्या मनाचं समाधान करून घेणाऱ्या वर्गाप्रमाणेंच, आपल्या हातून जे दोष घडतात तेच इतरांच्या हातून घडल्यास त्यांत आश्चर्य कसलं, असा पोक्त विचार करून वाटेल त्या घाणेरड्या अपराधाबद्दल सुद्धां क्षमा दाखवून त्यावर पांघरूण घालण्याचा प्रयत्न करणारा

एक मुर्दाड वर्गहि जगांत नांदत असतो हें विसरून भागणार नाहीं. आपल्या पोटच्या पोरीसंबंधानं लोकांना अशी शंका येणं हें सुद्धां एखाद्या आईला लांछनास्पद वाटलं असतं ! मुरलीधरपंतांना तरी प्रत्यक्ष पुराव्याच्या अभावीं यमूवर असल्या प्रकारचा आरोप करण्याचा धीर झाला असता का ? तिचं वय किती आहे व तिच्या हातून असला घाणेरडा अपराध घडणं शक्य तरी आहे का, हें काय तुलाच कळतं आणि त्यांना कळत नाहीं ? आडांत असल्याशिवाय पोहोऱ्यांत येत नाहीं आणि पिकल्याशिवाय विकत नाहीं. हें पत्र वाचल्यापासून मला तर माझा जीव नकोसा झाला आहे. या एवढयाशा वयांत हिचं हें असं वर्तन तर आणखी थोडी मोठी झाल्यावर ही काय करील देव जाणे ! मुरलीधरपंतांच्या योजनेला संमति देण्याशिवाय मला तरी दुसरा कोणताहि मार्ग श्रेयस्कर वाटत नाहीं. एखाद्या माणसाच्या हातून एखादं सत्कृत्य घडलं तर तें जगाला समजतंच असं नाहीं परंतु दुष्कृत्याचा बभ्रा मात्र ताबडतोब होतो व लोकहि तसल्या गोष्टींवर विश्वास ठेवायला एका पायावर तयार असतात ! यमूचं लग्न यापुढं लांबणीवर टाकलं तर कांहीं दिवसांनीं तिला नवरा मिळणं सुद्धां मुष्किलीचं होऊन बसेल आणि कोणी हरीचा लाल तिच्याशीं लग्न करायला तयार झालाच तर तो समाजाच्या टवाळीला मात्र पात्र होईल ! मी आतां लिहितोंच पत्र. तूं या बाबतींत थोडासा अधिक विचार करशील तर तुलाहि माझंच करणं बरोबर हें पटूं लागेल ! ”

असें म्हणून गोविंदरावांनीं पत्र लिहूनहि टाकलें. तें त्यांनीं रमाबाईंना वाचूनहि दाखविलें नाहीं. त्यांना काय वाचून दाखवावयाचें ? गोविंदरावांच्या बोलण्यावरून त्यांनीं लिहिलेल्या पत्रांतील मजकूर काय अर्थाचा असणार याची रमाबाईंना कल्पना होतीच !

मुरलीधरपंतांनीं यमूवर केलेल्या आरोपाची गोविंदरावांनीं अशा रीतीनें वासलात लावावी, याचें रमाबाईंना फार वाईट वाटलें. गोविंदरावांनीं यमूला

## रमाबाईचा मृत्यु—

ताबडतोब मुंबईला पाठविण्याबद्दल लिहिलें असतें तर चालण्यासारखें नव्हतें का? पण तसें त्यांनीं केलें असतें तर ते गोविंदराव कसले? रमाबाईंना गोविंद-रावांचा मनस्वी राग आला. यमूच्या जन्मापासून रमाबाई गोविंदरावांवर मनापासून कधीं रागावल्या असतील तर आजच! हे आपल्या पतिधर्माप्रमाणें पितृधर्मालाहि अखेर पारखे झालेच ना? यमूचें यापुढील आयुष्य आतां जाणार तरी कसें? माधवाचा तिला जबरदस्त लळा लागलेला. यमूचें दुसऱ्या मुलाशीं लग्न लागल्याबरोबर तिला माधवाशीं उभ्या आयुष्यांत दोन शब्दसुद्धां मोकळे-पणीं बोलावयास मिळणार नाहींत. तिचें दुसऱ्याशीं लग्न झालेलें पाहून बिचाऱ्या माधवाची किती निराशा होईल? पार्वतीबाई आणि मी एकमेकींना बहिणी मानीत आलों आणि या दोघाच्या लग्नाबद्दल एकमेकींशीं वचनबद्धहि झालों. त्यांना काय वाटेल? या बाबतीत मला कांहींच करतां येण्यासारखें नाहीं काय? माधव मला भेटला म्हणजे त्याला मी काय सांगूं? त्याची समजूत मी कशी घालूं? त्यांना कांहीं सुचेना. त्यांचें डोकें बधिर झालें. त्यांना गरगरल्यासारखें होऊं लागलें. सर्वांग गळल्यासारखें वाटूं लागलें. नुसतें बसून रहाणें सुद्धां त्यांना कठीण झालें. बसल्या जागींच त्या लवंडल्या. गोविंदराव पत्र टाकून आलेले सुद्धां त्यांना समजलें नाहीं. गादी पसरण्यासाठीं गोविंदरावांनीं त्यांना दोनचार हांका मारल्या, त्यांचीहि त्यांना दाद लागली नाहीं. शेवटीं गोविंदरावांनीं त्यांना हातानें गदगदां हालविलें तेव्हां आपणाला कोणी तरी हालवीत आहे एवढें त्यांना समजलें. पण त्यांना उठतां येईना व डोळेहि उघडण्याची इच्छा होईना. गोविंदराव चिडले. त्यांनीं रमाबाईच्या पाठीवर जोरानें चापटी मारली पण तिचाहि कांहीं उपयोग झाला नाहीं. गोविंदरावांना कांहीं कल्पना होईना. त्यांनीं शेवटीं रमाबाईच्या अंगाला हळूंच हात लावून पाहिला तों तें धमधमलेलें लागलें. पण त्याची त्यांना फारशी पर्वा वाटली नाहीं. आदळआपट करून त्यांनीं आपली गादी पसरली—त्यांना अपरिहार्य कारणामुळें आदल्या दिवसा-पासून घरीं निजणें भाग पडलें होतें—व ते झोंपून गेले! रमाबाईंना पडल्या

ठिकाणींच झोंप लागेल असा त्यांचा तर्क! परंतु रमाबाईंना झोंपहि स्वस्थ लागेना किंवा उठवेहि ना! त्यांना एकावर एक स्वप्नें पडूं लागलीं. एका स्वप्नाचा दुसऱ्या स्वप्नाशीं संबंध नाहीं–दुसऱ्याचा तिसऱ्याशीं मेळ नाहीं. कधींहि न बघितलेल्या व्यक्ती व न बघितलेलीं स्थळें त्यांना एकसारखीं दिसूं लागलीं. एका स्वप्नांत त्यांना यमूच्या लग्नाची तयारी चाललेली दिसली. नवरा मुलगा बरा दिसत होता. सर्व पूर्वविधी झाले. अंतरपाट धरला गेला. मंगलाष्टकें सुरू झालीं. मंगलाष्टकें संपून वाद्यांच्या कडकडाटांत अंतरपाट बाजूला सारला गेला. यमू उभी होती तशीच उभी राहिली. ती एखाद्या मेणाच्या बाहुलीसारखी निर्जीव दिसत होती. तिच्या पाठराखणीनें तिला हालविलें. पण हालविल्याबरोबर तिची हालचाल सुरू होण्याऐवजीं ती धाडकन् खालींच पडली. तिच्या कुडींतील प्राण निघून गेला होता. ती पडली तों तिचें डोकें माधवाच्या मांडीवर पडलें. रमाबाईंनीं एकदम किंचाळी फोडली. गोविंदराव जागे झाले. पहातात तों रमाबाईंचें सर्व अंग घामानें भिजून चिंब झालेलें! रमाबाईंची दृष्टीहि साफ बदलून गेली होती. गोविंदरावांना त्यांची भीति वाटूं लागली. त्यांनीं घाईघाईनें कपडे घातले व डॉक्टरांना आणण्यासाठीं ते निघून गेले. चुकूनमाकून मेली तर हिच्या खुनाचा आरोप आपल्यावर यावयाचा अशा काल्पनिक भीतीमुळेंच गोविंदरावांनीं एवढी तत्परता दाखविली! रमाबाईंना एकसारखें रडूं येत होतें. यमू खरोखरच इहलोक सोडून गेली असें त्यांना वाटूं लागलें. डॉक्टर आले व त्यांनीं रमाबाईंची नाडी पाहिली तों ती सांपडेच ना! डॉक्टर गडबडले. त्यांनीं थर्मामिटर, स्टेथॉस्कोप वगैरे लावल्यासारखें केलें व ते उठले. औषध आणण्यासाठीं गोविंदरावहि निघाले. दाराबाहेर पडल्यावर फी हातावर पडतांच केस 'होपलेस' असल्याबद्दल डॉक्टरांनीं आपला अभिप्राय व्यक्त केला. 'तुमच्या समजुतीसाठीं पाहिजे तर औषध देतों लिहून पण उद्यांची सकाळ यांना दिसेल असें मला तरी वाटत नाहीं' असें ते म्हणाले. या एवढ्याशा गोष्टीचा रमाबाईंवर

## रमाबाईंचा मृत्यु—

इतका भयंकर परिणाम होईल अशी गोविंदरावांना कल्पनाहि नव्हती. ते जेमतेम औषध घेऊन आले व त्यांनीं कसाबसा एक डोस रमाबाईंना पाजला. रमाबाईंच्या मनांतून कांहींतरी बोलावयाचे होतें असें त्यांच्या मुद्रेवरून स्पष्ट दिसत होतें. परंतु एक शब्दहि बोलण्याची त्यांना उमका नव्हती. गोविंदरावांना आज कितीतरी वर्षांनीं त्या माउलीची कींव आली. त्यांना आपल्या पत्नीविषयीं याक्षणीं पूर्वींचा जिव्हाळा वाटूं लागला. आज कितीतरी वर्षें आपल्या पत्नीशीं आपण केलेली अन्यायाची वागणूक त्यांना आज आठवूं लागली. आपण सर्व बाजूंनीं छळण्याची पराकाष्ठा केली असतांहि या साध्वीनें आपला अपमान कधीं केला नाहीं. इतकेंच नव्हे तर माझ्या सुखासाठींच हिनें सारा जन्म धडपड केली. स्वयंपाक करणाऱ्या बाईला किंवा मुलें सांभाळणाऱ्या दाईला वागवितात तशी हिला आपण आज इतकीं वर्षें वागविली याचा त्यांना आतां पश्चात्ताप वाटूं लागला. मनुष्य जिवंत असेपर्यंत त्याची खरी किंमत बहुधा कोणाला कळत नाहीं, हें तत्त्व त्यांना आतां प्रत्यक्ष अनुभव घेण्याची पाळी आली तेव्हां, पटूं लागलें. कित्येक वर्षांत आपण हिला सुखाचा शब्द सुद्धां दिला नाहीं, आतां हिच्या मरणकालीं तरी हिची इच्छा आपण पूर्ण करावी, अशी सद्भावना गोविंदरावांच्या अंतःकरणांत उद्भवली. ते रमाबाईंच्या जवळ जाऊन बसले व त्यांचें डोकें त्यांनीं आपल्या मांडीवर घेतलें. तसल्या त्या बेशुद्ध अवस्थेंत सुद्धां, देवाप्रमाणें पूज्य मानलेल्या आपल्या पतीचा स्पर्श होतांच रमाबाईंना नवजीवन प्राप्त झाल्यासारखें वाटूं लागलें. आज कित्येक वर्षांत त्यांना असला आनंद अनुभविण्यास मिळाला नव्हता. त्यांच्या पतीचा त्यांना स्पर्श होई तो फक्त त्याच्या पायाचा व त्याच्या तोंडचा शब्द ऐकावयास मिळे तो शिवीचा ! गोविंदरावांनीं त्यांचें डोकें आपल्या मांडीवर घेऊन त्यांच्या अंगावरून प्रेमानें हात फिरवितांच रमाबाईंना इतका आनंद झाला कीं, त्या भरांत आपण प्रत्यक्ष नंदनवनाचेंच सुख अनुभवीत आहोंत कीं काय असा त्यांना भास होऊं

लागला. त्यांना वाटलें कीं, इतकीं वर्षे केलेल्या कडक तपश्चर्येचें फळ आज आपल्याला मिळालें. गोविंदरावांचे डोळे पाण्यानें भरून आले.

"असं काय बरं करतेस वेड्यासारखं ? नीट माझ्याकडे बघ ना ! असं काय ? माझ्याकडे पहाण्याची तुला भीति का वाटते ? भिऊं नकोस. आजपर्यंतचा मांगहृदयी गोविंदराव आतां उरलेला नाहीं. पश्चात्तापाच्या अग्नींत जळूनपोळून पवित्र झालेला हा गोविंदराव तुला करुणेच्या स्वरांत आपणाकडे पहायला विनवीत आहे. नाहींच का तुला माझ्याकडे पहाण्याची इच्छा होत ? माझ्याशीं दोन शब्द तरी बोल. दोन शब्दांनाहि का मी महाग झालों ! आजपर्यंत मी तुझ्याशीं क्रूर दैत्याप्रमाणें वागत असूनहि तूं माझी कधीं अवज्ञा केली नाहींस किंवा माझ्या सेवेंत कधीं कसूर केली नाहींस; आणि आज मी पश्चात्तापानें होरपळून जाऊन दीनाप्रमाणें तुझी करुणा भाकीत असतांना माझ्या विनवणीकडे लक्षहि देण्याची तुला इच्छा होऊं नये ?"

त्यांच्या बोलण्यातील एक अक्षरसुद्धां रमाबाईना समजत नव्हतें. त्यांचा झालेला स्पर्श फक्त त्यांस कांहींसा समजत होता. त्या स्पर्शाबरोबर त्यांना झालेला आनंद आतां त्यांच्या मुखावर किंचित् प्रमाणांत दिसूं लागला. गोविंदरावांना वाटत होतें कीं, आपलें भाषण हिला आंतून समजत असलें पाहिजे. रमाबाईचा चेहेरा किंचित् हंसरा होतांच गोविंदरावांचें पित्त एकदम भडकलें. त्यांच्या मूळ स्वभावानें पुनः डोकें वर काढलें. रमाबाईच्या आसन्नमरण स्थितीचा त्यांना क्षणमात्र विसर पडला. "मला पश्चात्ताप झालेला पाहून, शेवटीं आपलाच विजय झाला अशा तोऱ्यानें, तूं माझ्याकडे पाहून कुत्सित तऱ्हेनें हंसते आहेस काय ? मला झालेल्या पश्चात्तापामुळें माझी कींव करण्याऐवजीं तूं माझा उपहास करूं पहातेस ? हा अपमान सहन करण्याइतका नादान मी खास नाहीं," असें म्हणून त्यांनीं आपली मांडी झटक्यानें काढून घेतली. स्वर्गांतून एकदम पाताळांत आपली रवानगी झाल्यासारखें रमाबाईना वाटूं लागलें. त्यांच्या हृदयाची क्रिया

बंद पडून त्यांच्या चेहेऱ्यावर प्रेतकळा आली. रमाबाईंना त्याच स्थितींत टाकून गोविंदराव आपल्या गादीवर येऊन पडले. रमाबाईंशीं त्यांचा विवाह झाल्यापासूनचा प्रत्येक दिवस त्यांना आठवूं लागला. पहिलीं दोन तीन वर्षें आपले हिच्यावर किती प्रेम होतें ? सर्व जगाला आमचा हेवा वाटत होता. आपली पत्नी गर्भवती झालेली पाहून आपल्याला किती आनंद झाला ? परंतु आपण मित्र म्हणून समजत असलेल्या एका सर्पानें आपल्या पत्नीविषयीं आपल्या कानांत गरळ ओकलें व त्या दिवसापासून आपल्या संसारसुखाला जी ओहोटी लागली ती कायमचीच ! यमूच्या चेहेऱ्यांत माझ्या चेहेऱ्याची छटासुद्धां नाहीं यामुळें तर माझी त्या चांडाळाच्या म्हणण्याविषयीं खात्रीच झाली ! किती मूर्ख मी ! त्या नीचाच्या सांगण्यांत सत्याचा अंशहि असता तर आपणाला कधीं तरी तसें दिसलें नसतें का ? बायका काय कधी माहेरीं जात नाहींत ? नवऱ्याशिवाय इतर पुरुषाशी त्यांच्या काय बोलण्याचालण्याच्या ओळखी असूं शकत नाहींत ? खरोखर महामूर्खच मी ! त्या दिवसापासून रमेशीं आपण एक शब्दसुद्धां कधीं प्रेमानें बोललों नाहीं किंवा यमू जन्माला आल्यापासून यमूचा कधीं पापा घेतला नाहीं ! आपण अशा प्रकारें प्रतारणा केली असतांहि तिचें माझ्यावरील प्रेम कायम रहावें, असें माझ्यांत तिला काय दिसलें ? निव्वळ या हिंदुस्थानांत मी 'हिंदु' म्हणून जन्माला आलों व हिंदुसंस्कृति रोमरोमांत भरलेली आर्यकन्या मला पत्नी लाभली म्हणूनच मी दगड असूनहि हिनें मला देवाप्रमाणें मान दिला नि माझी पूजाअर्चा केली. सारा जन्म तर हिचा आपण छळ केलाच पण उद्यां सकाळच्या आंत ही इहलोक सोडणार असें डॉक्टरांनीं निश्चयात्मक सांगितलें असतांहि उरलेले थोडेसे तास हिला सुख देण्याचें पुण्य आपल्या हातून घडलें नाहीं. कोणास ठाऊक ? मी काय बोललों तें तिला कदाचित् समजलेंहि नसेल ! इतक्या वर्षांत जिनें माझा कधींहि उपहास केला नाहीं ती मृत्यूच्या मांडीवरून तो करील, अशी मी कल्पना तरी कशी करून घेतली ? अशा विचारानें ते उठले व रमाबाईचें डोकें त्यांनीं पुनः आपल्या मांडीवर घेतलें. पण तें

सांवरलें जात नसल्याचें त्यांच्या लगेच लक्षांत आलें. अंगाला हात लावून पाहिला तों तें कालासारखें गार पडलेलें! गोविंदराव घाबरले. दाराची कडी काढून त्यांनीं शेजारच्या गृहस्थाला हांक मारली. त्या गृहस्थानें आपल्या पत्नीला उठविलें. ती बाई आली व तिनें रमाबाईंच्या अंगाला हात लावून पाहिला. रमाबाईनीं या नश्वर जगाला रामराम ठोकला होता. शेजारधर्म पाळण्यासाठीं ती बाई हेल काढून रडूं लागली. चाळींतील सर्व बिऱ्हाडें जागीं झालीं. पार्वतीबाई जाग्या होतांच त्या धांवतच रमाबाईंच्या प्रेताशीं आल्या व 'ताई' म्हणून त्या कलेवराला त्यांनीं घट्ट मिठी मारली. माधव त्यांच्या पाठोपाठ होताच. त्यालाहि रडूं आंवरणें अशक्य झालें. माणुसकीला स्मरून गंगाधरपंतहि आले व गोविंदरावांचें त्यांनीं यथोचित शब्दानीं सांत्वन केलें. रमाबाईंच्या मृत्युसमयीं त्यांना जीव कीं प्राण वाटणारी यमू त्यांच्याजवळ नसल्याबद्दल सर्वांनाच वाईट वाटलें.

एक खरी आर्य स्त्री या नश्वर जगाला सोडून शाश्वत सुख अनुभविण्यासाठीं स्वर्गांत निघून गेली! सारा जन्म तिनें दुसऱ्यासाठीं कष्ट सोसण्यांतच घालविला. त्या कष्टांचा मोबदला तिला कधीं मिळाला नाहीं व तिनेंहि त्याची कधीं अपेक्षा केली नाहीं. आपला देह चंदनाप्रमाणें दुसऱ्यांच्या सुखासाठीं झिजविणाऱ्या या आर्य स्त्रियांत किती जणींच्या नशिबीं सुखाचें मरण लिहिलेलें असेल तें एका परमेश्वरालाच माहीत!!



## हिरा— ९

गोविंदरावांची पत्नी रमाबाई गोविंदराव हयात असतांहि विधवा होती. परंतु रमाबाईंचे पति गोविंदराव आपल्या पत्नीच्या मृत्यूनंतरहि विधुर झाले नाहींत. त्यांची खासगी सौभाग्यवती अद्यापि हयातच असल्यामुळें त्यांना स्वतःला विधुरावस्थेचें दुःख यत्किंचितहि जाणवलें नाहीं.

जगांतील सर्वच माणसांच्या नाहीं तरी निदान स्वतःच्या दृष्टीनें तरी आपल्या पत्नीच्या मृत्यूला आपणच कारण झालों या जाणीवेनें, आपल्या पापाच्या क्षालनार्थ खासगी सौभाग्यवतीच्या दाराचा उंबरठा ओलांडावयाचा नाहीं असा निर्धार रमाबाईच्या मृत्यूबरोबर त्यांनीं केला. परंतु हें त्यांचें वैराग्य क्षणिक होतें. पांच सहा दिवसांतच संन्यस्त जीवनाचा कंटाळा येऊन ते आपल्या उपपत्नीच्या दर्शनाला गेले व तिच्याकडेच त्यांनीं आपला कायमचा तळ ठोकला.

रमाबाईच्या मृत्यूची वार्ता यमूला कळल्यापासून तिची स्थिति फारच केंविलवाणी झाली. आत्याबाईनीं चालविलेल्या जाचांत या नवीन दुःखाची भर पडल्यामुळें तिला ‘ नको हा जीव ’ असें होऊन गेलें. पुण्याला आपलें जाऊन यायचें म्हणून गोविंदराव गेले इतकेंच. तेथें गेल्यानंतर यमूच्या नजरेला नजर लावण्याची गोविंदरावांना भीति वाटूं लागली. कारण तिला पाहतांच त्यांना रमाबाईंची आठवण होई व त्यांच्या खुनाचें भीषण चित्र दिसूं लागे.

यमूचें पाप हातावेगळें करण्याचा त्यांनीं निश्चय केला. मात्र तसें करतांना नवरा मुलगा शक्य तितका चांगला शोधण्याचा त्यांनीं निश्चय केला व मेहुण्यांच्या मदतीनें त्या उद्योगास लागले. लवकरच त्यांना मनाजोगें स्थळ मिळालें व लगेच तिथि-निश्चयहि करून टाकण्यांत आला.

दुपारीं जेवण आटोपल्यावर यमू सुदाम्याकडे गेली. तिला आतां आत्याबाईच्या माराचें फारसें कौतुक वाटत नसे. शिवाय रमाबाई वारल्यापासून व विशेषतः गोविंदराव पुण्यास आल्यापासून आत्याबाईच्या वागणुकींत बराच फरक पडला होता. यमू आली तेव्हां सुदामा कांहींतरी लिहीत बसला होता.

यमू म्हणाली, " भाऊ, यापुढें तूं आतां कोणाजवळ शिकशील ?"

" असं कां विचारतेस तूं यमूताई ? "

" यापुढं मला तुला शिकवितां येणार नाहीं. "

" कां बरं ? तुझे वडील तुला मुंबईला घेऊन जाणार आहेत कीं काय ? "

" एवढं कुठं आहे माझं भाग्य ? त्यांनीं माझं लग्न ठरवून टाकलं असून आणखी आठदहा दिवसांतच मला सासरीं जावं लागणार आहे ! "

" वा: ! मग तुला आतां यमूताईऐवजीं यमूबाईच म्हणूं लागलं पाहिजे. तुला आतां अस्मान ठेंगणं वाटूं लागलं असेल, नाहीं ? "

" आपणास लग्नाचा सोहोळा अनुभविण्यास मिळणार म्हणून मुलींना लग्न ठरल्यावर आनंद वाटत असतो असं म्हणतात. पण मला मात्र माझ्या ठरलेल्या लग्नाबद्दल मुळींच आनंद होत नसून उलट दुःख मात्र होतं आहे ! "

" कां बरं ? आपल्या माहेरच्या माणसांना सोडून अनोळखी ठिकाणीं जावं लागणार म्हणून ? "

" नाहीं. माझ्या मनाला ओढ लावणारी माहेरीं अशी एकच व्यक्ति होती. पण देवानं तिलाहि माझ्यापासून दूर केली.–" हें बोलतांना यमूला आपल्या

आईची आठवण झाली व कंठ भरून आल्यामुळें तिला पुढें बोलतां येईना. सुदाम्याचेहि डोळे पाण्यानें भरून आले. दुःखाचा पहिला आवेग ओसरल्यावर यमू पुनः बोलूं लागली.

" भाऊ, तूं माझं एक काम करशील का ? "

" यमूताई, तुला याबद्दल शंका कां बरं आली ? तुझं कोणतंहि काम मी करीन. इतकंच नव्हे तर तें करीत असतांना मला इतर कोणत्याहि गोष्टीपेक्षां अधिक आनंद होईल. "

तिनें त्याला माधवाबद्दल सर्व हकिकत सांगितली. " त्यानें विचारलेंच तर त्याला माझा एवढाच निरोप सांग कीं, निव्वळ काकांच्या पुढें माझा कांहीं इलाज चालेना म्हणूनच माझं दुसऱ्याशीं लग्न झालं ! "

" तुझा निरोप तर मी सांगेनच. पण मी म्हणतों कीं, तूं त्याला एक पत्रच कां नाहीं लिहून टाकीत ? तुला पाकीट आणून देऊं का ? "

" नको. मला त्याला पत्रच लिहायचं असतं तर आजपर्यंत नसतं कां लिहितां आलं ? पण मला दुःख होत असलेलं पाहून त्याचा जीव तिकडे कळवळून जाईल आणि तें मला नको आहे. तो माझा आहे—मी त्याची आहें. त्याच्या जिवाला यातना होणं यापेक्षां माझ्या मनाला अधिक दुःखाची गोष्ट कोणतीच नाहीं. देव बिचाऱ्याला नेहेमीं सुखांत ठेवो ! आज ना उद्यां त्याला माझ्या लग्नाची गोष्ट कळेलच. त्याला पहिल्यानें जरा आश्चर्यच वाटेल. कांहीं दिवसांनीं कदाचित् त्याला माझा विसर पडेल व तो आपला संसारहि थाटील. माझा माधव !—कोठेंहि असला—कसाहि असला—तरी तो माझाच माधव ! त्यानें जरी..." इतक्यांत " यम्ये ' अशी आत्याबाईची कर्कश हांक ऐकूं आली.

आणखी आठदहा दिवसांनीं यमूचें लग्न झालें व ती सासरीं गेली. गोविंदराव मुंबईला आपल्या उपपत्नीकडे निघून गेले.

यमूचा नवरा बापूसाहेब इन्टर सायन्सच्या वर्गांत होता. त्याची आई आज बरेच महिने अंथरुणाला खिळून होती. आपल्या एकुलत्या एक मुलाचें लग्न झालेलें पहावें हीच तिची सरती इच्छा असल्यामुळें बाबासाहेबांनीं—बापूसाहेबांच्या वडिलांनीं—बापूसाहेबांचें लग्न उरकून टाकलें. बाबासाहेबांचीं स्वतःचीं मतें बालविवाहाच्या अगदीं विरुद्ध होतीं. परंतु पत्नीच्या शेवटच्या इच्छेपुढें त्यांनीं स्वतःच्या मतांची फारशी प्रतिष्ठा ठेविली नाहीं. या बालविवाहाचे दुष्परिणाम घडूं द्यावयाचे नाहींत अशाबद्दल दक्षता बाळगिण्याचा मात्र त्यांनीं संकल्प केला होता. लग्न झाल्यानंतर चारपांच दिवसांनीं बापूसाहेब मुंबईस परत गेला व बाबासाहेबांनीं यमूला—म्हणजे आतांच्या वैजयंतीला—मुलींच्या शाळेंत घातलें.

सुदाम्याला आतां त्याची जागा आवडेनाशी झाली. तेथें त्याला वारंवार आपल्या यमूताईची आठवण होऊं लागली. तिचें सासर त्याला माहीत होतें. पण तेथें जाण्यास त्याला धीर होईना. कारण त्या माणसांची सांपत्तिक स्थिति—त्यांचा सामाजिक दर्जा—वगैरेंचा विचार केला असतां आपण तेथें जाण्यानें त्यांना कमीपणा येण्याचा संभव आहे असें त्याला वाटे. बरें—आपण तिकडे गेलों तर यमूताईलाहि सुख होईलच म्हणून कोणी सांगावें? न जाणों, तिच्या सासरचींहि माणसें आत्याबाईच्या मनोवृत्तीचीं असलीं तर? असा सर्व दृष्टींनीं विचार करून त्यानें पुण्याची कायमची रजा घेण्याचें ठरविलें. मुंबईस गेल्यावर 'माधव' तरी आपणांस पहावयास सांपडेल, असेंहि त्याला वाटत होतें. मुंबईत जाऊन त्यानें एका खाणावळींत आपला तळ दिला. पहिले दोन दिवस 'मेंबर' म्हणून राहून तिसऱ्या दिवसापासून त्यानें त्याच खाणावळींत नोकरी धरली.

यमूनें सांगितलेल्या माधवाच्या पत्त्यावर तो गेला. परंतु त्या ठिकाणीं जाऊन पहातो तों माधव किंवा त्याचीं कोणीच माणसें त्या ठिकाणीं नव्हतीं! यमूताईनें आपणावर सोंपविलेली एवढी साधी गोष्टहि आपल्या हातून पार पडली नाहीं

याचें त्याला वाईट वाटलें. आणखी एकदोन दिवसांनीं त्याचें त्यालाच वाटूं लागलें कीं, झालें हें एका दृष्टीनें ठीकच झालें. यमूताईला आपण माधवाला पत्र लिहिण्यास सांगत होतों तेव्हां माधवाला वाईट वाटेल म्हणून तिनें पत्र लिहिण्याचें नाकारलें होतें! माधव आपणास भेटला असता व यमूताईचा निरोप आपण त्यास कळविला असता म्हणजे नसतें का त्याला वाईट वाटलें?

रमाबाईंच्या मृत्यूनंतर थोड्याच दिवसांत गंगाधरपंतांना मुंबई सोडणें भाग पडलें. त्यांना कांहीं तरी विकार झाला व मुंबई सोडून चांगल्या हवेच्या ठिकाणी जाऊन राहिल्याशिवाय गुण येणें शक्य नाहीं असा डॉक्टरांनीं त्यांस आपला अभिप्राय कळविल्यावरून एक तृतियांश 'पेन्शनींत' समाधान मानून त्यांना मुंबई सोडून कोंकणांतील आपल्या गांवीं जाणें भाग पडलें. माधवाचें शिक्षण अपुरें ठेवण्याची त्यांची इच्छा नव्हती. आपली तिकडे थोडीफार ओढाताण झाली तरी हरकत नाहीं पण माधवाचें शिक्षण पुरें होऊन त्यानें नांवारूपास यावें हीच त्यांची इच्छा!

माधव आतां कॉलेजच्या रेसिडेन्सींत रहात असे. आपला खर्च भागवितांना नानांना आतां जड जाणार याची माधवाला पूर्ण कल्पना होती. नानांना आपला फारसा भार पडूं नये म्हणून तो मधूनमधून एखादी शिकवणीहि करी.

शाळेंत असतांना त्याची पुष्कळ मुलांशीं मैत्री झाली होती. परंतु मॅट्रिक पास झाल्यानंतर बरीच पांगापांग झाली. कांहींनीं नोकऱ्या धरल्या—कांहीजण, नोकरी मिळण्याचें एक साधन म्हणून, शॉर्टहँड टाइपराइटिंग शिकूं लागले! कांहीं कॉलेजांत जाऊं लागले. खर्चाला सोयीचें म्हणून माधव विल्सन कॉलेजांत गेला. त्याच्या शाळासोबत्यांपैकीं फक्त एकच विद्यार्थी विल्सनमध्यें आला—कारण त्याची मॅट्रिक परीक्षेंतील 'टोटल' फारशी चांगली नव्हती. त्याचें नांव सुधाकर बांदिवडेकर. शाळेंत असेपर्यंत माधवाची नि त्याची फारशी सलगी नव्हती. कारण वर्गांतील उत्तम विद्यार्थ्यांत माधवाची गणना होत असे तर सुधाकर सर्व-

सामान्य गणला जाई. पण कॉलेजांत गेल्यानंतर इतर सर्व मुलें अगदींच परकी, त्या मानानें हेच दोघे एकमेकांना जवळचे वाटूं लागले. दोघांनाहि एकमेकांपासून कांहीं साधावयाचें नव्हतें. परंतु दोन वर्षांनंतर माधव हा कॉलेजांतील विद्यार्थ्यांच्या चर्चेचा विषय होऊन बसला. याला कारण कुमारी हिरा बांदिवडेकर.

हिरा ही सुधाकरची सख्खी बहीण. त्यांच्यांत फक्त दीडदोन वर्षांचें अंतर होतें. माधव आणि सुधाकर इंटर पास झाले तेव्हां ती मॅट्रिक पास झाली. सुधाकर विल्सनमध्यें होता म्हणून तीहि त्याच कॉलेजांत जाऊं लागली. हिरा दिसण्यांत सुरेख होती. तिचा वर्ण सुवर्ण–केतकीसारखा नसला तरी गोरा होता. तिच्या शरिराची ठेवण अत्यंत बांधेसूद होती. तिच्यांतील विशेष म्हणजे तिचे पाणीदार डोळे. वरवर पहाणाराला ती थिल्लर वाटे.

कॉलेज सुटल्यानंतर हिरा ज्या रस्त्यानें आपल्या घरीं जाई त्या रस्त्याला विद्यार्थ्यांची खूपच गर्दी उडत असे. कित्येक तिच्या आघाडीस चालत व कांहीं मुत्सद्दी डोक्याचे विद्यार्थी हिरेपेक्षां सावकाश चालून तिला आपल्या नजरेच्या टापूंत कायम ठेवीत. पुढें जाणारे विद्यार्थी हिरा चुकूनमाकून आपणांकडे पहात असेल या आशेंत दंग असत; बरोबर पण बाजूनें चालणारे विद्यार्थी एकमेकांच्या लाजेनें तिच्याकडे उघडपणें पहात नसत पण प्रत्येकजण एकमेकाची नजर चुकवून चोरट्या नजरेनें तिच्यावर मारा करण्यांत समाधान मानून घेत; तिला आपल्या नजरेच्या टापूंत ठेवणारे विद्यार्थी, आपण हिरेच्या पुढेंपुढें करणाऱ्या लंपट विद्यार्थ्यांपैकीं नाहीं अशी शेखी मिरवीत! त्यांपैकीं कांहींना मनांतल्या मनांत अशीहि शंका येत असे कीं, आपण तिच्याबरोबर किंवा तिच्या पुढून चालूं लागलों म्हणजे चुकूनमाकून तिच्या नजरेस पडणार आणि नजरेस पडल्यानंतर तिनें आपला चेहेरा आंबट केला तर? त्यापेक्षां तिलाच आपण आपल्या नजरेच्या टप्प्यांत ठेवणें बरें! याशिवाय दुसराहि एक फायदा या आपल्या मुत्सद्देगिरीनें साधतो हें त्यांना माहीत होतें. तो फायदा असा कीं, हिरा एखाद्या दिवशीं तडक आपल्या घरीं न जाता आपल्या एखाद्या नातलगाकडे किंवा मैत्रिणीकडे

गेली तर तिच्यापुढें चालणाऱ्या विद्यार्थ्यांना इच्छा असून सुद्धां संकोचामुळें मागें फिरण्याची कदर वाटत असे. बरोबर चालणाऱ्या विद्यार्थ्यांना, आपण छिचोर नसून सभ्य आहोंत असें हिरेवर इंप्रेशन ठेवण्याकरितां, सरळ आपला नेहेमींचा रस्ता सुधारणें भाग पडत असे पण मागच्या मुत्सद्यांना मात्र आपलें अंतर कायम ठेवून सरळ तिच्या मागोमाग जातां येत असे. त्यांना एकमेकांबद्दल फारशी भीड वाटत नसे. कारण साऱ्यांची जात एकच हें आतां त्यांपैकीं प्रत्येकाला कळून चुकलें होतें. बरें, आपण करीत असलेला पाठलाग हिरेच्या लक्षात यावा कसा ? कारण पाठीला कांहीं डोळे नसतात आणि बायकांनीं मागें वळून पाहिलें तर लोक त्यांना हंसतात म्हणून त्या भीतीमुळें ती मागेंहि वळून पाहील अशी त्यांना धास्ती वाटत नव्हती. परंतु एकदा हिरेनें त्यांची चांगलीच फजिती केली. त्या दिवसापासून ते तिच्या पुढून किंवा बरोबर तर नाहींच पण पाठोपाठ सुद्धां जाईनासे झाले. तो प्रसंग असा.

कांहीं विद्यार्थी आपापसांत थट्टामस्करी करीत आपल्या पाठोपाठ येत असतात हें हिरेला पक्कें माहीत होतें. थट्टेच्या निमित्तानें ते केव्हां केव्हां आपल्यावरहि शिंतोडे उडविण्यास कमी करीत नसतील हीहि तिची खात्री होती. एक दिवस कॉलेजांतून घरीं जात असतां ती एका नाक्याशीं थांबली व क्षणभर विचार केल्यासारखें करून घरचा रस्ता सोडून ती भलत्याच रस्त्यानें जाऊं लागली. पांच पन्नास पावलें गेल्यावर आपले पारधी आपल्या पाळतीवर असल्याबद्दल त्यांच्या आवाजावरून तिची खात्री झाली. तिनें आपलें तोंड फिरविलें, उलट दिशेनें परत फिरली व आपल्या नेहेमींच्या रस्त्यानें जाऊं लागली. फिरतांना तिनें मुद्दामच कोणाकडेहि पाहिलें नाहींसें केलें. कांहीं वेळानंतर आपला अंदाज बरोबर ठरतो कीं नाहीं हें पहाण्याकरितां तिनें एकदम तोंड फिरविलें. त्याबरोबर त्या मुत्सद्यांपैकीं प्रत्येकाचा चेहेरा असा कांहीं विलक्षण झाला कीं, त्यावेळीं एखाद्यानें त्यांचे फोटो काढून स्नॅपशॉट कॉंपिटिशनमध्यें

पाठविले असते तर पहिलें बक्षीस कोणत्या फोटोला द्यावें याची शहानिशा करण्यासाठीं परीक्षकाला चिठ्याच टाकाव्या लागल्या असत्या !

सुधाकर सहसा आपल्या बहिणीबरोबर घरीं जात नसे. कारण घरीं परत जातांना तिची एखादी मैत्रीण सुरुवातीला तिच्याबरोबर असेच.

सुधाकराचा जन्म कुलीन म्हणून ओळखिल्या जाणाऱ्या कुळांत झालेला नाहीं हें सर्व विद्यार्थ्यांस माहीत होतें. पण म्हणून सर्वच त्याला हीन कुळांतील मानीत होते असें नव्हे. परंतु लहानपणीं कांहीं मुलांकडून सुधाकराला आपल्या जातकुळीबद्दल कांहीं घाणेरडे शब्द ऐकून घ्यावे लागले असल्यामुळें त्यानें कोणाशींहि सलगी करावयाची नाहीं असें ठरवूनच टाकलें होतें. माधवबद्दल मात्र त्याला शाळेंत शिकत असल्यापासूनच आदर व प्रेम वाटत असे. परंतु मॅट्रिकच्या वर्गांत गेल्यापासून माधवच्या वृत्तींत मात्र कल्पनातीत बदल झाला होता. त्यानें खेळ वगैरे सर्व सोडून दिलेले पाहून कांहीं मुलें त्याला ' शिष्ट ' म्हणून चिडवूं लागलीं होतीं. सुधाकरानें मात्र त्या चिडविण्यांत कधीं भाग घेतलेला नव्हता. कॉलेजांत जाऊं लागल्यावर चारसहा दिवसांतच दोघांची बोलाचाल सुरूं झाली. सुधाकराला माधव इतका आवडूं लागला कीं, कॉलेज सुटल्यानंतर तास अर्धा तास तरी माधवाच्या खोलींत जाऊन त्याच्याशीं गप्पागोष्टी केल्याखेरीज त्याला घरीं जाववत नसे. सुधाकरहि त्याच्या अंगच्या गुणांमुळें माधवाला आपला मित्रसा वाटूं लागला. सुधाकर स्वभावानें फारच प्रेमळ असून त्याच बोलणें चालणें वगैरे अत्यंत सभ्य होतें. चार दोन दिवसांनीं सुधाकराच्या आग्रहावरून माधवालाहि त्याच्या घरीं जावें लागे. चारदोन महिन्यांतच दोघांची मैत्री जमली आणि माधव नि सुधाकर एकमेकांकडे वारंवार जाऊं येऊं लागले. हिरा कॉलेजांत येऊं लागेपर्यंत तर माधव व सुधाकर एकमेकांचे जिवलग स्नेही बनले होते.

त्या दोघांची मैत्री पाहून हिरेला फार आनंद होत असे. कारण तिलाहि माधवाबद्दल फार आदर वाटूं लागला होता. इतर विद्यार्थी त्यांचा व आपला

कांहींहि संबंध नसतांना आपल्या भोंवतीं भोंवतीं लुडबुडत असतात, पण हा तर इतके वेळां आपल्या घरीं आला पण आपणाकडे नुसती मान वर करूनहि यानें कधीं बघितलें नाहीं ! हा भीरु तर नसेल ना, अशीहि तिला एकदोनदां शंका आली होती. परंतु माधवाचें सुधाकराशीं होत असलेलें बोलणें ऐकल्यावर तिची ती शंका लगेच नाहींशी होत असे. कांहीं दिवसांनीं तिची खात्री झाली कीं, माधव हा अत्यंत तेजस्वी मनुष्य आहे—खरा मर्द आहे !

सुधाकराची आई थोड्याच वर्षांपूर्वी निवर्तली होती. आपल्या मुलांसाठीं तिनें बराच पैसा मागें ठेवला होता. सुधाकरानें मनांत आणलें असतें तर जन्मभर निरुद्योगी राहूनहि तो आपलें आयुष्य ख्यालीखुशालींत घालवूं शकला असता. परंतु आयत्या बिळावर नागोबा होऊन फणा हालवीत बसण्याची त्याची मनःप्रवृत्ति नव्हती. हीन धंदा करून द्रव्यार्जन केलें असलें तरी त्या द्रव्याचा सद्व्यय करण्यांत पाप खास नाहीं हें त्याला समजत होतें.

प्रत्येक रविवारीं व सुटीच्या दिवशीं माधवानें सुधाकराकडे तीनचार वाजतां चहाला जावयाचें हें तर अलीकडे अगदीं ठरल्यासारखेंच झालें होतें. त्याचप्रमाणें बहुतेक त्याच सुमारास हिरेची एखाददुसरी मैत्रीणहि तिच्याकडे आलेली असावयाची !

अशाच एका रविवारीं माधव सुधाकराच्या घरीं आला असतां, हॉलमध्यें एकटी हिराच बसलेली त्याला दिसली.

" सुधाकर कुठें आहे ? "

" दादा आज दुपारींच कुठं बाहेर गेला आहे. "

" बरं, मग मी जातों तर. तो घरीं आला तर संध्याकाळीं सहा वाजतां मी त्याला मलबार हिलवर बोलावलं आहे म्हणून सांगा—"

" हो—पण तुम्ही असेच निघून गेलांत तर दादा रागावेल मला. तुम्ही आलांत म्हणजे तुम्हाला चहा घेतल्याशिवाय जाऊं देऊं नको असं दादा मला बजावून गेला आहे. "

" तो तुमच्यावर रागावला तर त्याला माझं नांव सांगा म्हणजे झालं. त्याचा निरोप सांगण्याचं काम तुम्ही केलंत, मी आपला फार आभारी आहें. "

" मी आपल्या पदरचं कांहींतरी सांगतें आहें, अशी तर तुम्हांला शंका आलेली नाहीं ना ? "

" तशी शंका मला आली असती तर तसं उघड बोलून दाखविण्याइतकं धैर्य माझ्या अंगीं आहे. "

" दादा इथं असता म्हणजे तुम्ही थांबलांच असतां ना ? "

" हा प्रश्न अप्रयोजक आहे. "

" मग मी त्याची बहीण तरी आहें ना इथं ? "

" पण त्या बहिणीचा नि माझा परिचय नाहीं. "

" परिचय केल्याशिवाय आपोआप कसा व्हावा ? "

" पण मला त्याची तितकीशी आवश्यकताच वाटत नाहीं. "

हिरेला माधवाचें हें बोलणें जरा उर्मटपणाचें वाटलें. पण माधवाची तिच्यावर छापच अशी होती कीं, तिला त्याच्यावर रागावणें शक्य नव्हतें.

" जगांतील प्रत्येक गोष्ट कांहीं आपण आवश्यकतेसाठींच करीत असतों असं निदान मला तरी वाटत नाहीं. आपला परिचय होणं आवश्यकच नसलं तरी त्यांत निदान अनिष्ट तरी कांहीं नाहीं ना ? " हिरेनें विचारलें.

" मला या प्रश्नाचं उत्तर देतां येत नाहीं. "

" तें कांहीं असलं तरी मी तुम्हाला इथून चहा घेतल्याशिवाय जाऊं देणार नाहीं, " असें म्हणून ती दारांत जाऊन उभी राहिली. तिच्या हेकेखोर-पणाचा व फाजील धीटाईचा माधवाला फार राग आला. परंतु एका दृष्टीनें त्याचा नाइलाज झाला. तो एका खुर्चीवर बसला व टेबलावर पडलेलें एक

मासिक तो चाळूं लागला. हिरेनें स्वयंपाकिणीला हांक मारून चहा करण्यास सांगितलें. आतां एकदां बसल्यानंतर चारदोन औपचारिक गोष्टीहि न बोलणें अप्रस्तुत होय, असें माधवाला वाटूं लागलें. नाहींतर हिरेला काय वाटेल याची त्याला कांहींच फिकीर वाटत नव्हती. परंतु आपण हिच्याशीं एक शब्द-सुद्धां बोललों नाहीं हें तिनें सुधाकराला सांगितलें म्हणजे त्याला काय वाटेल, असें मात्र त्याला राहून राहून वाटूं लागलें.

" एवढ्या उन्हाचा कुठं बुवा बाहेर पडला हा ?" तो म्हणाला,

माधवाचा व हिरेचा आतांपर्यंत जो संवाद झाला होता, त्यामुळें माधवाच्या तुसडेपणाबद्दल तिला राग आला नसला तरी वाईट वाटत होतें. स्वयंपाकीण-बाईला चहा करावयास सांगितल्यानंतर माधवाला पुस्तकाचीं पानें चाळीत बसलेला पाहून तर याला आपण चहाचा आग्रह केला नसता तर बरें झालें असतें असें तिला वाटूं लागलें होतें. कांहींतरी करावयाचें म्हणून ती फुल-दाणींतील फुलांशीं खेळत बसली होती. माधवानें, प्रश्नरूपानें कां होईना, पण बोलण्यास सुरवात केली याचा तिला आनंद झाला.

" त्याला जाणंच भाग होतं, त्याला काय करणार ? तुम्हांला उगाच फेरी पडणार म्हणून त्याला कितीतरी वाईट वाटलं ! "

" वाईट वाटलं ? वाईट वाटण्यासारखं यांत काय आहे ? मित्राला भेटायला पाहिजे, मग एखादे वेळीं एखादी फेरी फुकट जाणारच ! त्यांत बिघडलं कुठें ! बरं—एवढयाशा फेरीचा त्रास वाटण्याइतका कांहीं मी नाजुक प्रकृतीचा नाहीं. "

" मनाचं समाधान मानून घेणं ही गोष्ट निराळी ! परंतु ज्या कामासाठीं आपण बाहेर पडतों तें झालं नाहीं म्हणजे मनाला थोडं तरी वाटल्याशिवाय रहातं का ? "

" हो—पण माझ्या प्रश्नाचं नक्की उत्तर मला मिळालंच नाहीं. "

" आमची कांहीं नातलग मंडळी आज गांवाला गेली. त्यांना पोहोंचविण्या-साठीं तो बोटच्या धक्क्यावर गेला आहे. "

" असंच का ? मग तो येईलच कीं इतक्यांत. मला वाटतं तो घराजवळ आलाहि असेल. "

इतक्यांत जिन्यावर पावलांचा आवाज ऐकूं आला.

" आलाच वाटतं दादा–" असें म्हणून हिरा जिन्याकडे धांवली. त्या धांद-लींत तिचा धक्का लागून फुलदाणी कलंडली व त्यांतील गुलाबाचा गुच्छ माधवाच्या अंगावर पडला. गर्दीत तें हिरेच्या लक्षांतहि आलें नाहीं. इतक्यांत सुधाकर दारांत येऊन पोहोंचलाच.

" Hearty congratulations, Madhavrao–" सुधाकर हंसत हंसत म्हणाला.

" कां रे बुवा ? कशाबद्दल हें अभिनंदन ? "

" हिरेची मैत्री संपादन केल्याबद्दल ! "

" तुला कांहीं तरी भ्रम झाला आहे–" माधव म्हणाला.

" दादा, हल्लीं तूं फारच चहाटळ झाला आहेस हं–" रागाच्या लटक्या अविर्भावांत माधवाकडे पाहून हिरा म्हणाली.

" हो–पण तोंडानं–" सुधाकरानें टोमणा मारला.

" चल–मी जातेंच कशी–" असें म्हणून व माधवाकडे एकदां पाहून हिरा फणकाऱ्यानें जाऊं लागली पण सुधाकरानें तिचा हात पकडून ठेवला.

" लबाडे, रागाचं नाटक करतेस काय ? फुलदाणींतील फुलांना मी नुसता हात लावला तर माझ्यावर एवढाले डोळे करणारी तूं !–आतां माधवानें तो सबंध गुच्छ घेतला तो तुला चालला ना ? "

हिरेला माहीत नव्हतेंच पण माधवालाहि तो गुच्छ आतांच दिसला. हर्षमिश्रित लज्जेची छटा हिरेच्या गालांवर दिसूं लागली. माधवाचा चेहरा गंभीर झाला. त्यानें तो गुच्छ हातांत घेतला. गुलाबाचीं सुंदर फुलें तीं ! हातांत आल्यानंतर त्यांचा मधुर सुवास उपभोगण्याच्या इच्छेचें दमन करू शकणारा मनुष्य विरळाच ! त्या गुच्छाचा माधवानें वास घेतला. तो आपल्या दोन्ही डोळयांवरून फिरविला. सुधाकर व हिरा दोघांनाहि अतिशय आनंद झाला. इतक्यांत चहा आला. चहा घेत असतांहि माधव कांहीं बोलला नाहीं. माधव कसल्या तरी गूढ विचारांत गढून गेला आहे, हें सुधाकराच्या तेव्हांच लक्षांत आलें. आपण केलेली थट्टा याला फारशी रुचली नसावी अशी त्याला भीति वाटूं लागली.

हिरेची कोणी मैत्रीण इतक्यांत आली म्हणून तिला घेऊन ती आपल्या खोलींत निघून गेली. स्त्रियांचे भाव स्त्रियांपासून लपून रहात नाहींत. हिरेच्या मनाचा ठाव तिच्या मैत्रिणीला तेव्हांच लागला. मैत्रिणीच्या थट्टेचा आपल्याला फार राग येत आहे असें हिरा दाखवीत होती पण मनांतून मात्र तिला अवर्णनीय आनंद होत होता.

माधवाची दृष्टि त्या गुच्छावर खिळून बसली होती. त्याच्या चेहेऱ्यावर निरनिराळया विचारांच्या लाटा उमटत होत्या.

"माधव, मी केलेली थट्टा तुला आवडली नाहीं होय?" सुधाकरानें विचारलें.

सुधाकराच्या प्रश्नाकडे माधवाचें लक्षच नव्हतें.



## गुलाबाचा कांटा— १

पत्नीची सरती इच्छा पुरी करण्यासाठींच म्हणून केवळ बाबासाहेबांनीं सूनबाईला घरांत आणलें परंतु त्या दिवसापासून त्यांच्या पत्नीला—माईसाहेबांना—गूण पडूं लागला. वैजयंतीला माईसाहेब इतक्या प्रेमानें वागवीत कीं, तिला आपल्या आईची वारंवार स्मृति होत असे. तिला कधींकधीं असेंहि वाटे कीं, आपल्या आईचा आत्मा जुन्या कुडीचा त्याग करून माईसाहेबांच्या शरिरांत तर वास्तव्य करण्यास आला नाहीं ना ?

बाबासाहेबांचें माईसाहेबांवर खरोखर फारच प्रेम; आणि माईसाहेब होत्याहि तशाच. बाबासाहेबांच्या हलाखीच्या परिस्थितीपासून आतांच्या वैभवशाली स्थितीपर्यंत माईसाहेबांनीं त्यांची पूर्ण दिलजमाईनेंच साथ केली होती. म्हणून आपल्या पत्नीला आवडणारी प्रत्येक गोष्ट करण्यांत बाबासाहेबांना धन्यता वाटत असे. अशा करण्यानें आपण एका दृष्टीनें आपल्या पत्नीचें ऋण फेडींत आहोंत, असें सात्विक समाधान त्यांच्या मनाला होत असे. वैजयंतीवर आपल्या पत्नीचें मुलीप्रमाणें प्रेम बसलें आहे, हें बाबासाहेबांच्या लक्षांत येण्यास फारसा अवधी लागला नाहीं. त्यांनाहि ती आवडूं लागली व जों जों वैजयंतीच्या एकेका सद्गुणाचा त्यांना प्रत्यक्ष अनुभव येत गेला तों तों त्यांनाहि ती आपली कन्याच वाटूं लागली ! यमूला एकंदरींत सासर फारच चांगलें मिळालें होतें यांत शंका नाहीं. असें सासर दुसऱ्या एखाद्या मुलीस

मिळालें असतें तर पूर्वजन्मींचीं सुकृत्यें फळाला आल्यासारखा तिला आनंद झाला असता. आपल्यावर आईबापाप्रमाणें प्रेम करणारे सासूसासरे, सुंदर, आरोग्यसंपन्न व सुशिक्षित नवरा, सासरची गडगंज संपत्ति व त्या संपत्तीला आपल्या नवऱ्याव्यतिरिक्त कोणीहि वारस नसणें, इतक्या गोष्टी एकत्र जमल्यावर साधारण कुठल्या मुलीला धन्यता वाटणार नाहीं ?

यमूची सासरीं वागणूक पहिल्यापहिल्यानें एखाद्या कळसूत्री बाहुलीप्रमाणें असे. सासूनें किंवा सासऱ्यानें सांगितलेलें एखादें बारीकसारीक काम करावें, आपला अभ्यास करावा, कपाटांत पुष्कळशीं पुस्तकें होतीं त्यांपैकीं एखादें सासूबाईंना विचारून वाचीत बसावें, पानें वाढलीं कीं जेवायला जावें ! माई-साहेबांना वाटे कीं, ही नवीन असल्यामुळें हंसाबोलायला हिला संकोच वाटतो !

तिला करमणुकीचीं साधनें अशीं दोनच. एक पुस्तकें वाचणें व दुसरें घरा-भोंवतालच्या प्रशस्त बागेंत सहल करणें. बागेंत उमलणाऱ्या सुंदर सुंदर कळ्यांकडे व फुलांकडे पाहून तिला वारंवार असें वाटे कीं, यांना भावना नाहींत हें किती चांगलें आहे ! यांना भावना असती, यांना आवडनिवड असती, यांना बरेंवाईट समजत असतें, तर यांना चोवीस तास हंसत रहाणें शक्य झालें असतें का ? यांच्या जवळ मी गेलें तरी यांच्या आनंदांत भर पडत नाहीं किंवा म्हातारा माळी गेला तरी त्यांना तिरस्कार वाटत नाहीं किंवा खेद होत नाहीं ! पूर्णतेला पोहोंचलेली यांची ही स्थिति ! भावनांचा पूर्ण अभाव हेंच का पूर्णतेचें लक्षण ? तिच्या मनाचा गोंधळ उडून जाई. या सुंदर फुलांना देवाच्या डोक्यावर नेऊन बसविलें काय किंवा यांची माळ करून एखाद्या नंदीबैलाच्या शिंगाला बांधली काय, यांना सुखःदुख कांहींच नाहीं !

मनुष्यानें प्रयत्न केला तर त्यालाहि आपलें मन असें करतां येईल काय ? परिस्थिति अनुकूल असो वा प्रतिकूल असो, आपला आनंद कायम ठेवणें

मनुष्याला शक्य होईल काय? फुलें नेहमीं हंसतात, माणसें नेहमीं हंसत राहिलीं तर काय होईल?

फुलें तरी नेहमीं हंसतात कशावरून? आणि हंसतच असलीं तर त्यांचें तें हंसणें खऱ्या आनंदाचें कशावरून? त्यांचें तें हंसणें वरवरचेंहि असूं शकेल! फुलांचें तरी अंतरंग आपणांस दिसतें आहे कोठें? फुलें–माणसें, बहिरंग–अंतरंग, आनंद–दुःख, वैजयंतीला कशाचाच ठाम निर्णय करितां येईना. शेवटीं तिनें कसलाहि विचार करणेंच सोडून दिलें. फुलांचें अंतर्याम आपण पाहूं शकत नाहीं आणि माणसांचें तरी कुठें पाहूं शकतों? वरवर सदैव आनंदी दिसणारा मनुष्य खरोखर आनंदीच असला पाहिजे असा सर्व जगाला भास होत असतो व असा आनंदी मनुष्य सर्वांना प्रियहि वाटतो. आपण तरी दुःखी दिसण्यापासून जगाला किंवा आपणाला काय फायदा?

बागेंत सहल करीत असतांना पूर्वी तिच्या भावना जागृत होऊन तिला आपले अश्रू आंवरणें कठीण जात असे. आतां तिनें न रडण्याचा निश्चय केला होता. फुलें हंसतात त्याप्रमाणें आपणाहि हंसायचें, फुलें आनंदी दिसतात त्या-प्रमाणें आपणहि आनंदी दिसावयाचें!

बापूसाहेब आतां मेडिकल कॉलेजाच्या दुसऱ्या वर्षांत होते. मेडिकल कोर्स घेतलेल्या विद्यार्थ्यांना प्रत्येक सुट्टींत आपापल्या गांवीं जाऊन भागत नाहीं. परंतु बापूसाहेब मात्र सुट्टी आली कीं, पुण्यास जावयाचाच! आपल्या बरो-बरीच्या मित्रमंडळीला आपली आई आजारी असल्याची तो नेहेमीं सबब सांगे. आपलें लग्न झालें असल्याचेंहि त्यानें आपल्या मित्रमंडळीला अजून कळविलें नव्हतें. वास्तविक ही गोष्ट लपविण्याचें त्यास कांहींच कारण नव्हतें. परंतु बरोबरीच्या कोणाचेंच लग्न झालेलें नाहीं, आपणालाहि त्या बाबतींत कोणी विचारलें नाहीं, मग राहीना कां आपल्या लग्नाची गोष्ट अशीच गुप्त!

नाताळच्या सुट्टींत घरीं आगाऊ कांहींच न कळवितां बापूसाहेब एका सकाळीं अचानक पुण्यास आला. वैजयंती आतां बरीच मोठी झाली होती.

सध्यां ती इंग्रजी सहावींत होती. इयत्ता सहावीच असली तरी तिनें इतकीं पुस्तकें वाचलीं होतीं कीं, एखाद्या उनाडटप्पू कॉलेज विद्यार्थ्याला त्यांपैकीं कांहींचीं नांवेंहि माहीत नसतील ! ती आपल्या हल्लींच्या ठराविक कार्यक्रमाप्रमाणें पहांटेची महल करून आल्यावर बागेंतील कोणतीं फुलें तोडावींत याची परीक्षा करीत होती. बापूसाहेब आला तेव्हां ती एका गुलाबाच्या ताटव्याशीं उभी होती. अजून कांहीं स्वच्छ दिसूं लागलें नव्हतें. तिनें बापूसाहेबांना पाहिलेंच नव्हतें. बापूसाहेब हळूंच तिच्या मागून गेला. गुलाबाचें कोणतें फूल पहिल्यानें तोडावयाचें याबद्दल एव्हांना तिचा निश्चय झाला होता व ती तें तोडणार तोंच बापूसाहेबानें तिचे डोळे झांकले. वैजयंती बेसावध असल्यामुळें आपले डोळे पाठीमागून कोणी तरी झांकलेले पहातांच तिची धांदल उडाली आणि त्या धांदलींत त्या गुलाबाचा एक भला मोठा कांटा तिच्या बोटांत घुसला.

"आई ग बाई—" वैजयंती ओरडली.

बापूसाहेबाचे हात आपोआप सुटले. त्याला वाटलें, आपण हिचे डोळे फार जोरानें धरले कां आपल्या बोटांना कांहीं केरकचरा होता तो हिच्या डोळ्यांत गेला ? डोळ्यांवरील हात निघाल्याबरोबर वैजयंतीनें मागें वळून पाहिलें.

"वैजयंती, इतकी का तूं भित्री आहेस ?"

वैजयंती कांहींच बोलली नाहीं. आपल्या बोटांत घुसलेला गुलाबाचा कांटा ती काढूं लागली.

"काय झालं हाताला ?"

"बोटाला कांटा लागलासा वाटतो—"

"हात्तिच्या ! कांटा म्हणजे गुलाबाचाच ना ? स्त्रियांची जात नाजुक असते म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. गुलाबाचा कांटा बोटाला टोंचला तर तूं एवढ्यानं किंचाळलीस ! बाकी शकुंतला नाहीं का पायांत दुर्वांकुर रुतला म्हणून कष्टी

झाली ? स्त्रीत्वाची यांतच खरी लज्जत आहे. बाकी हा बेटा गुलाब अगदींच अरसिक ! गुलाबाच्या कांट्यानें गुलाबालाच दुखवावें म्हणजे काय ? ''

" त्या बिचाऱ्याकडे काय दोष ? कोणीं आपल्याला त्रास दिला म्हणजे आपलं बोंचायचं एवढंच त्याला माहीत ! "

" म्हणजे गुलाब हा काय विंचू आहे कीं काय ? कोणाचाहि स्पर्श झाला तरी आपला मारतो आहे नांगी ! "

" गुलाब तो गुलाबच ! तो विंचू कसा बरं होईल ? आजपर्यंत मी या झाडावरचे शेंकडों गुलाब काढले असतील–एकदांसुद्धां मला कांटा लागला नाहीं ! "

" आणि त्याला लागायला आजच मुहूर्त सांपडला वाटतं ? चांगला आहे म्हणायचा आमचा पायगूण ! "

" तुम्ही माझे न कळत डोळे झांकलेत–मी दचकलें–हाताला झटका बसला–बोटाला कांटा लागला ! "

" म्हणजे या सर्वाला कारण मीच, असंच ना ? नशीब माझं म्हणायचं ! बरं, पण निघाला तरी का तो आतां ? "

" खुपतो आहे पण बोटांत सांपडतच नाहीं. "

" बघूं बरं–मला निघतो का–"

वैजयंती नको नको म्हणत असतांनाच त्यानें तिचा हात आपल्या हातांत धरला. पहांटेची प्रशांत वेळ, रंगीबेरंगी सुंदर सुंदर फुलांनीं नटलेली बाग, अगदीं नुकत्याच फुललेल्या मोगऱ्याच्या फुलाप्रमाणें दिसणारी नवोढा तरुणी आणि तीसुद्धां कोणी तरी तरुणी नव्हे–आपली हक्काची लग्नाची बायको ! असा प्रसंग वांया दवडील तर तो तरुणच कसला ? एखादा म्हातारासुद्धां अशा प्रसंगीं थोडासा तरुण बनावयाचा ! मग बापूसाहेब देहभान विसरून गेला तर त्यांत नवल कसलें ? वैजयंतीचा हात तर त्यानें धरलाच होता. तिचा चेहेरा कांच्याच्या

यातनेमुळें थोडा दुःखी दिसत होता. तरुणी रागावल्या म्हणजे फार सुंदर दिसतात असें बापूसाहेबाच्या वाचनांत आलें होतें. पण त्याला वैजयंतीच्या दुःखी चेहेऱ्यांतच काव्य दिसलें. एकदोन क्षण त्यानें तिच्याकडे डोळे भरून पाहिलें. तिचें लक्ष आपल्या बोटाकडेच होतें. एका हातांत त्यानें तिचा हात धरला होता, दुसरा हात त्यानें तिच्या खांद्यावर टाकला. खांद्यावर टाकलेल्या हाताच्या बोटांनीं त्यानें तिची हनुवटी आपणाकडे वळविली व आपलें तोंड तिच्या तोंडाजवळ नेलें. वैजयंतीनें झटकन् आपला हात सोडविला व बाजूला झाली.

"मला वाटलं नव्हतं असला कांहीं अतिप्रसंग करण्याचा तुमचा बेत आहे!"

"म्हणजे काय वैजयंती? यांत अतिप्रसंग तो काय झाला? मी कोणी परका कां आहें?

"तें मला कांहीं समजत नाहीं. गुलाबाच्या कांट्याचं उदाहरण डोळ्यासमोर ठेवा म्हणजे झालं!"

असें म्हणून वैजयंती झटक्यानें निघून गेली. ती काय म्हणाली, म्हणाली तें कोणत्या अर्थानें म्हणाली, त्याच्या कांहीं लक्ष्यांत येईना. तो 'नर्व्हस' झाला. त्याला त्या बागेंत उभें राहूं नयेसें वाटूं लागलें. आपल्या हातून खरोखरच कांहीं चूक झाली का? लग्न झालेल्या तरुणींना, नवऱ्यानें थट्टामस्करी केली म्हणजे आनंद होतो म्हणतात. एकांतांतील पहिल्याच भेटीला कसला अनुभव आला हा? शिक्षण-क्रम पुरा झाल्याशिवाय विवाहिताप्रमाणें वागावयाचें नाहीं असें त्याला बाबा-साहेबांनीं सांगितलेलें त्याच्या लक्षांत होतें. वैजयंतीला देखील त्यांनीं अशीच आज्ञा केली असेल व म्हणूनच त्यांच्या भीतीनें ती पळून गेली असेल! ही आज्ञा काय इतक्या कडक रीतीनें पाळायची असते? बोलणें तरी किती करारी बाण्याचें? अल्लड तरुणीला हें बोलणें शोभतें तरी का? माझ्याबरोबर बोलतांना ही लाजली

नाहीं, हंसली नाहीं ! मी तिचा हात माझ्या हातांत धरला तेव्हां तिच्या अंगाला कंपहि सुटला नाहीं. माझी चांगलीच फजिती झाली म्हणावयाची ! छे, मला कल्पनाहि नव्हती कीं, माझी अशी फजिती होईल ! आतां घरांत तरी कशाला जायचें ? वैजयंती पुनः माझ्या दृष्टीला पडली तर मला तिचा तिरस्कार तरी वाटेल किंवा संताप तरी येईल ! निदान मला तिच्या संबंधानें पूर्वीप्रमाणें प्रेम तर वाटणार नाहींच ! पण आपण असेच परस्पर मुंबईस निघून गेलों आणि आपण आल्याचें वैजयंतीकडून आपल्या आईस किंवा वडिलांस कळलें तर ? परंतु ही भीति निरर्थक आहे. हिच्या आतांच्या वागणुकीवरून ही मी आल्याचें आपण होऊन कोणाजवळ सांगेल असें वाटत नाहीं. जावेंच हें बरें, असा निश्चय करून बापूसाहेब तसाच स्टेशनवर निघाला.

दुसऱ्याच दिवशीं पुण्याच्या एका वर्तमानपत्रांत जाडजाड मथळे देऊन बातमी आली. ती बातमी अशी—

"—आम्ही पहांटेची सहल करावयास गेलों असतां—आम्ही नेहमींच पहांटेची सहल करतों—एका श्रीमंत व थोर घराण्यांतील गृहस्थांच्या बंगल्यासमोर आम्हांस एक अत्यंत उद्वेगजनक दृश्य पहावें लागलें ! पहावें लागलें म्हणजे काय ? आम्हांला दिसलेंच तें ! पहांटेच्या प्रशांत, रम्य, निर्मळ व पवित्र वेळीं असला हिडिस प्रकार पहाण्याचा आमच्यावर प्रसंग येईल अशी आम्हांस यत्किंचितहि कल्पना असती तर आम्ही आपल्या झोंपडींतून बाहेरच पडलों नसतों ! आम्हांला जो प्रकार दिसला—जो प्रकार पहाण्याची आमची इच्छा नसतांहि आम्हांला दिसला—तो जसाचा तसाच आम्ही वाचकांना—आमच्या प्रेमळ वाचकांना—सादर करीत आहोंत ! त्या तशा समयीं एक सुंदर व तरुण युवती—बहुधा ती त्या थोर गृहस्थाची कन्यका असावी—बागेंत फुलें तोडीत होती. बागेच्या फाटकावरून एका तरुणानें बागेंत उडी मारली व त्या युवतीशीं अतिप्रसंग करण्याचा त्यानें प्रयत्न केला !

गुलाबाचा कांटा—

अरेरे ! काय हें ? अरे, हें काय ? तो प्रसंग पहातांना आम्हांला असें झालें कीं, असलीं दृश्यें पहावीं लागण्यापेक्षां आम्हांला परमेश्वरानें डोळेच दिले नसते तर फार बरें झालें असतें ! काय ? हा प्रसंग कीं थट्टा ? बरें तर बरें, कीं ती युवती थोडीशी तरी धीट होती. तिनें तेवढ्यांत बहादुरी केली व ती आवेशानें बंगल्यांत पळून गेली. आंत जाऊन तिनें दाराला लावलेल्या कडीचा आवाज आमच्या कर्णपथावर येऊन आदळला, तेव्हां आम्हांला हायसें वाटलें ! तो निधड्या छातीचा पण उलट्या काळजाचा तरुण एकदोन क्षण ती गेल्या वाटेकडे पहात राहिला व शेवटीं दीर्घ निःश्वास टाकून खालीं मान घालून तो त्या बागेंतून बाहेर पडला. त्याच्या दोन श्रीमुखांत भडकवाव्या असें राहून राहून आमच्या मनांत येत होतें. पण तो पडला तरुण, आम्ही पडलों वयस्क ! आमच्या अंगावर सुद्धां तो हात टाकणार नाहीं कशावरून ? त्यांतून सुद्धां आम्ही त्याच्या अंगावर हात टाकण्याचा हिय्या केला असता, नाहीं असें नाहीं ! पण हे दिवस हाताहाती करण्याचे आहेत कुठें ? प्रत्येकानें एकमेकापासून चार हात दूर रहाण्याचे हे दिवस ! कोणाशीं दोन हात कराच कशाला ? फट् म्हणतां ब्रह्महत्या झाली तर काय करा ? त्या तरुण आडदांडाला—आश्चर्याची व खेदाची गोष्ट ही कीं, तो तरुण हिंदु होता—हिंदु संस्कृतीला केवढा काळिमा हा ? त्या तरुण आडदांडाला शासन घडविण्याऐवजीं आम्ही त्याचा हा रानदांडगेपणा आमच्या वर्तमानपत्रांत छापून सर्वच तरुण वर्गाचे कान उपटण्याचें मनाशीं ठरवून टाकलें व त्याच उद्देशानें आज हातांत कलम धरलें आहे !

परतंत्र हिंदुस्थानांतील दुर्बल तरुणांनो—दुर्बल हिंदु तरुणांनो, काय हें ? भारतमातेच्या सुपुत्रांनो, अरे काय हें ? आर्यावर्तांतील आर्यांच्या छाव्यांनो, अरे—काय—काय हें ! अरे, कांहीं पूर्वजांचे प्रखर पराक्रम आठवा, नसते ढंग काय करीत बसलांत ? आपली मायभूमि परक्यांच्या टांचांखालीं ठेंचली जात आहे आणि तुम्हीं असले घाणेरडे छंद करीत बसलांत ? स्वतःला तरुण म्हणवितां त्यापेक्षां आमच्याप्रमाणें म्हातारे कां नाहीं होत ? अरे, कांहीं पूर्वजांचे

स्मरण ठेवा, परंपरेला अगदींच पारखे होऊं नका! अरे, तुम्ही कोण आहांत? ' आकाशांतून पडले आणि धरणीनें सांवरले ' अशांपैकीं तुम्ही नाहीं, याबद्दलचा तुम्हांला कांहींच अभिमान वाटत नाहीं का? तुमचें बीज कसलें आहे तुम्हांला माहीत नाहीं का? तुमच्या रक्ताचें उगमस्थान तुम्हीं विसरलां का? अरे, तत्त्वज्ञानाचे धडे सर्व जगाला शिकवावेत असा ज्यांचा थोर अधिकार, त्या महान् तपस्व्यांनीं—त्या महर्षींनीं तुम्हांला जन्म दिला आहे! ज्यांनीं आपल्या अतुल क्षात्रतेजानें एका काळीं देवादिकांनाहि लाजविलें अशा दैदीप्यमान रण-धुरंधरांचें रक्त तुमच्या धमन्यांतून वहात आहे, याचें तुम्हांला अगदींच कसें विस्मरण झालें? त्या थोर ऋषिमुनींचीं किंवा त्या महापराक्रमी रणधुरंधरांचीं, त्या समरशार्दूलांचीं नांवें तरी तुम्हांला माहीत आहेत का? नाहींत ना तीं तुम्हांला माहीत? ती तुम्हांला माहीत नाहींत ना? कोठून माहीत असणार? तुम्हांला फक्त तुमच्या कॉलेजांतील मुलींचीं नांवें पत्त्यांसहित माहीत असा-वयाचीं! तुमच्या शूर पूर्वजांचीं नांवें तुमच्या गांवींहि असणें शक्य नाहीं! तुमच्या पूर्वजांचीं नांवें तुम्हांला माहीत नाहींत म्हणून समजा तीं तुम्हांला कोणी सांगितलीं तर तुम्हांला थोडेंसें बरें वाटेल असें तरी आहे का? आणि शिवाय तीं नांवें तुम्हांला सांगावयाचीं म्हटलीं तर तीं सांगणार तरी किती? तीं पुष्कळहि आहेत आणि तीं कळल्यामुळें तुम्हांला आनंद होईलच असेंहि नाहीं! मग तीं तुम्हांला सांगण्यांत अर्थ तरी काय? तुम्हांला पुराणें तर माहीत नाहीं-तच आणि आपली व इतिहासाची ओळख आहे हाहि तुमचा भासच आहे! ज्यांनीं महान् महान् सिद्धान्त संस्कृत भाषेंत लिहून आपलें नांव केवळ या भारतवर्षांतच नव्हे तर अलम दुनियेंत दुमदुमत ठेवलें, ज्या वीरांनीं या आर्यावर्तांत शस्त्रास्त्रांच्या पराक्रमाची शर्थ करून दुष्टांच्या रक्ताचा सडा घातला—रक्त! रक्त!! सांगण्याचा मुद्दा राहिलाच कीं, तो तरुण पळून गेल्यानंतर आम्ही हळुवार पावलांनीं त्या बागेंत शिरलों आणि हेरलेल्या ठिकाणीं येऊन पाहतों तों आम्हांला तेथें एक हातरुमाल पडलेला आढळला. हातरुमाल म्हटला

कीं, त्याच्या एखाद्या कोंपऱ्यावर मालकाचें किंवा मालकिणीचें नांव चिकटलेलें असावयाचेंच असें आम्ही ऐकलेलें ! आम्ही तो हातरुमाल त्याच्या धन्याचें नांव कळलें तर पहावें म्हणून हातांत घेतला, तों त्यावर रक्ताचे डाग ! रक्त–रक्त ! ! आमच्याच भूमातेच्या प्रेमळ अंकावर बागडणाऱ्या आमच्या एका बांधवाचें किंवा भगिनीचें रक्त ! तें रक्त पाहून आम्हांला भोंवळ आली–चक्कर आली ! काय तो भयंकर प्रसंग ? रक्त ! आमच्याच एका बंधूचें किंवा भगिनीचें रक्त ! तें रक्त पाहून आमच्या काळजाचें पाणीच झालें ! आमच्या काळजाचें झालेलें पाणी आम्ही आतां विसरलों आहोंत–तें रक्त मात्र आम्हांला अजूनहि दिसत आहे ! छेः–नाहीं बुवा लिहवत पुढें आम्हांला ! तो एकंदर प्रकार डोळ्यांसमोर उभा राहिला म्हणजे आमची मति अगदीं गुंग होऊन जाते ! तो हातरुमाल–तो रक्ताळलेला हातरुमाल आपल्या हातांत कोणी पाहिला तर आपल्या अंगावर नसतें किटाळ शेकावयाचें या भीतीनें आम्ही तो हातरुमाल तसाच टाकला व परत फिरूं लागलों. इतक्यांत ' कोणरे बाबा तूं ? ' असा दरडावण्याचा आवाज आमच्या कर्णपथावर येऊन आदळला ! मागें वळून पहातों तों माळीदादा !. आम्ही पडलों संपादक–अस्सल संपादक–जातिवंत संपादक ! आमचें शस्त्र म्हणजे आमचें कलम ! तिचा आम्हांला त्यावेळीं काय उपयोग होणार होता ? आम्ही संपादक आहोंत असें त्याला आम्ही सांगितलें असतें तर तें त्याला समजलें तरी असतें कीं नाहीं कोण जाणे ? आम्ही पोक्त विचार केला. आम्हाला कांहींसें भ्याल्यासारखें झालें–आम्ही थोडेसे घाबरलोंच–त्यांत लाज कसली ? सत्य बोलण्याला किंवा लिहिण्याला आम्हांला कोणाच्या बापाचीहि भीति वाटत नाहीं ! आणि त्यांतून आमच्यावर लोभ करणाऱ्या आमच्या प्रेमळ वाचकवर्गापासून तर कांहींच लपवून ठेवण्याची आमची कधीं इच्छा नसते. आम्ही त्यावेळीं भ्यालों ते केवळ नाइलाज म्हणूनच भ्यालों. इलाज आहे तोंपर्यंत आम्ही कधींहि भीत नसतों. आम्ही घाबरलों आणि धांवत सुटलों–पळूं लागलों–पण शिस्तीनें ! शिस्तीनें माघार घेतां येणें ही कांहीं

थट्टेची गोष्ट नव्हे. पळतांना आमचे पाय आमच्या मांडीला लागत होते कीं नाहीं हेंहि आमच्या लक्षांत नाहीं, इतके आम्ही त्यावेळीं भांबावून गेलों होतों. स्थलाभावीं आमच्या पुढील फजितीची हकिकत पुढील अंकीं!"

हें वर्तमानपत्र बाबासाहेबांकडे नियमितपणें येत असे. बाबासाहेब वर्तमानपत्र वाचावयाचें म्हणजे अगदीं मन लावून वाचीत असत. त्यांच्या वाचनांतून साधारणपणें बारीकसारीक जाहिराती सुद्धां सुटावयाच्या नाहींत! वरील मजकूर त्यांच्या वाचनांत आल्याबरोबर त्यांनीं माईसाहेबांना हांक मारली.

"अग, हें पाहिलंस का काय आहे तें? बघ–बघ, मोठी गंमत आहे!" माईसाहेब बाहेर आल्या.

"कसली आहे गंमत? त्या वर्तमानपत्रांत का?"

"हो! वाचून तर पहा–मग मी बाहेरून आल्यावर सांग तुला काय वाटतं तें" असें म्हणून तें वर्तमानपत्र त्यांनीं माईसाहेबांना दिलें व जरा फिरून येण्याकरितां कोंवळ्या उन्हाचे बाहेर पडले.

"वैजयंती, ए वैजयंती! अभ्यास का चालला आहे तुझा? बरं–बरं–कर तूं आपला अभ्यास!"

इतक्यांत सासूबाईंची हांक ऐकून वैजयंती आपल्या अभ्यासाच्या खोलीबाहेर आलीच.

"कां बोलावलं मला? कांहीं काम का आहे?"

"पण तुझा अभ्यास व्हायचा असेल ना?"

"माझा अभ्यास केव्हांच झाला आहे. मी दुसरंच एक पुस्तक वाचीत बसलें होतें."

"मग मला हें वाचून दाखवितेस का एवढं? फार तारीफ करायची झाली तिकडून! म्हणजे मला चष्मा लावायला नको!"

" हो–हो–दाखवितें ना–" असें म्हणून वैजयंती वर्तमानपत्रांतील मजकूर मोठ्यानें वाचूं लागली. कालचा तो प्रकार कोणी पाहिला असेल अशी तिला कल्पनाहि नव्हती. पण साधारणपणें इतर पत्रांत येणार नाहींत अशी अटकळ असलेल्या बातम्या आपल्या पत्रासाठीं मिळविण्यांत वर्तमानपत्रांचे संपादक व बातमीदार किती धडपड करीत असतात हें त्या बिचारीला काय माहीत ? लेखकानें पराचा कावळा केलेला पाहून तिला मनांतल्या मनांत हंसूं येत होतें. मजकूर कसा तरी वाचून संपल्यावर माईसाहेब म्हणाल्या,

" काय बाई मेले एकेक धटिंगण असतात तरी ? मेल्याला पोरीचा हात धरवला तरी कसा ? "

" पण त्या तरुणाच्या थोबाडींत लगावण्याची कांहीं त्या संपादकाला छाती झाली नाहीं ! "

" पण त्यानें लिहिलं आहे ना कीं, हे मारामारी करण्याचे दिवस नाहींत म्हणून ? "

" दिवस नसायला काय झालं ? असला भयंकर अन्याय प्रत्यक्ष डोळ्यांनीं पहावा लागत असतांहि का हात उचलायचा नाहीं ? "

" अग पण हा संपादक आपण स्वतः म्हातारे असल्याचें सांगतो ना ? पण त्यानें उपदेश चांगला केला आहेन् ! कुठली ग पण गोष्ट असावी ही ? बंगल्यासमोरील बागेंत म्हणतो तो–आपल्याहि बंगल्यासमोर बाग आहेच ! "

" हो–पण आपल्याला मुलगी कुठं आहे ? "

" हो खरंच ! त्यांत तो ती त्यांची मुलगी असावी असं म्हणतो नाहीं का ! मरत ना कां ! काय हे मेले पुरुष करतील तें एकेक नवीनच ! " असें म्हणून माईसाहेब अंग धुण्यास निघून गेल्या.

वैजयंती तें वर्तमानपत्र घेऊन आपल्या खोलींत गेली व तो मजकूर कापून तिनें तो एका पाकिटांत घातला. हा मजकूर वाचल्यावर बापूसाहेबांना काय

बर वाटेल ? कालच्या त्यांच्या फजितीनें ते फारच खजील झाले–हो खजीलच झाले–त्याशिवाय का ते परस्पर मुंबईला निघून गेले ? काय पण रंगांत आले होते ते काल ? पण त्यांत त्यांचा खरोखर कांहीं दोष होता का ? तारुण्यांतील या सहजसुलभ भावनाच नाहींत का ? त्यांना कुठें खरी परिस्थिति माहीत आहे ? माझ्या भावनांची त्यांना कशी कल्पना असणार ? मी त्यांची विवाहित पत्नी एवढेंच त्यांना माहीत व त्याच एका हक्काच्या दृष्टीनें ते माझ्याकडे पहाणार ! झाल्या प्रकारांत त्यांना दोष देणें खरोखरच मूर्खपणाचें होईल. विवाहित पत्नीशीं विलासी चेष्टा करावयाच्या नाहींत तर त्या करावयाच्या तरी कोणाबरोबर ? त्यांच्या दृष्टीनें त्यांचें वागणें बरोबर आहे. माझ्याहि दृष्टीनें माझें करणें बरोबर आहे. दोघांचाहि दोष नाहीं. परंतु कांहींच दोष नसतांना त्यांना मात्र खट्टू व्हावें लागलें. त्यांना मी माझ्या भावना कळवूं का ? काय आवश्यकता ? जेव्हां समजावयाचें तेव्हां सर्व समजेलच ! पण असें कसें बरें म्हणून चालेल ? त्यांनाहि कांहींतरी भावना असतीलच कीं नाहीं ? मला भावना आहेत तशा त्यांनाहि त्या असणारच ! माझ्या भावना दुखविल्या गेल्या तर मला ज्याप्रमाणें दुःख होतें त्याचप्रमाणें त्यांच्या भावनांचा चोळामेळा झालेला पाहून त्यांना नाहीं का दुःख होणार ? त्यांना तरी विनाकारण बुचकळ्यांत ठेवण्यांत काय अर्थ ? शक्य तितक्या लौकर त्यांना सर्व कळविणेंच बरें. पाहूं तर या काय काय होतें तें !



## पहिली सलामी— ११

त्या गुलाबाच्या गुच्छानें माधवाला चटका लावला आहे का त्या गुच्छाचा त्याला चटका बसला आहे, सुधाकराला कांहीं समजेना. एका क्षणाला माधवाच्या मुखावर मंदस्मित विलसूं लागे, दुसऱ्या क्षणाला त्याची मुद्रा विषण्ण होई तर मध्येंच तो एकदम गंभीर दिसूं लागे. तो आपण होऊन कांहीं बोलेल अशी सुधाकराला आशा वाटेना. विषयच बदलून टाकावा या हेतूनें सुधाकर म्हणाला,

" माधव, आज आपण जिमखान्यावरच जाऊं या. पुष्कळ दिवसांत आपण गेलों नाहीं. "

" सुधाकर, गुच्छ कोमेजला काय रे ? अरेरे ! त्याच्या किती पाकळ्या गळून पडल्या या ? " माधव म्हणाला. सुधाकराचें बोलणें त्यानें ऐकलेंच नव्हतें.

" अरे, बोलून चालून गुलाब तो ! जरासा वेडावांकडा हाताळला गेला कीं, त्याच्या पाकळ्या गळून पडायच्याच ! " सुधाकर म्हणाला.

" यांत गुलाबाचा नाजुकपणा सिद्ध होतो त्याचप्रमाणें हाताळणाराची अरसिकता व कठोरताहि प्रत्ययाला येते ! "

" त्यांत कसली आहे कठोरता ? इतकी नाजुक प्रकृति असणं हा गुलाबाचा दोष आहे. त्यानं मजबूत कां असूं नये ? "

" कां असूं नये हा प्रश्न वेगळा. पण तो तसा नाहीं हें माहीत असतांना त्याचा उपभोग घेणारांनीं त्याचा जीव सांभाळायला नको का ?"

सुधाकर गोंधळांत पडला. माधव कांहीं वेळानें पुनः बोलूं लागला.

" सुधाकर, फुलांना सुद्धां जीव असतो म्हणतात! जीव म्हटला म्हणजे त्याला भावना असणारच ! मी त्यांना दुखविलं म्हणून तीं अश्रू ढाळीत असतील, पण फुलांचे अश्रू आपणांला दिसत नाहींत. स्वसंरक्षणासाठीं प्राणीमात्राला परमेश्वरानं आयुधं देऊन ठेवलेलीं आहेत. फुलांची नाजुकता हेंच त्यांचं स्वसंरक्षणाचं शस्त्र ! "

" कां ? गुलाबाला कांटे नसतात का ? "

" हो असतात, परंतु ते झाडाला व देंठाला असतात ! गुलाबाच्या खुद्द फुलाला एकदां निराश्रित केलं म्हणजे कांहीं त्याचं संरक्षण त्याला करतां येत नाहीं ! "

" मग यावरून काय सिद्ध होतं ? "

" दुसरं काय सिद्ध व्हायचं ? नाजुकपणा म्हणजेच दुर्बलता हेंच या जगांतील सर्वांत भयंकर पातक होय, हेंच यावरून सिद्ध होतं. दुर्बलता, मग ती मानसिक असो किंवा शारीरिक असो, प्रबलांकडून चिरडली जायचीच ! दुर्बल व्यक्तीला समाज किंमत देत नाहीं, दुर्बल समाजाला राष्ट्र विचारीत नाहीं, दुर्बल राष्ट्रांना प्रबल राष्ट्रांच्या गुलामगिरींत सडत–कुजत–मरत पडावं लागतं ! "

" खरं आहे. दुर्बल व्यक्तीला समाज किंमत देत नाहीं, याचा अनुभव तर आम्ही प्रत्यहीं घेतच आहोंत ! "

" दुर्बलांनीं आपलें दौर्बल्य हेंच भूषण न मानतां प्रबलांच्या मनगटाशीं मनगट घांसण्याची ताकद आपणांला प्राप्त व्हावी म्हणून प्रयत्न करायला नको काय ? असा प्रयत्न करीत असतांना त्यांना फार कष्ट पडतील, नाना प्रकारच्या अडचणी

त्यांच्या मार्गांत आडव्या येतील, त्यांना लोकोत्तर असा त्यागहि करावा लागेल. परंतु न डगमगतां, ध्येयापासून च्युत न होतां, परमेश्वरावर हवाला ठेवून व आपल्या प्रयत्नांची शिकस्त करून त्यांनीं आपला मार्ग आक्रमण केलाच पाहिजे. प्रबलांना आपली दया येईल तेव्हां येईल असें म्हणून ते 'तो सोन्याचा दिवस कधीं उगवतो' म्हणून वाट पहात बसतील तर त्यांना जगाच्या अंतापर्यंत प्रबलांच्या लाथा खातच पडावं लागेल! महत्तम यशाचं रोपटं रुजवायचं म्हणजे त्यासाठीं एखाद्या वेळीं रक्तमांसाचं सुद्धां खत घालावं लागतं!"

इतक्यांत हिरा आपल्या मैत्रिणीसह बाहेर आली.

"दादा, आज आम्ही येऊं का रे तुमच्या बरोबर फिरायला?"

"आम्ही जाणार आहोंत जिमखान्यावर, तुम्ही कुठें येणार आमच्याबरोबर?"

"अं—आम्ही नाहीं जा! केव्हांहि तुला विचारलं तरी तुझी आपली कांहीं ना कांहीं सबब ठेवलेलीच असते. मी नाहीं जा आज ऐकायची! आज आम्हांला मोटारींतून कुठें तरी दूर घेऊन चल!"

"काय बुवा माधव, आज कांहीं हिरा ऐकण्याचा रंग दिसत नाहीं."

"इष्टापत्ति आहे," माधव म्हणाला. "आमच्यासारख्या गरिबांना तरी मोटारींतून फिरायला सांपडेल."

माधवाची वृत्ति एकदम बदललेली पाहून सुधाकराला बरें वाटलें. अपॉलो बंदर, मलबार हिल वगैरे झाल्यावर नव्या चौपाटीवरून जुहूला जाण्याचें ठरलें. जुहूला येऊन पोहोंचतात तों सूर्य मावळला होता. चौघेंहि खालीं उतरलीं. बसूनबसून पाय अगदीं खुडपून गेल्यामुळें चालतांना त्यांना मौज वाटूं लागली. हिरेची मैत्रीण फारच चाणाक्ष व धोरणी. खालीं उतरल्याबरोबर तिनें सुधाकराशीं बोलण्यास सुरुवात केली. सुरुवातीला सर्वजण एकाच दिशेनें चाललीं होतीं. पण त्या मैत्रिणीनें मोठ्या खुबीनें सुधाकराला उलट दिशेला वळविलें. सुधाकर

तिच्याबरोबर जाऊं लागला तेव्हां माधव बघतच राहिला. हिरा माधवाकडे पहात होती. माधवाच्या हें ताबडतोब लक्षांत आलें.

"तुमच्या मैत्रिणीची आणि सुधाकराची बरीच ओळख दिसते!"

"आहे थोडीशी–ती आमच्याकडे पुष्कळदां येते–"

"तुम्हाला यामुळें–"

"दादा माझ्याहून वडील असून तुम्ही त्याला अरे तुरे म्हणतां आणि मी त्याच्याहून लहान असून मला अहो जाहो म्हणतां हें कसं काय?" माधवाला मध्येंच थांबवून हिरा म्हणाली.

"तो मला अरे म्हणतो म्हणून मी त्याला अरे म्हणतों–तुम्ही मला अहो म्हणतां मी तुम्हाला अहो म्हणतों–"

"मी तुला माधव म्हणायला आनंदानं तयार आहें, तूं मला म्हणशील ना हिरा?"

माधव तिच्या चेहऱ्याकडे बघतच राहिला. हिरेच्या पाणीदार डोळ्यांत यावेळीं विलक्षण तेज चमकत होतें. हिरेच्या धीटपणाबद्दल त्याची घरींच खात्री झाली होती, परंतु ती इतकी धीट असेल अशी मात्र त्याची कल्पना नव्हती. तिच्या धीटाईबद्दल त्याला आश्चर्य वाटलें त्याचप्रमाणें आनंदहि झाला. त्यानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. आतां स्वच्छ चांदणें पडलें होतें. समुद्र शांत होता. येणाराजाणारांची त्या बाजूला फारशी वर्दळ नव्हती.

कांहीं वेळपर्यंत कोणीच कोणाशीं कांहीं बोललें नाहीं. हिरेला फार वेळ स्वस्थ रहावेना.

"माधव, चलना रे आपण त्या मोठ्या दगडावर बसूं," असें म्हणून हिरेनें माधवाचा हात धरला. माधव गांगरून गेला. हिरेनें स्पर्श केल्याबरोबर त्याचें

सर्व अंग थरारून गेलें. तरुण रक्त तें! नवोन्मादानें बहरलेल्या तरुणीचा प्रेमळ स्पर्श होतांच तें सळसळल्याशिवाय कसें राहील? त्याच्या हाताला सुटलेला कंप हिरेच्या लक्षांत आल्याशिवाय राहिला नाहीं. तीहि स्वतःचें देहभान विसरून गेली. माधव कोणत्याहि प्रकारें प्रतिकार न करतां तिनें नेलें तेथपर्यंत गेला. ती बसली, नाजुक हातानें त्यालाहि तिनें बसविलें.

"माधव, दादाशीं तूं बोलत असतांना तासाचे तास कंटाळत नाहींस–आणि मी मात्र दोन शब्दांनाहि का महाग व्हावें?"

तरीहि माधव कांहीं बोलेना. विषण्ण मुद्रा करून तो समुद्राकडे पहात बसला होता.

"असं काय? बोल ना रे माधव! काय वाटेल तें बोल, पण बोल! तूं बोललेले बोल ऐकायला माझे कान किती आतुर झाले आहेत, याची तुला कल्पना तरी आहे का? नाहींच ना तूं बोलत? कसला विचार करतो आहेस एवढा? माझी तुला थोडी सुद्धां दया येत नाहीं ना?"

तरीहि माधव स्तब्धच. हिरा जों जों बोले तों तों त्याची मुद्रा अधिकच गंभीर होई.

"माधव, आतां तूं बोलला नाहींस तर मी, ज्या समुद्रावर तुझी दृष्टि एकसारखी खिळून राहिली आहे त्याच समुद्रांत उडी टाकून जीव देईन!" असें म्हणून ती उठूंहि लागली.

"हिरा–" माधव बोलूं लागला.

"बस्–पुरे!" हिरेनें त्याला पुढें बोलूं दिलें नाहीं. "पुढें मुळींच बोलूं नकोस. माझे कान तृप्त झाले. देवाला माझी हांक ऐकूं गेली. अहाहा! किती आनंद होतो आहे मला! परमेश्वरानं माझ्याकडे पाहिलं– माझा राजा माझ्याशीं बोलला!"

"काय–काय बोलते आहेस हें तूं, हिरा ? कोण तुझा राजा ? वेड्यासारखं कांहीं तरी बडबडूं नकोस!"

"इतका वेळ मी शहाणी होतें. आतां मात्र मला खरोखरच वेड लागायची पाळी आली आहे. नव्हे–मी वेडी झालें आहें! अगदीं पुरी–पुरी वेडी! माधव–माधव–सांभाळ मला! मला माझा तोल आंवरत नाहीं. तुझ्याशिवाय मला कोण आधार देणार ? तूंच माझा राजा–तूंच माझा देव–तूंच माझा परमेश्वर–माझं सर्वस्व तूंच! मला तारणं किंवा मारणं फक्त तुझ्याच स्वाधीन आहे–"

असें म्हणून हिरेनें खरोखरच माधवाच्या खांद्यावर मान टाकली. माधवाचें सर्व शरीर थरारलें. त्याला हिरेचा राग आला–त्याला हिरेची कींव आली–त्याला स्वतःचें अधःपतन झाल्यासारखें वाटूं लागलें!

"हिरा, काय हा अतिप्रसंग! तुझ्यासारख्या सुशिक्षित कुमारिकेला हें शोभतं का ? तूं आपल्या कुळाचा उद्धार अशा वर्तनानंच का करणार ?"

"माधव, काय रे मी वाईट वर्तन केलं ? माझ्या देवाला मी नाहीं का भेटायचं ? देवाला भेटायला सुद्धां का चोरी ?"

"हिरा, कोणाला देव म्हणतेस तूं ? मला ? या दगडाला ?"

"कोण दगड ? माधव, तूं दगड ? तुला दगड म्हणायचं म्हणजे जगांत देव शिल्लकच उरला नाहीं असं समजावं लागेल!"

"मला तुझी दया येते हिरा–"

"दयेला प्रेमाची जननी म्हणतात ना!"

"तें राहूं दे तूर्त. तूं मला देव मानतेस असं तूं म्हणतेस–माझ्यांत असे कोणते दैवी गूण तुला दिसले ?"

"कोणते दैवी गूण नाहींत याचाच मला विचार करावा लागेल!"

"तुझी दृष्टि आंधळी झाली आहे–तुझी विचारशक्ति नष्ट झाली आहे."

"अगदीं खरं आहे तुझं म्हणणं. तुझ्या बाबतींत माझी दृष्टि खरोखरच आंधळी झाली आहे. तुझ्यांत मला दोषच दिसत नाहीं. माधव, माझ्या प्रेमाचा तूं स्वीकार करणार नाहींस का?"

"हिरा, प्रेम म्हणजे काय हें समजतं तरी का तुला?"

"इतके दिवस नव्हतं समजत—पण आतां चांगलं समजूं लागलं! तुझ्या-विषयीं मला जें वाटतं तेंच प्रेम!"

"हिरा, अगदींच वेडी आहेस तूं. तुला माझ्याविषयीं जें वाटतं तेंच प्रेम हा तुझा भास आहे—ही तुझी भूल आहे—हा तुझा मूर्खपणा आहे. तुला माझ्याविषयीं जें कांहीं वाटतं तें प्रेम नव्हे—ती निव्वळ कामुकता आहे--पाशवी कामुकता आहे!"

"कबूल आहे मला. माझं तुझ्यावर प्रेम आहे तें खरोखरच विषयी आहे. एखाद्या तरुणीनें एकाच तरुणावर विषयी प्रेम करणं हें पातक आहे काय?"

"प्रश्न जितका नाजुक तितकाच बिकट आहे. एखाद्या तरुणीचें एकाच तरुणावर विषयी प्रेम असणं याला पाप म्हणणं कठीण आहे. परंतु या प्रेमाला पापी प्रेम म्हणतां न आलं तरी त्याला हिणकस मात्र म्हणावंच लागेल!"

"तें कां म्हणून? तरुणतरुणींना एकमेकांची ओढ लागणें ही निसर्गप्राप्तच गोष्ट आहे. वाटेल त्यानं वाटेल तिच्याशीं किंवा वाटेल तिनें वाटेल त्याच्याशीं—प्रेमाच्या नांवाखालीं स्वैराचार करणं हें हिणकसच नव्हे तर पापास्पदहि आहे हें मी मान्य करतें. पण एकाच स्त्रीनें एकाच पुरुषावर किंवा एकाच पुरुषानं एकाच स्त्रीवर वैषयिक प्रेम करणंहि हिणकसच ठरतं काय?"

"निःसंशय! जग कदाचित् असं म्हणणार नाहीं, पण मी मात्र असंच म्हणेन. उपभोगाच्या लालसेनं उत्पन्न झालेलं प्रेम हें त्यागाच्या पायावर उभारलेल्या प्रेमापुढें केव्हांहि हिणकसच ठरणार!"

" भोग आणि त्याग ! किती कठीण शब्द आहेत हे, नाहीं ? भोगासाठीं सुद्धां त्याग नाहीं का करावा लागत ? त्याग केल्याशिवाय भोग कधीं मिळतो का ?"

" नसेल मिळत–परंतु भोगाच्या अभिलाषानं केलेला त्याग हा मुळीं खरा त्यागच नव्हे !"

" मला नको आहे या वेळीं तुझं तें तत्त्वज्ञान ! बोलतांना तुझी स्वतःची काय धांदल उडते आहे हें मला प्रत्यक्षच दिसतं आहे. कशाला आतां लपवा-लपवी करतोस ? मी मघांशीं तुझा हात धरला त्यावेळीं तुझ्या हाताला सुटलेला कंप मी विसरलेलें नाहीं. मी तुझ्या खांद्यावर मान टाकली तेव्हां तुला बरं वाटलं हेंहि माझ्या लक्षांत आल्याशिवाय राहिलं नाहीं. मला तत्त्वज्ञानाचे धडे शिकवितांना तूं स्वतःहि विकाराच्याच आधीन झालेला नाहीं आहेस का ?"

" बरोबर बोललीस तूं. माझं मन चळलं हें मी प्रांजलपणेंच कबूल करतें. परंतु यांत मी दोषी नसून तूंच दोषी आहेस. माझ्या शरिराला कामुकतेनें स्पर्श करून तूंच माझ्या स्थिर मनांत चलबिचल उत्पन्न केलीस !"

" तुझा आपल्या मनावरचा ताबा कां सुटावा ? म्हणजे काय ! मी कबूल करतें आणि तूं कबूल करीत नाहींस एवढाच आपल्यांत फरक !"

" आपली इच्छा नसतांना कोणी आपल्या अंगाला सुवासिक अत्तर लावलं म्हणून त्याची घाण येते कीं काय ? तूं तरुण आहेस–सुंदर आहेस. मीहि तरुण आहें. तुझ्या स्पर्शानं माझं अंग पुलकित झालं त्याला मी काय करणार ? माझं मन ज्या अवस्थेला पोहोंचलं पाहिजे अशी माझी महत्त्वाकांक्षा आहे त्या अव-स्थेला तें अजून पोहोंचलेलं नाहीं !"

" तुझी खरोखरच तशी इच्छा नव्हती तर माझा हात झटकून कां टाकला नाहींस ?"

" मुद्दामच ! तुझ्या मनाची झालेली चलबिचल माझ्या घरींच लक्षांत आली होती; आणि तुझ्या मनाची धांव कुठपर्यंत मजल मारते हेंच मला पहायचं होतं ! "

हिरा ओशाळली. ती वर आकाशाकडे पाहूं लागली. तिच्या चेहेऱ्यावर निराशा स्पष्ट दिसत होती. तिनें माधवाचा हात धरला व त्यानें तो झिडकारला नाहीं तेव्हां तिला माधवाविषयीं फार आशा वाटूं लागली होती. परंतु माधवाच्या भाषणानें त्या आशेचा चक्काचूर उडाला. तिला आतां माधवाकडे पहावेना. ती खट्टू झाली. तिनें तोंड फिरविलें व ती रडूं लागली. माधवलाहि वाईट वाटलें. तिला काय वाटलें असेल याची त्याला स्वतःवरून चांगलीच कल्पना करतां येत होती. कांहींहि आडपडदा न ठेवतां हिरेनें आपलें मन उघड केलें हें त्याला फार बरें वाटलें. तिनें तसें केलें नसतें तर दोघांनाहि आणखी कित्येक दिवसपर्यंत विनाकारण त्रास होत राहिला असता. हिरा रडूं लागलेली पाहून माधवाचें अंतःकरण द्रवलें. त्यानें आपल्या हातरुमालानें तिचे अश्रू पुसून काढले.

" माधव, कशाला माझे अश्रू पुसतोस ? मला पोटभर रडूं दे तरी. माधव—माधव—माझ्या हृदयाला तूं जखम केलीस ! ती जखम आतां कशानें तरी भरून येईल का ? "

" हिरा, मी तुझा अपराधी आहें. मला क्षमा कर. तुला होणाऱ्या दुःखाची मला पूर्ण कल्पना आहे. तुझ्या प्रेमाचा स्वीकार मला करतां येत नसला तरी मला काळीजच नाहीं असं मात्र तूं समजूं नकोस ! "

" कां समजूं नको ? माधव, असं मी कां समजूं नये ? तुला खरोखरच काळीज असतं तर तुला माझ्या काळजाचा असा तडकाफडकीं चुराडा करविला असता का ? तुला असं का वाटतं कीं, माझं प्रेम फार सवंग असल्यामुळें तें तुझ्यावर जडलं ? "

" हिरा, कांहीं तरी गैरसमज करून घेऊं नकोस. मी तुझी किंमत कमी करीत नाहीं–तुझ्या प्रेमाचीहि किंमत मी कमी समजतों असं नाहीं. वैषयिक प्रेमापेक्षां उच्च दर्जाचं प्रेम असूं शकतं, एवढाच माझ्या म्हणण्याचा आशय होता. तसं प्रेम करणं कठीण आहे याची मला पूर्ण जाणीव आहे. मी स्वतःहि तसं प्रेम करूं शकतों असं ढोंग मी करूं इच्छीत नाहीं. पण तसा प्रयत्न करणं हें मात्र मला माझं कर्तव्य वाटतं ! "

" कां म्हणून ? जगांत तुला कोणावरहि वैषयिक प्रेम करायचंच नाहीं कीं काय ? असंच का आजपर्यंत जग चाललं ? "

" जग जसं चालायचं तसंच आजपर्यंत चाललं व पुढंहि चालेल. मी एकट्यानं विषयी प्रेमाला फांटा दिला म्हणून कांहीं जगाच्या चालत्या गाड्याला खीळ लागत नाहीं. शिवाय, मी तरी विषयापासून जन्मभर अलिप्त राहूं शकेनच असा कोणी नेम सांगावा ? विषयाच्या तडाख्यांतून निसटतांना आजपर्यंत कितीतरी ऋषि-मुनींची सुद्धां गाळण उडालेली आहे. लपवालपवी कशाला ? मी प्रांजलपणेंच कबूल करितों कीं, माझ्या स्वतःच्या मनाचाच आतां अधःपात झालेला आहे. तूं माझ्या खांद्यावर मान टाकलीस तेव्हां माझ्या मनांत केवढं तुमुल युद्ध चाललं होतं याची तुला कल्पनाहि नसेल ! एकीकडे मला आनंदाचं भरतं येत होतं तर दुसरीकडे माझं मन मला खात होतं. तुझं चुंबन घेण्याचा मोह आंवरतांना मला जे कष्ट पडले, त्यांचं तर मला वर्णनच करतां येत नाहीं. तेव्हां मी तुझ्याहून श्रेष्ठ आहें किंवा तुला उपदेश करण्याचा मला कांहीं अधिकार आहे असं मुळींच नाहीं. "

" मग कशासाठीं तूं आपलं मन इतकं मारलंस ? "

"मघांशीं तुला सांगितलं त्याच कारणाकरितां. मला काळीज आहे आणि तेंहि अत्यंत नाजूक आणि भावनाप्रधान असं काळीज आहे. "

" म्हणूनच वाटतं माझ्या भावनांना पायाखालीं तुडवून आपल्या अंतःकरणाची कोमलता तूं सिद्ध केलीस ? "

पहिली सलामी—

" हिरा, प्रखर वाग्बाणांनीं माझं हृदय असं विद्ध करूं नकोस. मी हा वेळपर्यंत कोणाला सांगितलं नाहीं, तें आज तुला सांगतों. मला आपलं सर्वस्व अर्पण करायला तयार झालेली तूं ! तुझ्याशीं आतां कसला संकोच बाळगायचा ? "

" काय एवढं गुप्त तूं मला सांगणार आहेस ? "

" तो मोठाच इतिहास आहे. सांगतोंच तुला सर्व—"

इतक्यांत सुधाकर आणि हिरेची मैत्रीण जवळ आलेलीं माधवाला दिसलीं.

" आतां नको—पुनः केव्हां तरी सांगेन—" माधव म्हणाला.

" माधव, माझ्या आतांच्या अविचाराबद्दल तूं मला क्षमा करशील का ? तुझ्याच पायांची शपथ घेऊन सांगतें कीं, मी यापुढें कधींहि असला अविचार करणार नाहीं ! "

" हिरा, तुझ्याविषयींचा माझा आदर कायम आहे—नव्हे—तो थोडासा वाढलाच आहे. प्रेमभंगाच्या नुसत्या कल्पनेनं तरुणी खुनशी बनतात असं म्हणतात पण तूं तर माझ्याकडून तुझा प्रत्यक्ष प्रेमभंग झाला असतांहि माझ्याशीं पूर्वीइतक्याच प्रेमळपणानं बोलते आहेस, यावरून मला तरी असंच वाटतं कीं, तूं म्हणतेस त्याप्रमाणं तुझं माझ्यावरील प्रेम केवळ विषयीच नाहीं. त्याचा दर्जा त्याहून खात्रीनं कांहीं तरी अधिक उच्च आहे. हा पहा आलाच सुधाकर. तो खात्रीनं कांहीं तरी थट्टा करणार ! "

सुधाकर व हिरेची मैत्रीण सुधा जवळ येऊन पोहोंचलींच. आश्चर्याची गोष्ट अशी कीं, सुधाकरानें थट्टा वगैरे कांहींच केली नाहीं. सुधा मात्र हिरेशीं हंसतहंसत कांहीं तरी बोलत होती. चौघेंहि मोटारींत बसलीं. मोटार पेडर रोडला लागली, इतक्यांत ड्रायव्हरनें खूप जोरानें ब्रेक लावला. गाडी उभी राहिली. ड्रायव्हर कावराबावरा होऊन खालीं उतरला. कांहीं तरी अपघात झाला असला पाहिजे अशी खात्री झाल्यामुळें माधव आणि सुधाकरहि खालीं उतरले. एक तरुण

मोटारीच्या पुढें बेशुद्ध होऊन पडला होता. माधवानें व सुधाकरानें त्याला उचलून गाडींत घातलें.

" सुधाकर, याला हॉस्पिटलमध्यें पोहोंचविण्यापेक्षां तुझ्याकडेच नेऊं या. तूं लौकर डॉक्टरांना घेऊन ये. तोंपर्यंत आम्ही याचं रक्त वगैरे पुसून काढूं," माधव म्हणाला.

" हो-हो-असंच करूं."

घरीं पोहोंचल्यावर माधवानें त्या तरुणाला कॉटवर निजविलें. सुधाकर डॉक्टरनां आणायला गेला होता. हिरेनें एक स्वच्छ टॉवेल पाण्यांत भिजवून आणला व त्या तरुणाचें रक्त पुसून काढलें. थोडेंसें पाणी कपाळावर वगैरे शिंपतांच त्या तरुणानें आपले डोळे अर्धवट उघडले व तो कांहीं तरी बोलण्याचा प्रयत्न करूं लागला.

" बोलण्याचे श्रम करूं नका इतक्यांत. तुम्ही कांहीं काळजी करूं नका. तुम्हांला कांहीं त्रास होणार नाहीं," हिरा त्याला म्हणाली. त्या तरुणाच्या चेहेऱ्यावर हास्य दिसूं लागलें. त्याला कसला तरी आनंद होत होता. त्याला नीटसें बोलवत नव्हतेंच. त्यांतल्या त्यांत जोर करून तो म्हणाला,

" को...ण ? यमू...ता...ई ! इ...कडे कशी...तूं ?"

एवढें बोलण्याचे श्रमहि त्याला झेंपले नाहींत. हिरेला वाटलें कीं, यमूताई ही त्या तरुणाच्या घरची कोणीतरी स्त्री असेल. माधवाला मात्र त्या तरुणाच्या तोंडून यमूचें नांव निघालेलें ऐकून विस्मय वाटला. आपल्या यमूची याला कांहीं माहिती असेल काय ? काय एकेक विचित्र गोष्टी घडून आल्या आज एका दिवसांत ? ज्या हिरेशीं आपण आजपर्यंत कधीं एकान्तांत बोललों नाहीं, जिचा व आपला प्रत्यक्ष असा फारसा परिचयहि नव्हता, ती इतक्या थोड्या अवधींत आपलें सर्वस्व मला अर्पण करण्यास तयार झाली ! ती माझ्यावर आज कितीतरी दिवस प्रेम करीत असली पाहिजे ! मला मात्र, माझी दृष्टि तशी नसल्यामुळें,

आजपर्यंत तें ठाऊक नव्हतें. हिरा तरी किती धीट ? तिनें माझ्यावरील आपलें प्रेम किती स्पष्ट शब्दांत व्यक्त केलें ? तिचें माझ्यावरील प्रेम अनावरच असलें पाहिजे. नाहींतर इतका उतावेळपणा तिच्या हातून झालाच नसता. एका अर्थी बरें झालें. तारुण्यांतील बलिष्ट विकारांचा प्रतिकार करणें किती कठीण आहे, याचा मला आज प्रत्यक्ष अनुभव तरी मिळाला ! हा तरुण आमच्या मोटारीच्या धक्क्यानें बेशुद्ध पडला म्हणून याला घरीं आणला तों याच्या तोंडून यमूचें नांव बाहेर पडलें ! आतां हा सावध होईल तेव्हां खरें काय तें समजेलच ! माझ्या यमूची मला माहिती समजेल काय ? माझी यमू कुठें बरें असेल ? तिची मूर्ति या माझ्या अंतःकरणांत मी या क्षणापर्यंत जिवंत ठेवली आहे, त्याचप्रमाणें तिनेंहि माझं स्मरण ठेवलें असेल काय ? आतां ती कितीतरी मोठी झाली असेल ! हो—जवळजवळ हिरे एवढीच ! हिरा—यमू ! यमू—हिरा ! माझी यमू माझी यमू—आणि मी ? मी यमूचा कीं हिरेचा ?



# हृदयांची ओळख— १२

बापूसाहेब मुंबईस परत आल्यापासून त्याच्यांत पुष्कळ बदल झालेला त्याच्या मित्रमंडळीस दिसत होता. त्याच्या सर्व मित्रांना त्याच्याविषयीं प्रेम व जिव्हाळा वाटे तसाच आदरहि वाटे. बापूसाहेब आपल्याशीं पूर्वीप्रमाणें मन-मोकळेपणानें वागत नाहीं हें त्यांच्यापैकीं प्रत्येकाच्या लक्षांत येऊनहि त्याचें कारण बापूसाहेबास विचारण्यास कोणीहि धजेना. त्यांपैकीं बहुतेकांना असें वाटलें कीं, बापूसाहेब व त्याचे वडील यांच्यांत कांहीं तरी मतभेद झाला असावा. बापूसाहेबाच्या आईचें दुखणें पुनः उलटलें असावें, असाहि कांहींनीं तर्क केला.

" अग, हें पाहिलंस का, बापूचं मुंबईहून पत्र आलं आहे–"

बाबासाहेबांचे हे शब्द माईसाहेबांच्या कानावर गेले त्याचप्रमाणें वैजयंतीनेंहि ते ऐकले. बापूचें पत्र काय आहे हें समजण्याची माईसाहेबांना आतुरता लागली होती त्याचप्रमाणें आपल्या सूनबाईनाहि तें समजावें अशी त्यांची इच्छा होती. म्हणून त्यांनीं हळूंच वैजयंतीला बापूसाहेबाच्या पत्राबद्दल सांगितलें. माईसाहेब बाहेर आल्यावर बाबासाहेब म्हणाले, " त्याचं आजचं पत्र म्हणजे चिठ्ठीच आहे म्हणेनास? तो एवढंच लिहितो कीं, या नाताळांत त्याला इकडे येतां येणार नाहीं; अभ्यास फार करायचा आहे!"

" मग इकडे येऊन नाहीं का अभ्यास करतां येत?"

" अग, त्याचा अभ्यास नुसत्या पुस्तकांवरून करायचा नसतो. या डॉक्टरी अभ्यासाच्या भानगडीच फार असतात. "

" तरी त्याला पत्र लिहायचं कीं, दोन दिवसांच्या तरी सवडीनं येऊन जा म्हणून ! लोकं आतां मला हंसायला लागलीं ! ज्या त्या गोष्टी वेळच्या वेळेवर झालेल्या बऱ्या ! "

" बघितलंस ? एवढ्याचकरितां मी त्याचं लग्न लवकर करायला तयार नव्हतों. आतां तूं आजारीच पडलीस आणि बापूचं लग्न आपल्या डोळयादेखत झालं पाहिजे असा पक्का आग्रहच धरलास म्हणून माझा नाइलाज झाला. नाहीं-तर त्याचं शिक्षण पुरं झाल्याशिवाय मी त्याच्या लग्नाचा विचारसुद्धां केला नसता. "

" हो—मला सारं कांहीं माहीत आहे. हीं हल्लींच निघालेलीं खुळं आहेत ! आपल्या लग्नांत आपण किती वर्षांचं असायचं ? "

" वा: ! म्हणजे हा खासा न्याय आहे ! पूर्वीच्या कांहीं गोष्टी चुकल्या म्हणून आतांहि त्याच चुका पुन: करायच्या कीं काय ? "

" कां बरं ? पूर्वीच्या काय चुका झाल्या ? आपलं लग्न इतक्या लहानपणीं झालं, आपलं काय वाईट झालं ? "

" ही तूं नेहेमीं अशी आजारी पडतेस ती ? "

" लहानपणीं लग्न झाल्याचा परिणाम म्हातारपणीं दिसूं लागतो एवढं बरं आहे. "

" म्हातारपणीं ? तुझं झालं का एवढ्यांत म्हातारपणाचं वय ? "

" सांगितलं असतं पण या वेळीं नाहीं सांगत—" असें म्हणून आपला सारा संबाद वैजयंती आंतून ऐकत आहे अशा अर्थाची माईसाहेबांनीं खूण केली. त्या पुढें म्हणाल्या, " मग काय ? लिहिणार ना बापूला ? "

" अग, त्याला जर इकडे यायला सवड असती तर तो आपण होऊनच नसता का आला ? आतांपर्यंत, प्रत्येक सुट्टींत नव्हता का येत ? आपण कशाला लिहायला पाहिजे त्याला ? बाकी तुला तो अजून बाळच वाटतो आहे—"

" नाहींच हो त्याला अजून कांहीं समजत. जेव्हां जेव्हां तो इकडे येतो तेव्हां पहातें ना मी ? " असें म्हणून माईसाहेब हळूंच हंसल्या.

बाबासाहेब आपल्याकडून अगदीं हळूं म्हणून म्हणाले, " तुला आपले पूर्वींचे दिवस आठवले वाटतं ? अग, आपली गोष्ट निराळी होती. मला त्या वेळीं कुठें परीक्षा द्यायच्या होत्या नि डिग्र्या मिळवायच्या होत्या ? "

माईसाहेबहि हळुहळु बोलूं लागल्या.

" म्हणून काय झालं ? त्यावेळीं आपल्या घरांत किती वडिलधारीं माणसं असायचीं ! पण त्या सर्वांना आपण केव्हांच फसवायचं ! "

" हं—आमची सारी अक्कल त्यांतच खर्च झाली ! आतां या बिचाऱ्याला अभ्यास करून नांव मिळविण्याची महत्त्वाकांक्षा आहे, त्याच्या अभ्यासांत कशाला आपण अडथळा आणायचा ? "

" पण आतां सूनबाई केवढी दिसायला लागली, पाहिली ना ? आणि तिनं एखादे वेळीं हृद्रोग घेतला तर ? "

" अग, हल्लींच्या मुलीसुद्धां फार समजूतदार असतात. आपणहि पुष्कळ शिकावं, नांव करावं, अशीच त्यांची इच्छा असते. आतां बापू लहान नाहीं, ती लहान नाहीं—त्यांच्या कारभारांत आपण कांहींहि ढवळाढवळ न केलेली बरी ! त्यांचीं तीं समर्थ आहेत ! "

माईसाहेबांचें कांहीं समाधान झाल्यासारखें दिसलें नाहीं. आणखी चारदोन प्रकारांनीं त्यांची समजूत घातल्यासारखें करून बाबासाहेब निघून गेले.

बापूसाहेबांच्या पत्रांत काय मजकूर आहे हें समजण्याची फारशी उत्सुकता नसतांहि वैजयंती दाराच्या आंतील बाजूस पहिल्यानें उभी राहिली होती. नाताळच्या सुट्टींत तो इकडे येऊं शकत नसल्याचें त्यांनीं लिहिलेलें समजतांच तिला हंसूं येऊं लागलें व ती आपल्या खोलींत निघून गेली. माईसाहेबांची कल्पना अशीच कीं, सूनबाई अजून दाराआडच उभ्या आहेत. पण आंत येऊन पहातात तों वैजयंती आपल्या खोलींत निघून गेलेली! त्यांना एकदां वाटलें कीं, पोरीची निराशा झाली—ही आतां खोलींत जाऊन रडत बसली असेल! म्हणून त्यांनीं तिच्या खोलीचें दार किलकिलें करून पाहिलें तों वैजयंती आपल्या टेबलावर कांहीं तरी लिहीत बसलेली! त्या स्वतःशींच पुटपुटल्या, "हल्लींच्या पोरी या अशाच! कसला अभ्यास त्यांना एकसारखा सुचतो त्यांचं त्यांनाच माहीत!"

नाताळच्या सुट्टींत घरीं न येण्याला बापूसाहेबानें जें कारण पुढें केलें होतें तें कोणालाहि पटण्यासारखेंच होतें. पण त्यांतील खरी गोम वैजयंतीला माहीत होती. तिला बापूसाहेबांची कींव आली. त्यांना सर्व प्रकार समजणेंच इष्ट असें ठरवून ती त्यांस पत्र लिहूं लागली.

"श्री. बापूसाहेब यांस—

सा. न. वि. वि. मी आपणांस आजपर्यंत एकदांहि पत्र पाठविलेलें नाहीं. म्हणून आज माझ्याकडून पत्र आलेलें पाहून आपणांस अचंबा वाटेल. तुम्हांला पत्र लिहिण्यांत माझा मुख्य उद्देश असा कीं, तुम्हांस सर्व गोष्टी उघडपणें कळवाव्यात. असें करणें हें तुमच्या व माझ्या—उभयतांच्याहि—दृष्टीनें हिताचें आहे अशी माझी कल्पना आहे.

माझें व तुमचें लग्न झालें—म्हणजे चारचौघांसमक्ष आपण एकमेकांच्या गळ्यांत तासेवाजंत्र्यांच्या आवाजांत माळा घातल्या—हा दैवाचा म्हणजेच दुर्दैवाचा खेळ झाला असेंच म्हटलें पाहिजे. तुम्हांला माहीतच आहे आपल्या

समाजांत बहुतेक लग्नांचा कसा बेंडबाजा वाजतो तो! लग्नांत मुलांच्या संमतीचा कांहीं तरी विचार होत असतो पण मुलीच्या संमतीचा मात्र प्रश्नहि उद्भवत नाहीं. अशा रीतीनें—म्हणजे मुलीची संमति न घेतां—विवाह झालेलीं जोडपींहि गुण्यागोविंदानें नांदतांना दृष्टीस पडत नाहींतच असें नाहीं. पण याला अनेक कारणें आहेत. कांहीं बाबतींत त्या मुलीला विवाहापूर्वी कोणाचीहि ओढ लागलेली नसते व तिच्या नशिबानें तिला पतिहि चांगला मिळतो. कांहीं बाबतींत मुलीनें आपलें प्रेम आपल्या प्रेमी माणसाला विवाहापूर्वी वाहिलें असतांहि, पित्याच्या व इतर वडीलधाऱ्या माणसांच्या हट्टाग्रहामुळें, ते म्हणतील त्याच्या गळयांत तिला माळ घालावी लागते. मी माझें प्रेम ज्याच्या चरणीं वाहिलें होतें व आहे तो माझा माधव कोठें आहे हेंहि मला माहीत नाहीं. मी तुमच्या गळयांत माळ घातली ती माझ्या पित्याच्या भीतीमुळें नव्हे. कारण भीतीचा आणि माझा कितीसा संबंध आहे याचा तुम्हांला प्रत्यक्षच अनुभव आला आहे. तुम्हांला खजील करण्यासाठीं मात्र मी हें लिहीत नाहीं. माझ्या पित्याची मला भीति वाटत असे हें खरें आहे. परंतु माझी आई मला सोडून गेली—तिचें अखेरचें दर्शनसुद्धां मला अभागिनीला झालें नाहीं—त्या वेळेपासून मात्र मला एका माधवाशिवाय माझ्या मायेचें असें कोणीच राहिलें नाहीं. त्याची आणि माझी कितीतरी दिवसांत भेटहि झालेली नव्हती. तरी माझें त्याच्यावरील प्रेम मात्र अभंग होतें. माझ्या वडिलांच्या आज्ञेला झुगारून मी माझाच हट्ट चालवूं शकलें नसतें असें नाहीं. पण तसें करण्यांत कांहींच वैशिष्ट्य नव्हतें. असल्या प्रकारच्या गोष्टी समाजांत आपणांस पुष्कळदां पहावयास सांपडतात. बळजबरीनें दुसऱ्याच्या गळयांत बांधलेल्या मुली समाजाच्या भीतीनें व घराण्याच्या नांवलौकिकासाठीं आपला पति समजल्या जाणाऱ्या व्यक्तीशीं व्यभिचार—कर्महि करण्यास तयार होतात! 'पतीशीं व्यभिचार' हा शब्दप्रयोग तुम्हांला कसासाच वाटत असेल, नाहीं? यांत तुमचा कांहींच दोष नाहीं. मारून मुटकून बनविलेला असला तरी तो नवराच व त्याची बनवि-

ण्यांत आलेली बायको—म्हणजे तिचें सर्वस्व—त्याचेंच, हेंच हल्लींच्या समाजाचें सरळ आणि सोपें गणित ! मला तुम्हांला असा प्रश्न विचारावासा वाटतो कीं, ज्या मुलीनें परमेश्वराच्या व आपल्या मनोमय साक्षीनें आपलें प्रेम—आपलें सर्वस्व—ज्या एका विशिष्ट माणसाला अर्पण केलें असेल—त्याच्याशिवाय इतर कोणाहि माणसाला तिनें, समाजाच्या भीतीनें असो किंवा कशामुळेंहि असो, आपलें सर्वस्व अर्पण करण्यास तयार होणें हें जारकर्मच नव्हे काय ? माझ्या माधवाला मी माझा स्वामी—माझा राजा मानतें. मग माझ्या हिशेबानें तुम्ही बंडखोरच नाहीं काय ? मला मान्य आहे कीं, तुमच्यांत पुष्कळ सद्गुण आहेत. माधव तुमच्या इतका सद्गुणी आहे कीं नाहीं हेंहि मला माहीत नाहीं, कारण आज कितीतरी वर्षांत त्याची कांहींच माहिती मला कळलेली नाहीं. बरें, तो तुमच्या इतकाच किंवा तुमच्याहूनहि अधिक सद्गुणी असलाच तरी हें मात्र खास कीं, सांपत्तिक दृष्ट्या तुम्ही त्याच्यापेक्षां कितीतरी पटींनीं श्रेष्ठ असणार ! मी तर असेंहि धरून चालतें कीं, त्याची पोटाची खळगीसुद्धां मोठ्या मुष्किलीनें भरत असेल ! तरीसुद्धां तो माधव आहे—तो माझा माधव आहे—तो या यमूचा माधव आहे ! भरजरी पातळ नेसून तुमच्याबरोबर मोटारींतून फिरतांना, माझ्या हातून घडत असलेल्या बदफैली पापामुळें, माझ्या डोळ्यांत अश्रू उभे रहातील ! परंतु माझ्या माधवाच्या बरोबर अन्नासाठीं दारोदार भीक मागतांनासुद्धां मला किती आनंद वाटेल म्हणून सांगूं ! कारण तो माझा आहे आणि मीहि त्याची आणि फक्त त्याचीच आहें. प्रेमाची तुम्हाला कल्पनासुद्धां असेल असें वाटत नाहीं. तुम्ही त्या दिवशीं माझ्याशीं लगट करण्याचा जो प्रयत्न केलात त्याच्याशीं प्रेमाचा कांहींहि संबंध नव्हता हें तुम्हीहि कबूल कराल. त्या तुमच्या प्रयत्नाशीं कसला संबंध असलाच तर तो फक्त अधिकाराचा—हक्काचा होता ! चारचौघां-समक्ष आपल्या गळ्यांत माळ घालणारी बाहुली—तिच्यावर आपला राजरोस हक्कच आहे—ती आपल्या अधिकारांतीलच गोष्ट आहे—तो आपल्या मालकीचा माल आहे एवढीच तुमची भावना ! माझ्या भावनांचा विचार तुमच्या मनाला

शिवलेलाहि नाहीं. मी पुनः एकदां सांगतें कीं, यांत मी तुम्हाला दोष देत नाहीं. तुमच्याकडे काय दोष ? लग्नाच्या वेळीं मला आतां इतकें समजत असतें तर आपल्या दोघांच्या जीवितांचा नकाशाच बदलला असता. पण दुर्दैव तुमचें नि माझें कीं, त्यावेळीं मला पुढील अडचणींची योग्य कल्पना नव्हती. पुढील प्रसंगाचा नकाशा त्यावेळीं माझ्या मनश्चक्षूंपुढें उभा होता पण तो अगदीं पुसट व पुष्कळच चुकीचा !

मी तुम्हांला अखेरचें सांगतें कीं, तुमचा कांहींहि दोष नसतांना तुम्हांला विनाकारण त्रास होत आहे. तुम्हांला होत असलेल्या त्रासाबद्दल मला अत्यंत वाईट वाटत आहे, असें मी लिहिलें तर तुम्ही त्यावर विश्वास ठेवाल काय ? कठीण आहे. पण वस्तुस्थिति मात्र खरोखरच तशी आहे. मला खरोखरच तुमची फार कींव येते. तारुण्यांतील बलिष्ठ विकार कित्येकदां माणसांतील माणुसकी नष्ट करितात असें मी आजपर्यंत नुसतें ऐकत होतें. परंतु तसें होणें अगदींच अशक्य नाहीं, असें मला थोडथोडे पटूं लागलें आहे. हीं दोन वाक्यें मी काय लिहिलीं हें माझें मलाच समजत नाहीं, मग तुम्हांला काय समजणार ?

मी तुमचा हात झिडकारला त्याबरोबर तुम्ही घरांतहि न येतां तडक मुंबईचा रस्ता सुधारलात यावरून तुम्हांला मन आहे, तुमच्यांत माणुसकी आहे हें मला पटलें व म्हणूनच सर्व खुलासा करण्याचें मी ठरविलें. हें पत्र वाचल्यावर तुमच्या मनांत कसल्या भावना जागृत होतील याची मला कल्पना करतां येत नाहीं.

शाळेंत जाण्याची वेळ झाल्यामुळें अधिक लिहिण्यास वेळ नाहीं. कळावें.

माधवाची यमू–

× × ×

बापूसाहेबांनीं तें पत्र तीनदां वाचलें. त्यांना राग आला, त्यांना कींव आली, त्यांना सहानुभूति वाटली, त्यांना पुनः राग आला ! डोक्यांत विचारांचें काहूर

गाजलें. टेबलावर डोकें टेकून त्यांनीं डोळे मिटून घेतले. खोलीच्या दारावर कोणीतरी टिचक्या मारीत असल्याचा त्यांना भास झाला. यावेळीं कोणाचीच भेट घेण्याची त्यांची इच्छा नव्हती. पुनः दरवाजा ठोठावला गेला. त्यांनीं पत्र टेबलाच्या खणांत ठेवलें, आरशांत पाहून केंस सारखे बसविले, चेहेरा शक्य तेतका निर्विकार केला व दाराची कडी काढली.

"बापूसाहेब इनामदार आपणच का ?"

"होय—"

"आपणांला कांहीं त्रास होणार नसेल तर आपणाशीं कांहीं वेळ बोलण्याची माझी इच्छा आहे."

"या–आंत या—"

तो गृहस्थ आंत येऊन खुर्चीवर बसल्यानंतर बापूसाहेबानें कडी लावून घेतली.

"आपलं नांव काय ? आपणाला कधीं पाहिल्याचं मला कांहीं स्मरत नाहीं," बापूसाहेब म्हणाला.

"आपली यापूर्वी कधीं भेटच झालेली नाहीं."

"आपण विद्यार्थीच दिसतां !—" बापूसाहेबानें विचारल्यासारखें केलें.

"होय, मी विल्सन कॉलेजांत असतों. यंदां बी. ए. ला बसणार आहें."

"मला अजून आपलं नांव नाहीं समजलं !"

"हो खरंच. माझं नांव गाडगीळ–एम्. जी. गाडगीळ. मी आज आपल्याला पहिल्यानंच भेटत असुन, अशा कांहीं चमत्कारिक विषयासंबंधानं मला आपणाशीं बोलणं करावं लागणार आहे कीं, आपण तर चकित व्हालच परंतु तें बोलणं सुरू कसं करावं याचा मलाहि विचारच पडला आहे."

" तुम्ही पुढें काय बोलणार त्याच्यापेक्षां तुम्ही सध्यां बोलतां आहांत याचंच मला फार आश्चर्य वाटतं आहे ! अशा कोणत्या महत्त्वाच्या विषया-संबंधानं तुम्ही बोलणार आहांत माझ्याशीं ?" बापूसाहेबानें विचारलें.

" मी तुमच्याशीं आतां जें कांहीं बोलणार आहें तें अत्यंत खासगी स्वरूपाचं असल्यामुळें मी आगाऊ तुमची क्षमा मागून ठेवतों–"

" त्यांत कसली क्षमा मागायची ? तुम्हांला जें कांहीं बोलायचं असेल तें खुशाल मनमोकळेपणानं बोला. "

" माझं नांव मी सांगितलंच. ज्या गोष्टीसंबंधानें मी तुमच्याशीं आतां बोलणार आहें ती गोष्ट तुमची खासगी आहे तशीच ती माझीहि आहे. तुम्ही विवाहित आहांत ही गोष्ट खरी आहे का ? रागावूं नका–मी तुम्हाला आगाऊच सूचना दिलेली होती कीं, मला आपणाशीं अत्यंत खासगी विषयासंबंधानं बोलायचं आहे म्हणून–" माधव म्हणाला.

" पण मला कल्पना नव्हती कीं, तुम्हांला माझ्याशीं अशा एखाद्या भलत्याच विषयासंबंधानं बोलण्याची इच्छा असेल म्हणून ! "

" क्षमा करा मला. पण केवळ मला याच एका विषयासंबंधानं तुमच्याशीं बोलण्याची इच्छा आहे. तुम्हांला याबाबत त्रास होण्यासारखा असेल तर हा विषय इथंच संपवून मी आपल्या घरचा रस्ता सुधारायला तयार आहें, ". असें म्हणून आलेल्या गृहस्थानें टोपी घातली व तो दाराकडे निघाला सुद्धां !

" थांबा–मी तुम्हांला एकदां माझा शब्द दिला आहे, तो मोडून खोटे-पणाचा धनी होण्याची माझी इच्छा नाहीं. या इकडे, तुम्हांला जें काय बोलायचं असेल नि ज्याविषयीं बोलायचं असेल तें खुशाल बोला. मी तुमचं सर्व बोलणं शांतपणें ऐकून घ्यायला तयार आहें. "

तो गृहस्थ परतला. कांहीं क्षण विश्रांति घेतल्यासारखें करून तो बोलूं लागला.

" तुमचा विवाह झालेला आहे ना ? "

" होय–"

" आपल्या पत्नीचं नांव–" पुढें त्या गृहस्थाच्यानें बोलवेच ना. त्याचा गळा भरून आला.

" आपलं नांव माधव–" बापूसाहेबांचा प्रश्न पुरा होण्यापूर्वीच त्या आलेल्या तरुणानें होकारार्थी मान हालविली. तसें करतांना त्याची मुद्रा अत्यंत खिन्न दिसत होती.

" तुमचं नांव मला पंधरा मिनिटांपूर्वीपर्यंत माहीत नव्हतं," बापूसाहेब बोलूं लागला. " जिच्याशीं माझं लग्न झाल्यामुळं ती मला माझी अशी वाटत होती त्या तुमच्या यमूचं मला आतांच पत्र आलं आहे. "

' तुमच्या यमूचं ' हे शब्द बापूसाहेबाच्या तोंडून बाहेर पडतांच माधवाची मुद्रा एकदम बदलली. खिन्नतेऐवजीं त्याच्या चेहेऱ्यावर विस्मयाची छटा दिसूं लागली. आदराचीहि त्यांत झांक होती. ही गोष्ट बापूसाहेबाच्या लक्षांत आल्याशिवाय राहिली नाहीं. बापूसाहेब पुढें म्हणाला,

" माधवराव, हें घ्या तुमच्या यमूचं पत्र. असे गोंधळूं नका. हें पत्र मी वाचलं त्या वेळीं माझ्या मनाची स्थिति काय झाली तें मला विशद करून सांगतां येणं शक्य नाहीं. पहिल्यानं हें मी वाचलं त्यावेळीं, झालेल्या अपमानाच्या कल्पनेनं माझ्या मेंदूचा पारा एवढा चढला कीं, त्यावेळीं तुम्ही किंवा तुमची यमू माझ्यासमोर असती तर मला खून करण्याचा सुद्धां मोह झाला असता ! तेंच मी दुसऱ्यांदां वाचलं. दुसरा एखादा मनुष्य माझ्या जागीं असता तर मला वाटत नाहीं कीं, हें पत्र पुनः वाचण्याची त्याला इच्छा तरी झाली असती असं ! परंतु मला ती झाली. मला भावना आहेत त्याचप्रमाणें त्या इतरांनाहि आहेत या गोष्टीची मला पूर्ण जाणीव आहे. माझ्या विवाहित पत्नीचा—नव्हे—तुमच्या यमूचा पहिल्यानें मला अत्यंत राग आला होता. पण तें

पत्र पुनः वाचल्यानंतर मला तिच्या भावनांविषयीं विचार करण्याची इच्छा झाली. हेंच पत्र तिसऱ्यांदा वाचल्यावर मला तिच्याविषयीं अनुकंपा वाटूं लागली ! कांहीं क्षणांनीं मला तिच्याविषयीं आत्यंतिक आदर वाटूं लागला ! माधवराव, तुम्हांला वाटत असेल कीं, संतापाच्या अतिरेकामुळें माझी बुद्धि बावचळली आहे व म्हणून मी कांहीं तरी बोलतों आहें ! मी हें पत्र पहिल्यानें वाचल्याबरोबर तुमची नि माझी गांठ पडली असती तर तुमची ही शंका बरोबर ठरली असती ! कारण त्यावेळीं माझा मेंदु भरकटूनच गेला होता. पण आतां—या क्षणाला मात्र—माझी बुद्धि बावचळलेली तर नाहींच पण ती अत्यंत स्थिर नि शांत झालेली आहे. मोजून पहा माझ्या नाडीचे ठोके. माझी नाडी तुमच्या नाडी-पेक्षांहि शांत चालली असल्याचं तुमच्या प्रत्ययाला येईल. तुमच्या यमूशीं माझं लग्न लागलं यांत मी काडीमात्र जबाबदार नाहीं. जिच्याबरोबर आपलं लग्न लागलेलं असेल ती एक साडेतीन हात लांबीची चालतीबोलती बाहुली व तीहि संपूर्णपणं आपल्या मालकीची—अशी इतरांप्रमाणें माझीहि विचारसरणी होती हें मी प्रांजल-पणें कबूल करतों. तिलाहि कांहीं स्वत्त्व आहे, तिलाहि कांहीं भावना आहेत, ही गोष्ट मला आतां पूर्णपणें पटूं लागलेली—नव्हे—पटलेली आहे. आपला समाज तिच्याविषयीं काय ग्रह करून घेणार असेल तो खुशाल घेवो, मला तर ती पावि-त्र्याची मूर्तिमंत पुतळी दिसते—खरी आर्यस्त्री वाटते. तिनं आपलं मन एकदां तुम्हांला अर्पण केल्यानंतर लग्नाच्या नकली बंधनांनीं ती माझी होऊंच शकत नाहीं. एका अस्सल आर्यस्त्रीच्या पवित्र प्रेमाला तुम्ही पात्र झालांत—तुम्ही धन्य आहांत !"

बापूसाहेबाचें भाषण चालूं असतांना माधव त्याच्या प्रत्येक शब्दागणिक अधिकाधिक आश्चर्यचकित होत होता. त्याला कल्पनाहि नव्हती कीं, बापूसाहे-बाच्या तोंडून आपल्याला असले शब्द ऐकावयास मिळतील ! सुदाम्याच्या तोंडून त्याला जी हकिकत समजली होती तीवरून त्याचा असा समज झाला होता कीं, आपणांला एका क्रूर जंगली जनावराशीं सामना करावयाचा आहे !

परंतु बापूसाहेबाचें आतांचें भाषण ऐकून त्याला, आपण स्वप्नसृष्टींत तर नाहीं ना, असें वाटूं लागलें. काय बोलावें हेंच त्याला सुचेना. माधवाच्या मनाचा उडालेला गोंधळ बापूसाहेबाच्या लक्षांत येण्यास फारसा अवधी लागला नाहीं. बापूसाहेब पुनः बोलूं लागला,

" माधवराव, मी इतका वेळ बोललों तें केवळ उपरोधिकपणें, असं का तुम्हांला वाटतं ? तुम्ही कांहीं बोलतच नाहीं यावरून मी काय समजूं ? माझ्या विचारसरणींत तुम्हांला कांहीं दोष दिसतो का ? "

" बापूसाहेब, मी दिङ्‌मूढ झालों आहें, " माधव म्हणाला. " मला काय बोलावं हेंच सुचत नाहीं. मी माझ्या कल्पनासृष्टींत तुमच्या संबंधानं जें चित्र उभं केलं होतं तें इतकं भेसूर होतं कीं, तसलं चित्र मनानं चित्रित केल्याबद्दल आता माझी मलाच लाज वाटते. बापूसाहेब, क्षमा करा मला. तुमच्या उच्च विचारसरणीची मला कांहीं कल्पना नसल्यामुळेंच माझ्या हातून असा प्रमाद घडला. "

" यांत क्षमा मागण्यासारखी कांहीं चूक तुमच्या हातून घडली असं मला वाटत नाहीं. ज्या स्त्रीशीं आपण विवाहाच्या संस्कारानं बद्ध झालों आहोंत ती स्त्री सर्वस्वीं आपल्या मालकीची आहे असंच सर्व पुरुष समजतात. त्या स्त्रीचं शरीर, तिचं मन, तिची बुद्धि, तिच्या भावना या सर्व आपल्याच मालकीच्या–त्या सर्व आपल्या ताब्यांत, अशाच विचारसरणीचे बहुतेक पुरुष असल्यामुळें, माझ्यासंबंधानं तुमचा झालेला ग्रह विक्षिप्तपणाचा होता याबद्दल मी तुम्हांला दोष लावूं शकत नाहीं. "

" परंतु दुसरा एखादा उदारमतवादी असता तर त्यानं फार तर आपल्या विवाहित पत्नीला, तिच्या लग्नापूर्वीच्या भावनांबद्दल व त्यांचा आविष्कार करून दाखविण्याचें धैर्य दाखविल्याबद्दल, क्षमा केली असती; परंतु अखेरीस त्यानं तिला आपलं म्हणणं ऐकायला लावलंच असतं ! " माधव म्हणाला.

" अशा माणसांनीं स्वतःला उदारमतवादी म्हणविणं म्हणजे त्या शब्दाचा अपमान करण्यासारखं आहे. स्वातंत्र्याचे गोडवे गाणारे पुष्कळ असतात. पण त्यांपैकीं बहुतेकांची दृष्टि स्वार्थावरच खिळलेली असते. वे स्वातंत्र्याचे भोक्ते असतात, पण केवळ स्वतः स्वतंत्र रहाण्यापुरतेच ! त्यांच्या गुलामगिरींत वर्षानुवर्ष खितपत पडणारे दुर्बल स्वतंत्रतादेवीचा नुसता नामोच्चार करूं द्यात कीं, हेच ढोंगी स्वातंत्र्यवादी त्यांच्या जिभा मुळासकट हांसडून काढतात कीं नाहीं पहा ! प्रत्यक्ष तत्त्वपालनापेक्षां स्वार्थसंरक्षणाकडेच त्यांची दृष्टि अधिक असते. पण अशांना जगांत फुकटचा मोठेपणा मिळतो व चार दूधखुळे लोक त्यांचा उदो उदो करायला तयार होतात. "

" परंतु बापूसाहेब, यमूला जो अन्याय झालासा वाटतो, त्याला तुम्हीं किंचित् तरी जबाबदार आहांत का ? "

" मी जबादार आहें कीं नाहीं याचा विचार करण्याची मला आवश्यकताच वाटत नाहीं. जबाबदार कोणीहि असलं—इतकंच कशाला—प्रत्यक्ष तीच जबाबदार असली तरीसुद्धां तिला भोगाव्या लागणार असल्याच्या अन्यायापासून तिचा बचाव करण्यास मी तयार आहें—नव्हे तें मला माझं पवित्र कर्तव्य वाटतं ! "

" मग बापूसाहेब, यांतून आतां मार्ग निघणार कसा ? "

" कां बरं ? मी इतका वेळ बोललों त्यांत तुमच्या प्रश्नाचं उत्तर नाहीं काय ?"

" म्हणजे काय ? तुम्ही यमूला विवाहाच्या बंधनांतून—लग्नाच्या फांसांतून—"

" मुक्त करण्यास तयार आहें—" बापूसाहेब म्हणाला. " माधवराव, गोंधळूं नका. तुमच्या यमूला विवाहबंधनाच्या कृत्रिम शृंखलांपासून—लग्नाच्या फांसांतून—मुक्त करण्याला मी खरोखरच तयार आहें. इतकं कशाला ? मी याच क्षणाला तिची स्वतंत्रता तिला देऊनहि टाकिली आहे. "

" जनापवाद "—माधव बोलूं लागला. पण बापूसाहेबानें त्याला पुढें बोलूंच दिलें नाहीं. तो म्हणाला,

हृदयांची ओळख—

" मला कोणत्याच गोष्टीची पर्वा वाटत नाहीं. जग मला कांहींहि म्हणो ! एका निरपराध व पवित्र आत्म्याचा खून करण्याइतका मी अजून नीच बनलों नाहीं. तुमच्या यमूविषयीं जग कांहींतरी वेडेंवांकडें बरळूं लागेल याची कल्पना मला आहे; व तसें होऊं नये म्हणून ही सर्व हकिकत वर्तमानपत्रांच्या द्वारें मी आपल्या सहीनिशीं प्रसिद्ध करण्यासहि तयार आहें. "

माधवाची मान आपोआप लवली. तो भावनाप्रधान असल्यामुळें त्याचा कंठ भरून आला, त्याच्या डोळयांत अश्रू तरंगूं लागले. बापूसाहेबाचा चेहेराहि अत्यंत गंभीर दिसूं लागला. माधवानें आपले विचार कमेबसे आंवरले व तो म्हणाला,

" बापूसाहेब, मी इथं येण्यापूर्वी मला एका महात्म्याचं दर्शन घडणार आहे असं कोणी सांगितलं असतं तर मी त्याची मूर्खांतच गणना केली असती. आजचा हा दिवस माझ्या आयुष्याच्या रोजनिशींत सुवर्णाक्षरांनींच लिहून ठेवण्याच्या योग्यतेचा आहे. स्वतःच्या चुकीचें परिमार्जन करतांनाहि मरणप्राय दुःख वाटणारे हरीचे लाल जगांत अनेक आहेत. परंतु आपण किंचितहि जबाबदार नसतांना दुसऱ्याच्या बाबतींत झालेल्या अन्यायाचं परिमार्जन करण्यास स्वतः तयार होणारा महात्मा मात्र एखादाच सांपडतो ! "

" माधवराव, इतका वेळ मी एक गोष्ट तुमच्यापासून लपवून ठेविली होती, पण ती आतां उघड केल्यावांचून माझ्याच्यानें रहावतच नाहीं. माझ्या तोंडून इतका वेळ अशा तऱ्हेचे उद्गार बाहेर पडले ते स्फूर्तीनेंच पडले हें उघड आहे. त्या स्फूर्तीचं उगमस्थान मी तुम्हांला सांगितलं तर तुमचा माझ्या सांगण्यावर विश्वास बसेल का ? "

" बापूसाहेब, तुमच्याविषयीं ज्या भावना माझ्या मनांत उत्पन्न झाल्या आहेत त्यांचं योग्य आविष्कारण करायचं म्हटलं तर भाषेंत शब्दच सांपडणार नाहींत. तुम्ही सांगाल तें खरंच सांगाल ! "

" तर मग त्या स्फूर्तीचं उगमस्थान—एका निरपराध—परम पवित्र तरुणीविषयीं वाटणारं पवित्र प्रेम ! "

" म्हणजे ? " माधवानें विचारलें. " विवाहापूर्वी तुम्हींहि आपलं मन कोणाला तरी अर्पण केलं होतं ? "

" नाहीं—विवाहापूर्वी नाहीं—विवाहानंतर ! "

" काय ? विवाहानंतर ? "

" होय. भलताच गैरसमज करून घेऊं नका. मी उभ्या आयुष्यांत एकाच देवतेची मनोभावानं भक्ति केली—एकाच देवतेची मानसपूजा केली—आणि ती देवता म्हणजे दुसरी तिसरी कोणी नसून तुमची यमूच ! "

माधवाचा चेहेरा एकदम बदलून गेला. बापूसाहेब पुढें बोलूं लागला, " तुम्हांला माझा राग आला असेल. परंतु खरी वस्तुस्थिति तुम्हांला सांगणं मला भाग होतं ! "

" बापूसाहेब, मला आणि तुमचा राग ? बापूसाहेब—बापू—मित्रा, या तुझ्या मित्राला मित्रत्वाच्या भावनेनं अशी कडकडून मिठी मार कीं, प्रत्यक्ष काळ आपलीं कराल शस्त्रं सरसावून आला तरी आपली जबरदस्त मिठी त्याच्या बापालाहि सोडवितां येऊं नये ! "

बापूसाहेबानें माधवाला मिठी मारली. दोघांनीं आपल्या अश्रूंना मनसोक्त वाव दिला. ते अश्रू कसले होते हें कोणाला कसें सांगतां येणार ?



## हिरेची स्पष्टोक्ति--

## १३

माधव बापूसाहेबाच्या खोलींतून बाहेर पडला तेव्हां त्याची मनःस्थिति फारच विलक्षण झाली होती. आपण आता अनुभविलें तें स्वप्न तर नव्हे ना, अशी त्याला वारंवार शंका येत होती. पक्षपाती व कद्रु वृत्तीच्या हिंदु समाजांत बापूसाहेबासारखा उदारमतवादी म्हणजेच खरा मर्द असूं शकतो तर ? बापूसाहेबाची लोकोत्तर वृत्ति पाहून माधवाला खरोखरच अत्यानंद झाला होता, पण तो फार वेळ टिकला मात्र नाहीं. बापूसाहेब म्हणजे सर्वसाधारण नियमाप्रमाणें भावनाशून्य व पशुवृत्तीचा असला पाहिजे हीच माधवाची मूळ कल्पना परंतु ती सपशेल खोटी ठरली. आपली कल्पना खोटी ठरली याचा माधवाला अत्यानंद होणें सहाजिकच होतें. परंतु तो आनंद तसाच टिकवून धरणें मात्र माधवाला कांहीं वेळानें कठीण वाटूं लागलें--नव्हे--तसा त्याला अनुभवच येऊं लागला. सात्विक आनंदाची जागा हळुहळु ईर्ष्या, द्वेष इत्यादि हीन विकार पटकावूं लागले. त्याची त्यालाच लाज वाटूं लागली. तो गोंधळून गेला. तो स्वतःशीं विचार करूं लागला.

मला बापूसाहेबाचा हेवा कां वाटतो ? बापूसाहेबाची थोर वृत्ति पाहून माझी मान आदरानें आपोआपच खालीं वांकली आणि आतांच माझ्या मनांत कसले क्षुद्र विचार थैमान घालूं लागले ? आपल्याहून गुणांनीं श्रेष्ठ असा मनुष्य आपल्या पहाण्यांत आला तर आपणाला त्याचा हेवा वाटावा कीं आपल्या गुणांचें संवर्धन

करण्याची शक्ति ईश्वरानें आपणाला द्यावी म्हणून आपण त्याची प्रार्थना करावी ? छेः, मला या घटकेपर्यंत कल्पनाहि नव्हती कीं, माझें मन इतकें क्षुद्र असेल ! खरोखरच का मी इतका क्षुद्र आहें ? असेन तर धिःकार—मला त्रिवार धिःकार असो !

समजलें—इतके हीन विकार माझ्या मनांत हलकल्लोळ कां माजवीत आहेत हें आतां माझ्या लक्षांत आलें ! बापूसाहेबाच्या थोर वृत्तीचा प्रत्यक्ष अनुभव आल्यामुळें माझी खात्री होऊन चुकली कीं, यमूचें पाणिग्रहण करण्याची पात्रता माझ्याहून त्याच्यांतच अधिक आहे. हेंच—अगदीं हेंच—माझ्या द्वेषाचें कारण !

अहा रे माझें यमूवरील निर्व्याज व निरपेक्ष प्रेम ! माझें यमूवरील प्रेम जर खरोखरच इतक्या उच्च दर्जाचें असतें तर आपणाहून थोर योग्यतेचा सवंगडी तिला मिळाला म्हणून मला हर्षाच्या उकळ्या फुटायला हव्या होत्या. त्याऐवजीं मला बापूसाहेबाचा मत्सर वाटूं लागला आहे ! यावरून यमूवरील माझें प्रेम कोणत्या जातीचें आहे याचा आपोआपच नाहीं का उलगडा होत ?

निर्व्याज—निरपेक्ष प्रेम ! काय हा शब्दच्छल ? काय हें शब्दावडंबर ? स्त्री आणि पुरुष—विशेषतः तरुणी व तरुण यांचें परस्परांवर निर्व्याज—निरपेक्ष प्रेम असूं शकतें काय ? निदान यमूवरील माझें प्रेम तरी इतक्या थोर दर्जाचें आहे काय ?

आपण हेरून ठेवलेल्या मादीवर दुसऱ्या एखाद्या नराचें लक्ष्य असल्याचा नुसता संशय आला तरी पहिला नर आपल्या जिवावर उदार होऊन त्या दुसऱ्या नराला ठारहि मारण्यास प्रवृत्त होतो. त्या पशूंत आणि माझ्यांत—मी स्वतःला मनुष्य म्हणवितों—काय फरक आहे ? माझें यमूवरील प्रेम जर निर्व्याज व निरपेक्ष म्हणायचें तर त्या नराचें त्याच्या मादीवरील प्रेम निर्व्याज व निरपेक्ष कां म्हणायचें नाहीं !

### हिरेची स्पष्टोक्ति—

पशुकोटींतील नरमादींचें एकमेकांवरील प्रेम म्हणजे निव्वळ कामशांतीसाठीं असतें असें म्हणून आम्ही माणसें त्या बिचाऱ्यांना दोष देतों आणि आम्ही माणसें काय दिवे लावतों ? शुद्ध प्रेम, सात्विक प्रेम, असले काल्पनिक शब्दप्रयोग आम्हांला निर्माण करतां येतात हाच जर आमच्या श्रेष्ठपणाचा पुरावा असेल तर असो ! असल्या शुद्ध प्रेमाचा डोलारा उभारणाऱ्या तरुणतरुणींना लग्न करण्याचे प्रसंग कां येतात ? त्यांनीं सारा जन्म भावाबहिणीचें नातें कां ठेवूं नये ?

विचार करीतकरीत माधव एकदांचा सुधाकराच्या घरीं येऊन पोहोंचला. सुधाकर घरीं नव्हता. माधवाच्या चेहेऱ्यांत पडलेला बदल हिरेच्या लक्ष्यांत आल्याशिवाय राहिला नाहीं.

" भेटले का तुला बापूसाहेब ? "

" हो—हा आतां त्यांच्याकडूनच येतों आहें. "

" त्यांची तुझी बरीच झडलेली दिसते ! "

" त्यांची माझी झडली नाहीं आणि झडणारहि नाहीं ! "

" कां ? तुझा चेहेरा पहातांच ते वरमले वाटतं ? "

" ते वरमले नाहींत पण त्यांची थोर वृत्ति पाहून मी मात्र शरमलों ! "

" कोणाची वृत्ति ? बापूसाहेबांची ? "

" होय—इतकी थोर कीं त्याच्या नखाचीहि सर मला नाहीं. तो थोर व अतिपवित्र आहे तर मी पापी आहें—दुरात्मा आहें ! "

" तुझ्या यमूला तुझ्यापासून हिरावून नेणारा तो महात्मा आणि यमूवरील शुद्ध प्रेमामुळें आपल्या सोन्यासारख्या आयुष्याची होळी करून घेण्यास तयार झालेला तूं पापात्मा होय ? "

" हें नुसतं शब्दजाल आहे, हिरा ! मी कसली होळी केली ? मी असे काय कष्ट सहन केले ? मी कसलाहि स्वार्थत्याग केलेला नाहीं ! यमूसाठीं—जिला मी

माझी यमू असं अभिमानानं म्हणतों—तिच्यासाठीं मी कांहींहि केलेलं नाहीं ! उलट माझं शरीर नसलं तरी माझं मन मात्र खात्रीनं चळलं आहे. प्रयत्नांची पराकाष्ठा करून मी माझं शरीर अजून भ्रष्ट होऊं दिलेलं नाहीं—पण माझं मन—त्यानं आपली उच्च पायरी केव्हांच सोडली आहे. कांहीं दिवसांपूर्वींपर्यंत तेथें एका यमूचीच मूर्ति दिसत होती—पण त्या दिवशींच्या प्रकारानंतर यमूची मूर्ति अंधुक होऊं लागली. सुदाम्याला त्या दिवशीं अपघात झाला नसता व त्याच्याकडून मला यमूची सर्व हकिकत समजली नसती तर कालांतरानं त्या मूर्तीचा मागमूसहि उरला नसता ! असलं माझं दुर्बल मन—इतकं माझं पापी मन ! ”

“ माधव, तो सर्व दोष माझा आहे व त्याबद्दल मी तुझी क्षमाहि मागितली आहे. मला काय बरं माहीत कीं, प्रेमाच्या बाबतींत तुझा तूं स्वतंत्र नाहींस ? मला तसं माहीत असतं तर माझ्या हातून तसा अतिप्रसंग झाला असता का ? ”

“ मी तुला मुळींच दोष देत नाहीं. सर्व दोषांचा धनी मीच आहें ! यमू व बापूसाहेब लग्नविधीनं बद्ध झाल्यानंतरहि शरिरानंच नव्हे तर मनानंहि पवित्र राहूं शकतात आणि मी तुझ्यासारख्या युवतीचा स्पर्श झाल्याबरोबर विरघळूं लागतों, यावरून त्या दोघांच्या मानानं मी किती तरी कनिष्ठ, कितीतरी पापी, हें सरळच नाहीं का सिद्ध होत ? ”

“ याचा उलट बाजूनं कां विचार करूं नये ? सोनं अग्नींत होरपळत असतांना पिंवळ्याचं लाल झाल्यासारखं भासतं, त्यानं आपल्या जन्मजात पिंवळेपणाचा त्याग केल्याचा आभास उत्पन्न होतो, परंतु अग्नींतून बाहेर पडतांच तेंच सोनं पूर्वीपेक्षांहि अधिक उजळयानं पिंवळं दिसूं नाहीं का लागत ? माझ्या आततायी वर्तनामुळें तुझ्यांत झालेला क्षणिक बदल असल्याच प्रकारचा नव्हे का ? सोनंच कसाला लावण्यांत येत असतं, कथलाचा किंवा लोखंडाचा कांहीं कोणी कस घेत नाहीं. यमू किंवा बापूसाहेब यांच्यावर तूंच विश्वास ठेवायला

तयार झाला आहेस म्हणून मीहि ठेवतें पाहिजे तर ! पण त्या दोघांची अनुभवानं परीक्षा झाल्याशिवाय त्यांची उगाच भरमसाट स्तुति करण्यांत मला तरी फारसा अर्थ दिसत नाहीं."

"कोणाची परीक्षा कोणी घ्यायची ? आपली काय लायकी आहे त्यांची परीक्षा घेण्याची ? त्यांना तूं अजून प्रत्यक्ष पाहिलं नाहींस म्हणून तुला असली भाषा वापरणं सुचत आहे."

"तुझ्या मेंदूवर कमला तरी भयंकर परिणाम झाला असल्याचा माझा अंदाज अस्थानीं नव्हता म्हणायचा ! त्या बापूसाहेबांची तारीफ आणि तीहि तुझ्या तोंडून ?"

"हिरा, तुला आश्चर्य वाटणं सहाजिकच आहे. बापूसाहेबाची उदार वृत्ति पाहून मला सुद्धां पहिल्यानं आश्चर्यच वाटलं ! किती उदार—किती थोर गृहस्थ आहे तो !"

"मला तर त्या बापूसाहेबांचीं स्तुतिस्तोत्रं ऐकण्याचा अगदीं कंटाळा आला. असला कसला एवढा थोरपणा त्यानं दाखविला ?"

माधवानें हिरेला सर्व सांगितलें. तिलाहि बापूसाहेबाचें कौतुक वाटलें.

"मग हिरा, आतां सांग बरं, माझ्या म्हणण्याप्रमाणं बापूसाहेब खरोखरच फार उच्च मनोवृत्तीचे सद्‌गृहस्थ आहेत कीं नाहींत ?"

"एकदम एकाद्या माणसाविषयीं वाईट मत करून घेणं हें जसं दूषणास्पद आहे तसंच एखाद्याच्या एखाद्या चांगल्या भाषेवरून अगर कृतीवरून त्याच्या-विषयीं एकदम चांगलं मत बनविणंहि दूषणास्पद नसलं तरी भूषणास्पद मात्र खास नाहीं."

"असं कसं म्हणतेस तूं, हिरा ? बापूसाहेब यमूला विवाहाच्या कृत्रिम बंधनांतून सर्वथैव मुक्त करायला तयार झाला, यावरून त्याचं यमूवरील प्रेम

निर्व्याजच असलं पाहिजे हें नाहीं का सिद्ध होत ? ज्यामुळें यमू सुखी होईल तें करणं हेंच त्याला आपलं कर्तव्य वाटतं. त्याच्या यमूवरील प्रेमांत स्वार्थाचा लेशहि असता तर त्यानं आपल्या मगरमिठींतून तिची मुक्तता करण्याचा उदारपणा खात्रीनं दाखविलाच नसता ! ”

“ हें तुझं म्हणणं मला मान्य आहे आणि म्हणूनच मला बापूसाहेबांचं फारसं कौतुक वाटत नाहीं. त्यांचं यमूवरील प्रेम जर सहेतुक असतं आणि तरीहि त्यांनीं तिला बंधनांतून मुक्त केलं असतं तर मात्र त्यांचा थोरपणा मला पटला असता. यमूवरील त्यांच्या प्रेमांत जर कोणताहि हेतूच नाहीं तर ती त्यांना मिळाली काय किंवा दुसऱ्या कोणाला मिळाली काय, त्यांना त्याचं काय सुखदुःख ? ”

“ म्हणजे ? हिरा, तुझ्या हिशेबाप्रमाणें निर्हेतुक प्रेमाला कांहीं किंमतच नाहीं तर ? ”

“ तरुणतरुणीचं निर्हेतुक प्रेम म्हणजे कसं असतं हें मला समजतच नाहीं म्हणून कदाचित् मला त्याची किंमत कळत नसेल ! तूं निर्हेतुक प्रेम करूं शकतोस—तुला त्याचा प्रत्यक्ष अनुभव आहे—म्हणून निर्हेतुक प्रेमाची होळी करणं म्हणजे अलौकिक स्वार्थत्याग होय, असं तुला वाटतं. मला तरुण-तरुणींचं फक्त सहेतुक प्रेमच माहीत आहे—मला त्याचा अनुभवहि आहे—म्हणून सहेतुक प्रेमाला तिलांजली देणं कठीण म्हणूनच मोठेपणाचं असं मला वाटतं. त्या बापूसाहेबांचंहि यमूवर निरपेक्ष प्रेम--तुझंहि तिच्यावर निःस्वार्थ प्रेम——”

“ हिरा, उपरोधिक बोलून मला लाजवूं नकोस. माझी व माझ्या प्रेमाची लायकी मला आतां पूर्णपणें कळून चुकली आहे. मला निरपेक्ष—सात्त्विक—असं प्रेम करतां येतं असं मला आजपर्यंत वाटत होतं. पण तुझ्याजवळ मन मोकळं करून बोलायला मला संकोच बाळगण्याचं कांहींच कारण नाहीं——”

## हिरेची स्पष्टोक्ति—

हिरेचा चेहेरा थोड्याशा लज्जेनें व बऱ्याचशा आनंदानें खुलूं लागला. माधव पुढें कांहीं न बोलेल तर बरें असें तिला वाटूं लागलें.

" माझ्या बोलण्याकडे तुझं लक्ष नाहीं का ? "

" असं रे काय करतोस माधव ? तुझा स्वभावच आततायी ! तुझं बोलण ऐकत असतांना माझ्या मनांत एखादा विचार आला या नुसत्या शंकेनंसुद्धां तुला माझा राग आला ! "

" माझ्या स्वभावांत हा दोष आहे खरा, हिरा ! मला वाटतं माझ्या हातांत जर चुकूनमाकून थोडी सत्ता असती तर तिचा मी इतका दुरुपयोग केला असता कीं, लोकांच्या असंतोषाच्या कुंडांत माझी आहुतीच पडली असती. हिरा, क्षमा कर मला. मी इतके दिवस स्वतःला सर्व सद्‌गुणांचा पुतळा समजत होतों; पण आज माझी खात्री झाली कीं, मीहि इतरांप्रमाणेंच एक दुर्बल मनुष्यप्राणी आहें. माझ्यांत सद्‌गुणांपेक्षां दुर्गुणच अधिक आहेत. ज्या सात्त्विक प्रेमाची—ज्या निरपेक्ष प्रेमाची—मी आजपर्यंत शेखी मिरवीत होतों, त्याचा लेशहि माझ्या ठायीं नाहीं. अरेरे ! मी पुरुष तरी आहें का ? "

माधवानें आपलें तोंड आपल्या हातांनीं झांकून घेतलें. एखाद्या मुलासारखा तो स्फुंदून स्फुंदून रडूं लागला. त्याला रडतांना पाहून हिरेला गहिंवरून आलें. त्याचे दोन्ही हात दूर सारून त्याचे अश्रू तिनें पुसून काढले. तिच्या नेत्रांतून अश्रू वहातच होते.

" असं काय बरं माधव करतोस एखाद्या वेड्यासारखं ? चार माणसांप्रमाणं असणं वाईट का ? त्यांत स्वतःला वाटेल ते अपशब्द बोलून घेण्यासारखं काय आहे ? "

" हिरा, चार माणसांप्रमाणं असणं बरं का वाईट हें निराळं. परंतु इतके दिवस इतर चार लोकांपेक्षां आपण कांहींतरी निराळे आहोंत, इतरांत नाहीं असं

विशेष कांहींतरी आपल्यांत आहे असं मी ढोंगच करीत नव्हतों का ? खरा मर्द कधीं ढोंगी असतो का ? अर्थात् ढोंगी हा नामर्दच नव्हे का ? "

" मला नाहीं माधव हे तुझ्या तोंडचे कांहींतरी शब्द ऐकवत ! " हिरेला अधिकच रडूं येऊं लागलें. माधव तिची समजूत करूं लागला.

" हिरा, तूं कां माझ्याकरतां रडतेस ? माझी खरी किंमत मला कळून चुकली—मी समजत होतों त्याहून ती फार कमी असल्यामुळें मला वाईट वाटलं व त्यामुळें मला रडायला आलं—पण तुला असं काय झालं ? "

" तूं आपली किंमत फार मोठी असतांहि स्वतःला कांहींतरी दूषणें लावायला लागलास म्हणून मला रडायला येऊं लागलं. तुझ्यांत खरोखरच कांहीं तरी दोष आहेत असं गृहीत धरून चाललं तरी त्या दोषांमुळें तुला कांहीं कमीपणा येतो असं मला नाहीं वाटत. कोणत्याहि माणसांत कांहीं गूण व कांहीं दोष हे असायचेच. त्याच्यांत कांहींच गुणदोष नसतील तर चालताबोलता दगडच तो ! दोष असणं हा गुन्हा मुळींच नव्हे. परंतु आपले दोष आपल्याला समजल्यानंतर हळुहळु ते नाहींसे करण्याचा प्रयत्न न करणं हा मात्र गुन्हा आहे. बापूसाहेबांची तुझ्या मनावर सध्यां एवढी छाप पडली आहे म्हणून तुला असं का वाटतं कीं, त्यांच्यांत कांहीं दोषच नसेल ? यमू तर तुला प्रत्यक्ष देवताच वाटते. तुझी अशी का समजूत आहे कीं, मनुष्यांत असणारा कोणताहि दोष तिच्या अंगीं असणं शक्य नाहीं ? "

" तुझ्या म्हणण्याप्रमाणं मी असं धरून चालतों कीं, त्या दोघांतहि कांहीं दोष असतील ! पण तसे ते असले म्हणून माझे दोष मला भूषणावह थोडेच आहेत ? "

" तुझे दोष भूषणावह नसले तरी तुला वाटतात तितके ते भयंकरहि नाहींत. "

हिरेची स्पष्टोक्ति—

" तुझी दृष्टीच मुळीं विलक्षण आहे. माझ्यांत मुळीं तुला दोषच दिसत नाहींत–"

" असं मुळींच नाहीं. तूं मला आवडतोस तो तुझ्या नुसत्या सद्गुणांमुळें नव्हे–मला तूं हवास तो तुझ्या दोषांसकट हवास. तुझ्या अंगीं दोषांपेक्षां गूणच अधिक आहेत. तुझ्याएवढं संयमन करणारा मनुष्य सहसा आढळायचा नाहीं. "

" अस्सं ? तो दिवस तुझ्या डोळ्यांपुढं एकसारखा उभा आहे म्हणायचा ? त्या दिवशीं तरी मला कुठं संयमन करतां आलं ? माझं मन तरी चळलंच कीं नाहीं ? "

" म्हणूनच मला तुझं जास्त कौतुक वाटलं. तुझं मन चळलं, सर्व परिस्थिति अनुकूल होती, तरीसुद्धां तूं आपले मनोविकार आंवरलेस–किती तरी कष्टानं आंवरलेस ! तुझं मनच चळलं नसतं तर तुला कांहीं कष्टच पडले नसते. तुला फार फार कष्ट पडले म्हणूनच तुझ्याबद्दल मला साभिमान कौतुक वाटूं लागलं. तुला कांहीं कष्टच पडले नसते तर मात्र माझा तुझ्याविषयीं फारच विपरीत ग्रह झाला असता. आपलं ज्याच्यावर प्रेम आहे तो पुरुष निग्रही आहे असं अनुभवाला आलं म्हणजे त्या स्त्रीला किती धन्यता वाटते हें तुझ्यासारख्या पुरुषाला कधींच कळणं शक्य नाही ! त्या वेळच्या अनुकूलतेचा तूं फायदा घेतला असतास तर मी तुला दोष तर दिला नसताच पण उलट मला अतिशय आनंदच झाला असता. परंतु अत्यंत कष्टानं तूं आपलं मन आंवरलंस–अजून तुझं तें चित्र माझ्या मनश्चक्षूंना दिसत आहे–त्यामुळें तर मला इतका आनंद झाला कीं–आतां काय सांगूं पुढं ? "

" कांहींच सांगूं नकोस तूं, हिरा. तूं मला कांहींहि सांगण्याची आवश्यकता नाहीं. तूं बोलून दाखविल्याशिवायच तुझ्या मनांतील विचार मला समजतात. मी प्रांजलपणेंच कबूल करतों कीं, तूं मला जिंकलं आहेस–आज नव्हे तर त्या

दिवशींच जिंकलं आहेस. माझ्या यमूवरील सात्विक प्रेमाच्या ढोंगाप्रमाणेंच माझं त्या दिवशींचं मन आंवरणंहि ढोंगीपणाचंच होतं असं मला आतां वाटूं लागलं आहे. एकदां मन चळल्यावर शरीर चळलं किंवा नाहीं याची मला फारशी मातब्बरी वाटत नाहीं."

"मन व शरीर दोन्ही चळण्यापेक्षां नुमतं मनच चळलेलं अधिक वाईट तर नाहीं ना? पण एक गोष्ट तरी तुझ्या लक्ष्यांत आली कीं नाहीं?"

"ती कोणती?"

"माझ्याविषयींचा मोह झुगारून देण्याचे पायीं तुला किती त्रास होतो हें माझ्या एकदां अनुभवास आल्यानंतर तसल्या संकटांत मी अजूनपर्यंत तुला कधींहि घातलेलं नाहीं."

"मग हे तुझे उपकार मी कसे फेडावे अशी तुझी इच्छा आहे?"

"उपकारांची फेड करून घेण्याची मला मुळीं इच्छाच नाहीं!"

"कां बरं?"

"फेड केल्यानंतर का तूं मला विचारणार आहेस? उपकारांत असतांना सुद्धां तूं माझी फारशी पर्वा करीत नाहींस, तर त्याची फेड केल्यावर तर तूं माझं तोंडहि पहाणार नाहींस!"

"असं कां बरं म्हणतेस तूं हिरा? तूं मला इतका का कृतघ्न समजतेस? मी तुझी पर्वा करीत नाहीं, असा तूं माझ्यावर आरोप करतेस; याला तुझ्याजवळ कांहीं पुरावा आहे का?"

"पुरावेच द्यायचे म्हटले तर ते इतके आहेत कीं, त्यांची गणतीच करतां यायची नाहीं! परंतु ते दाखल करण्याची मात्र माझी इच्छा नाहीं. तुला त्रास झाला असता, यापेक्षां तुला होणारा त्रास पाहून मला जें दुःख झालें असतें त्या दुःखाला भिऊनच मी तशी वागलें. म्हणजे माझ्या वाग-

णुकीच्या मुळाशीं माझा स्वार्थच होता असं म्हटलं तरी चालेल."

" तूं काय म्हणशील तें खरं. पण आतां पुढं काय करायचं ? यापुढं बापूसाहेबाचं, यमूचं, तुझं आणि माझं परस्परांशीं नातं तरी काय रहायचं ?"

" कोणी कोणाशीं कोणत्या प्रकारचं नातं ठेवायचं हा ज्याचा त्याचा व्यक्तिगत प्रश्न आहे. तुम्हां तिघांचं मला कांहीं माहीत नाहीं. तुम्हां तिघांपैकीं एकाशीं म्हणजे तुझ्याशीं मात्र माझं नातं मी ठरवून टाकलेलं आहे. माझ्या निश्चयांत कल्पांतींहि बदल होणार नाहीं."

" इतक्या दिवसांच्या स्तब्धतेचं आज उट्टं काढायचा बेत केला आहेस वाटतं ?"

" माझा बेत आजचा थोडाच आहे ? माझा बेत पूर्वी होता तोच आतां आहे व आतां आहे तोच जगाच्या अंतापर्यंत कायम रहाणार ! बेत करणं एवढंच माणसाच्या हातांत—ते सफल होणं न होणं या योगायोगाच्या गोष्टी !"

" कांहींतरी करून मला एकदां यमूची भेट घेतलीच पाहिजे. तिची व माझी एकदां प्रत्यक्ष भेट होईपर्यंत मला इतर कोणत्याहि गोष्टीकडे लक्ष पुरविणं शक्य होणार नाहीं."

" तेंच मी तुला आतां सांगणार होतें ! जी तुला या घटकेपर्यंत देवता अशी वाटत आहे ती तुझी यमू देवता नसून मनुष्यप्राणीच आहे, ही तूं एकदां खात्री करून घेतलीस म्हणजे तुझं गोंधळलेलं मन जरा ताळ्यावर येईल. बरं, पण या भानगडींत मी तुला चहा द्यायला विसरूनच गेलें. तुला चहा दिला नाहीं असं दादाला समजलं तर तो आकाशपाताळ एक करून सोडील !"

" आतां त्या दादाचं बुजगावणं दाखविण्याची कांहीं फारशी जरुरी उरलेली नाहीं !"

हिरेनें जातांजातां माधवाकडे तिरप्या नजरेनें पाहिलें आणि अशी कांही खुमासदार हंसली कीं, माधव सर्दच झाला !

इतक्यांत सुधाकरहि आला.

“ झालं बाबा. सुटला तो सुदामा एकदांचा हॉस्पिटलमधून. गंडांतरच आलं होतं त्याच्यावर—” कोट काढीत काढीत सुधाकर म्हणाला.

“ मग आतां कुठं गेला तो ? ”

“ त्याची आपली साधारण सोय लावून टाकली आहे तूर्त !–”

“ कुठं नोकरी लावून दिलीस कीं काय त्याला ? ”

“ नाहीं. त्याला विचारलं, आतां पुढं काय करायचा तुझा विचार आहे म्हणून ! तो म्हणाला थोडेफार पैसे असते तर स्वतःच कसला तरी धंदा केला असता. मी विचारलं, असे कितीसे पैसे पाहिजेत ? दोनचारशें असले म्हणजे पुरे असं त्याचं म्हणणं पडलं. त्याला पांचशेंचा चेक देऊन टाकला. आतां तो आणि त्याचं नशीब ! ”

“ बरं केलंस. बिचाऱ्यानं कांहीं अक्कल चालविली तर उपाशी तरी मरणार नाहीं. ”

माधवाच्या तोंडून सर्व हकीकत ऐकून सुधाकराला फार गंमत वाटली.

“ मग देवानं तुझं गाऱ्हाणं ऐकलं म्हणायचं ? तुझी यमू तुला मिळणार तर आतां ? ”

“ म्हणजे ? हें तूं काय म्हणतो आहेस, सुधाकर ? बापूसाहेब तिला स्वतंत्र करायला तयार असले म्हणून काय झालं ? ”

“ मग ! तीच तर मुख्य अडचण होती. ती अनायासें दूर झाल्यावर मोडता कोण घालणार ? आजकालचं जग बंधनाच्या पलीकडे जाऊं पहात आहे. बंधनाच्या पलीकडे जाण्याची हिंमत नसणारेहि बंधनाच्या पलीकडे जाणारांची फारशी निंदा करीत नाहींत. जग दिवसेंदिवस अधिकाधिक स्वातंत्र्याचा पल्ला

गांठीत आहे. तुमचं मीलन सुखकर होवो, असा मित्र या नात्यानं माझा तुला मनःपूर्वक आशीर्वाद आहे."

इतक्यांत हिरा चहा घेऊन आली.

"अरे वा! हिरू, आज जातीनंच चहा केलास वाटतं? मग आजचा चहा स्पेशलच असणार!" सुधाकर म्हणाला.

चहा वगैरे झाल्यावर माधव बाहेर पडला. आपण काय करावें, यापुढें कसें वागावें याचा त्याला निश्चय करतां येईना. आपण विचारांच्या चक्रांत कशामुळें सांपडलों, आपणाला एकच स्पष्ट असा मार्ग कां दिसत नाहीं, बापूसाहेबांविषयीं आपणाला द्वेष कां वाटूं लागला, यमूच्या भेटीची आपणांस आतुरता कां लागली, या सर्व प्रश्नांचें उत्तर माधवाला एकच दिसूं लागलें आणि तें म्हणजे विषयवासना! यमूचें आणि त्याचें बालपण त्याला आठवलें. त्यावेळीं आपण एकमेकांना इतकीं आवडत होतों, त्याचें कारणहि विषयवासनाच होतें काय? नाहीं, मुळींच नाहीं. लहानपणीं आमचें एकमेकांवरील प्रेम खरोखरच फार शुद्ध होतें. लहानपणींचीच मैत्री निर्व्याज असूं शकते. व्यवहाराची जाणीव झाल्यानंतर होणारी मैत्री तितकी निर्व्याज कशी असूं शकेल? कमीअधिक प्रमाणांत—पण स्वार्थ हा असायचाच! बालपणीं मी करूं शकत होतों तसें शुद्ध प्रेम मला या वयांतहि कां करतां येऊं नये? हें खरें आहे कीं, हें माझें सध्यांचें वयच मोठें घातुक आहे. तें मला पदोपदीं खालीं ओढण्याचाच प्रयत्न करीत रहाणार. माझें इष्ट ध्येय साध्य होणें अतिशयच कठीण आहे हें खरें असलें तरी मला तसा प्रयत्न केलाच पाहिजे. जगांत मला स्वार्थाशिवाय कांहींच दिसूं नये काय? आपल्या स्वतःच्या वासना पूर्ण करून घेण्याच्या मागें सर्व जग लागलेलेंच आहे. जगाच्या चालू ओघाच्या उलट मला माझ्या शिकस्तीच्या प्रयत्नानें कां जातां येऊं नये? व्यक्तीपेक्षां कुटुंब, कुटुंबापेक्षां समाज आणि समाजाहूनहि राष्ट्राचा दर्जा अधिक थोर आहे. मी स्वतःला माझ्या समाजाच्या कार्याला, माझ्या राष्ट्राच्या

कार्याला वाहून कां घेऊं नये ? माझ्यांत सामर्थ्य कमी असेल, लोकोत्तर कार्य मला करून दाखवितां येणार नाहीं, माझें नांव ज्याच्याल्याच्या जिव्हाग्रीं कदाचित् नाचणार नाहीं ! परंतु ज्या समाजाचे आपण एक घटक आहोंत, ज्या भूमातेच्या कोटयवधि अर्भकांपैकीं आपण एक अर्भक आहोंत, त्या समाजाचे, त्या भूमातेचे पांग आपण आपल्या सामर्थ्यानुसार फेडले एवढें तरी सात्विक समाधान मला लाभेल कीं नाहीं ? चार लोकांची सेवा करून त्यांना सुखी करणें हें, आपल्या स्वतःच्या लालसा तृप्त करून मिळणाऱ्या सुखापेक्षां अधिक श्रेष्ठ नाहीं काय ? यापुढें, फक्त स्वतःच्या सुखदुःखाचीच पर्वा करायची, अशी कोणत्याहि तरुणाची मनोवृत्ति असतां कामा नये. स्वतःच्या सुखाकडे सर्व जग पहातेंच आहे. सध्यां माझ्या समाजाला, माझ्या राष्ट्राला स्वार्थी माणसें नको असून स्वार्थत्यागी माणसें हवीं आहेत—अमीर नको असून फकीर हवे आहेत—विषयाचे सुखोपभोग घेत त्यांतच दिवसाची रात्र व रात्रीचे दिवस करण्यांत तारुण्याची सार्थकता समजणारे कामकीटक नको असून विषयसुखावर लाथ मारून समाजाला व राष्ट्राला स्वतःस अर्पण करणारे तेजस्वी तरुण पाहिजे आहेत. मला यापुढें यमू नको—हिरा नको—कोणीहि नको ! माझा समाज हाच माझा देव—माझें राष्ट्र हाच माझा परमेश्वर ! जगेन तर माझ्या समाजाची सेवा करण्याकरितांच जगेन—मरेन तर या माझ्या राष्ट्रमातेचे पांग फेडण्यासाठींच मरेन ! परमेश्वरा, माझें मन यापुढें तरी माझ्या ध्येयापासून च्युत होऊं देऊं नकोस, अशी माझी तुला प्रार्थना आहे.



## तोतया ? ?-- १४

माधवाचा निश्चय झाला खरा परंतु तो कायम टिकवून अंमलांत आणणें त्याला फारच कठीण वाटूं लागलें. शेवटीं त्यानें असें ठरविलें कीं, निदान समाजसेवा नि राष्ट्रसेवा हें आपलें ध्येय असावें. सर्वस्वीं नाहीं तर नाहीं पण निदान आपला कोणताहि विचार व आचार त्या ध्येयाच्या जवळ आपणास नेईल असाच असावा. अशी तपश्चर्या करीत असतांनाच आपल्या मनाची जरूर ती तयारी होईल !

आतां सर्वांच्या परीक्षा आटोपल्या होत्या. बरेच दिवस सुट्टी असल्यामुळें सर्वांनींच बापूसाहेबाकडे जावें असें ठरलें. परंतु सुधाकर जाण्यास कबूल होईना. अखेर माधव आणि हिरा या दोघांनींच बापूसाहेबाबरोबर जावें असें ठरलें.

"अग, ऐकलंस का ? त्या आपल्या बाबुरावाचं पत्र आलं आहे–" बाबासाहेब म्हणाले.

"असं का ? कशी आहेत सर्व मंडळी ?" माईसाहेबांनीं पृच्छा केली.

"सर्व कांहीं आनंदरूप आहे. परंतु त्याचं पत्र कांहीं नुसत्या खुशालीचंच नाहीं आहे ! त्यानं आपणां दोघांना अगदीं तांतडीनं नाशकास बोलावलं आहे. कोणतीहि सबब ऐकणार नाहीं म्हणतो–"

"मग काय ठरवायचं झालं इकडून ?"

" ठरवायचं काय आणखी निराळं ? त्या बाबुरावाशीं का कांहीं ,शहाणपण चालणार आहे ? आपण तिकडे आजच्या आज गेलों नाहीं तर उद्यां तो स्वतःच आपली उचलबांगडी करायला इथं यायचा–" बाबासाहेब म्हणाले.

" हो, पण मुलगी इकडे एकटीच कशी रहाणार ? तिला चुकल्याचुकल्या-सारखं नाहीं का होणार ?"

" नाहीं तरी तिला थोडीच आपली करमणूक आहे ? तिचीं पुस्तकं बरीं कीं ती बरी ! आणि शिवाय उद्यांच नाहीं का बापू मुंबईहून येणार आहे ? म्हणजे मग असे कितीसे तास तिला एकटीला काढावे लागणार आहेत ?"

" बापू उद्यां येणार म्हणून तर मला इथंच रहावंसं मनापासून वाटतं आहे," माईसाहेब म्हणाल्या.

" तुम्ही बायका म्हणजे अशाच. तुम्हांला निदान मुलांच्या गंमती तरी पहाव्याशा वाटायच्याच ! आमचं नाहीं बुवा असं. आपल्या वयाला शोभेल असं ज्यानं त्यानं वागावं ! दुसऱ्यांच्या गंमती–आपण काय पहायच्या त्या ?"

माईसाहेबांना बाबासाहेबांची नाडी बरोबर माहीत होती. इतकें वय झालें असलें तरी माईसाहेबांना बारीकसारीक गोष्टींतसुद्धां बाबासाहेबांची मर्जी मोड-ण्याची छाती होत नसे. त्या म्हणाल्या, " बरं बाई राहिलं ! केव्हां जायला निघायचं ?"

" बांधाबांधीलाच लागलं पाहिजे आतां. दोनच तास उरले गाडीला. चटकन् एकदां चहाचं उरकून टाक पाहूं !"

" आतांची वेळ बाईनाच करायला सांगितला तर चालेल ना ? नाहीं तर बांधाबांधी व्हायची नाहीं–गाडी चुकेल–बाबुराव रागावतील–मग आपण रागवायचं होईल नि सगळा घोंटाळा होऊन रडत बसण्याची वेळ माझ्यावर येईल !"

" हं–हं–चल–बाईना सांग," बाबासाहेब घाई करूं लागले. " आटोपा आतां एकेक चट्‌चट्–"

" पण अजून दोन तास आहेत ना ? मग इतकी काय गर्दी ?

" दोन तासांतले किती तरी सेकंद निघून गेले सुद्धां ! बाकीचे तसेच जायचे—हंसतेस काय ? सेकंदांचींच मिनिटें होतात नि मिनिटांचेच तास होतात ! हंस तूं आपली—"

" रागवायला नको—जातें मी ! "

इकडे बाबासाहेब आपल्या परीनें आपली तयारी करूं लागले, तिकडे माई-साहेब आपल्या परीनें दोघांचीहि तयारी करूं लागल्या. चहा वगैरे होतो तों गाडी तयार होतीच. गाडींत बसतांना माईसाहेबांना वैजयंतीची आठवण झाली. त्या पुनः घरांत चालल्या. बाबासाहेब म्हणाले, " आतां आणखी काय राहिलं ? तुम्हां बायकांना बरोबर न्यायचं म्हणजे चोवीस तास अगोदर तयारी करायला पाहिजे. "

" बाईना सांगून ठेवतें वैजयंती शाळेंतून आल्यावर तिला काय सांगायचं तें ! नाहीं तर तिला काय वाटेल ? "

" काय वाटायचं आहे ? हं—जा—जा, आणखी इथंच वेळ मोडूं नकोस ! "

बाईना काय सांगायचं तें सांगून माईसाहेब दोनचार मिनिटांतच परत आल्या. गाडी सुरू झाली.

" तरी एकंदरींत इतर बायकांच्या मानानं तूं बरीच चलाख आहेस म्हणायची ! "

" इतर बायकांच्या चलाखपणाचा आपण कधीं अनुभव घेतला ? "

" चल ! पुरे कर ना आतां हा तुझा फाजीलपणा ! आतां आपलीं वयं किती ? आपली वागणूक आतां किती गंभीर पाहिजे ! "

" याच वयाची गोष्ट कशाला ? मी मुळीं पहिल्यापासूनच गंभीर आहें. पण मी आपल्यासमोर एकदोन मिनिटेंहि एकटी असलें तरी आपली लगेच चालवा-

कालव सुरू होते म्हणून बरं आहे–नि म्हणे आपली वागणूक किती गंभीर पाहिजे ! "

" अग, म्हणजे तसा आपला प्रयत्न करायचा ! शरीर म्हातारं झालं म्हणून मन कां कधीं म्हातारं होत असतं ? केलींसंवरलेलीं माणसं आपण–"

" मला कशाला आणखी त्यांत गोंवायचं ? "

" दुसर गोंवायला मला कोणी नाहीं म्हणून ! "

" बाकी आपल्या मानान हल्लींचीं मुलं कितीतरी संयमी ! "

" संयमी कसलीं आलीं आहेत कपाळाचीं ? जाऊं या झालं–बोललों म्हणजे उगाच माझं तोंड दिसेल ! कोळसा उगाळावा तितका काळाच ! संयमन करतात आपल्या बोडक्याचं ! जाऊं दे–तो विषयच नको ! माझ्या जिभेला नाहीं हाड–मी काय बोलेन नि काय नाहीं–माझं मलाच भान रहायचं नाहीं ! हीं झाडं बघ किती छान दिसताहेत तीं–"

" छान विषय बदलायचा झाला ! त्या बाबुरावांनी तरी मी म्हणतें एकदोन दिवस अगोदर कां नाहीं कळविलं ? "

" अग, तो पहिल्यापासूनच तसा ! त्याचं कोणतंहि काम नि कधीं वेळेवर झालं आहे ? पण एक मात्र. मनुष्य अतिशय प्रेमळ. स्नेही म्हटला म्हणजे त्याच्यासाठीं जळत्या घरांत सुद्धां उडी टाकायला मागंपुढं पहायचा नाहीं ! "

" लागलोंच आपण स्टेशनच्या रस्त्याला–" माईसाहेब म्हणाल्या.

" होय कीं–" बाबासाहेबांनीं होकार दिला.

शाळा सुटल्यावर वैजयंती घरीं आली. बाबासाहेब व माईसाहेब नाशीकला गेल्याची हकिकत तिला बाईकडून समजली. तीं दोघें इतक्या तांतडीनें निघून गेलीं याचें वैजयंतीला आश्चर्य वाटलें. फराळ वगैरे करून ती नेहेमींप्रमाणें फिरावयास गेली.

वैजयंती फिरून परत येते तोंच दाराशीं एक मोटार येऊन उभी राहिली. वैजयंती तशीच घरांत निघून गेली व कोण पाहुणे आले आहेत म्हणून खिड-कींतून पाहूं लागली. त्या वेळीं काळोख पडला असल्यानें व म्युनिसिपालिटीच्या दिव्याचा उजेडहि इतक्या लांबून मनुष्याची ओळख पटण्याइतका झगझगीत नसल्यानें वैजयंतीला, कोणी तरी दोघे पुरुष व एक स्त्री इतकी मंडळी मोटारीं-तून उतरली, इतकेंच समजलें. कोणी कां असेनात, आतां आपल्याला अगदीं एकटें एकटें तरी वाटणार नाहीं याचेंच तिला बरें वाटलें.

आलेली मंडळी उतरली ती तडक दिवाणखान्यांत गेली. पैकीं बापूसाहेबांना तर वैजयंतीनें लगेच ओळखलेंच. तीं दुसरीं दोन माणसें मात्र तिला अपरि-चयाचीं वाटलीं.

" हं हिराताई, आतां चहा होईपर्यंत घ्या जरा विश्रांति—" बापूसाहेब म्हणाले. " प्रवासाचा त्रास झाला आहे—चहा घेईपर्यंत बरं नाहीं वाटणार ! तुम्हांला तर काय माधवराव, चहा मुळीं चालतच नाहीं ! मला वाटतं गाडींत कमींत कमी चार वेळां—चारच वेळां ना ? " तिघेंहि मनापासून हंसलीं.

' माधवराव ' हे शब्द कानीं पडतांच वैजयंती त्या दुसऱ्या गृहस्थाकडे अगदीं निरखून पाहूं लागली. त्या गृहस्थाचा चेहेरा तिला समोरून दिसत नव्हता. त्याची कांहीं हालचाल झाली म्हणजे मात्र कांहीं क्षण तो नीट दिसत असे. असें एकदानिदां झाल्यावर तिची पक्की खात्री झाली कीं, तो गृहस्थ म्हणजे दुसरातिसरा कोणी नसून माधवच आहे—आपलाच माधव आहे ! या बिचा-ऱ्याला कल्पना तरी असेल का कीं, त्याची यमू याच घरांत त्याच्यासाठीं तळम-ळत पडलेली आहे ? कशी असणार ? बापूसाहेबांची नि त्याची मुंबईला ओळख झाली असेल, बापूसाहेब त्याला सहज आपल्याबरोबर घेऊन आले असतील ! बापूसाहेबांना तरी काय कल्पना असणार कीं, माझा माधव तो हाच म्हणून ? पण ती मुलगी कोण असावी ? तीहि बापूसाहेबांची कोणी मैत्रीण का माझ्या

माधवाची...? माधवाचं लग्न तर झालं नसेल ना ? अरेरे ! देवा, माझ्या माधवाचं लग्न झालं असेल तर आटोपलाच सारा कारभार ! आपल्या यमूचा माधवाला शेवटीं विसर पडलाच ना ? माधव—माधव—काय केलंस हें ? विवाहाच्या कृत्रिम बंधनानं मी जखडून गेलें असतांनाहि तुला मी विसरलें नाहीं—आणि तूं—तुझ्यावर असला कोणताहि प्रसंग आलेला नसतांना—या तुझ्या यमूचा तुला विसर पडला ? तुझी नि माझी शेवटची भेट बोरीबंदर स्टेशनवर झाली—त्यानंतर तूं मला आज दिसतो आहेस ! गाडीच्या खिडकीबाहेर पडलेलीं माझीं बोटं तूं आपल्या हातांत धरलींस, त्याच क्षणीं तूं माझा झालास नि मी तुझी झालें ! या सर्व सुखकर अनुभवाचं तुला विस्मरण झालं ना ? तुझी मुद्रा तर पूर्ण आनंदी दिसते आहे. तूं अगदीं सुखी आहेस तर ? अस—माधव, तूं सुखी असणं—तुला सुखांत पहाणं याहून अधिक आनंदाची अशी मला गोष्टच नाहीं ! कारण तूं माझा माधव आहेस व मी तुझी यमू आहें. कोठेंहि अस—कसाहि अस—तुला इतर कोणीहि आपला असें समजो—मी मरेपर्यंत असंच समजणार कीं, तूं माझा आहेस व मी तुझी आहें. या वेळचा तुझा आनंदी चेहेरा पाहून मी माझं इतक्या वर्षांचं दुःख पार विसरून गेलें आहे.

"वैजयंती—"

वैजयंती आपल्याच विचारांत गर्क असल्यामुळें तिला बापूसाहेबाची हांक ऐकूं गेली नाहीं.

"वैजयंती— वैजयंती—या पाहुण्यांना तूं ओळखलंस का ?"

वैजयंती स्तब्धच होती.

"पण हा काय प्रश्न मी वेड्यासारखा विचारतों आहें ? सारा जन्म ज्याची मूर्ति हृदयांत वास करीत असते, त्या देवाचं प्रत्यक्ष दर्शन घडल्यानंतर भक्ताला त्याची ओळख पटल्याशिवाय कशी राहील ?"

"म्हणजे तुम्हांला माहीत आहे हा कोण तें ?"

" होय. हा तुझा माधव आहे—हा यमूचा माधव आहे—एवढंच नव्हे तर हा वैजयंतीचा माधव आहे. अशी आश्चर्यानं माझ्याकडे पाहूं नकोस. तुला वाटतों तितक्या क्रूर वृत्तीचा पशु नाहीं मी ! मला सुद्धां हृदय आहे आणि मोठ्या अभिमानाची गोष्ट आहे कीं, तें माणसाचं हृदय आहे—माणुसकीला पारखा न झालेल्या एका माणसाचं हृदय आहे. "

" मला तुमच्या बोलण्यांतील गूढ अर्थ समजत नाहीं. तुमचं काय म्हणणं असेल तें स्पष्ट शब्दांत सांगूं शकाल काय ? "

" मला तुला सर्व कांहीं स्पष्ट शब्दांत—असंदिग्ध भाषेंत—कांहींहि आडपडदा न ठेवतां—सांगण्याची इच्छा असल्यामुळेंच मी तुला तुझ्या पत्राचं उत्तर पाठविलं नाहीं. तुला खरं वाटो कीं न वाटो, पण परमेश्वरसाक्ष मी तुला सांगतों कीं, तुला ज्यामुळें आनंद होणार आहे अशी कोणतीहि गोष्ट करण्यांत मला माझ्या जीविताची सार्थकताच वाटेल. बरं, पण तिकडे तीं एकटींच बसलीं आहेत; आपण इकडेच बोलत बसलों तर त्यांना चमत्कारिक नाहीं का वाटणार ? "

" माधवच्या बरोबर आलेली तरुण मुलगी कोण, मला समजेल का ? "

" तिचं नांव हिरा. माधव आणि ती एकमेकांशीं विवाहाच्या वचनानं बद्ध झालीं आहेत, असं मला माधवराव सांगत होते. "

" विवाहाच्या वचनानं बद्ध झालीं आहेत ? खास—कोणा तरी दुष्ट माणसानं माझ्यासंबंधींची कांहीं तरी खोटी अनिष्ट वार्ता माधवाच्या कानावर घातली असली पाहिजे ! नाहींतर त्याच्या हातून असला अधमपणा होणंच शक्य नव्हतं ! तुम्हीच नाहीं ना हें पुण्य संपादन केलंत ? "

" मला वाटतं असले प्रश्न मला विचारून माझ्या काळजाला घरे पाडण्यापेक्षां प्रत्यक्ष माधवरावांनाच त्यांच्या कृत्याचा जाब विचारणं अधिक श्रेयस्कर ठरणार आहे. तें तूर्त राहूं दें ! चहा घ्यायला येणार ना आमच्या बरोबर ? "

"हो येणार—नव्हे—मला आलेंच पाहिजे! मी माझ्या मूर्खपणामुळें या घटके-पर्यंत दगडालाच देव मानीत होतें कीं काय याची शहानिशा मला करून घेतलीच पाहिजे."

"मग चहा तूंच घेऊन ये म्हणजे झालं—" असें म्हणून बापूसाहेब पुनः बाहेर येऊन बसला.

यमूच्या डोक्यांत विचारांचें काहूर उसळलें. माधवाची आणि बापूसाहेबांची गांठ पडण्यापूर्वींच तो हिरेशीं प्रीतीनें बद्ध झाला असेल तर त्यांत यांचा कांहींच दोष नाहीं. इतक्या दिवसांत माधवाची नि सुदाम्याची भेटच झाली नसेल का? का सुदाम्याच्या तोंडून सर्व हकिकत समजल्यावर माधवाला माझा राग आला व माझ्या नाकावर टिचविण्यासाठीं ही चटकचांदणी त्यानें मला दाखविण्यास आणिली? हा माधव हाच यमूचा माधव हें कळूनसंवरून बापूसाहेब त्याला इकडे घेऊन करो आले? मी ज्याला राजा मानला तो राजा नसून गळेकापू दरवडेखोर आहे हें यांना मला दाखवा-वयाचें होतें कीं काय? बापूसाहेबांनीं मामंजींची व सासूबाईंची चौकशी कशी केली नाहीं? त्या दोघांना इतक्या तांतडीनें आजच बाहेरगांवीं जावें लागलें व तीं गेल्यानंतर थोड्याच तासांत या दोघांना घेऊन बापूसाहेब येथें दाखल झाले—या दोन घटनांचा कांहीं अन्योन्य संबंध तर नाहीं ना? तिला कोठल्याच गोष्टीचा आपल्या मनाशीं उलगडा होईना. एक गोष्ट मात्र तिला स्पष्टपणें कळून चुकली. ती ही कीं, सवतीची खरी किंवा खोटी कल्पनासुद्धां स्त्रीला अत्यंत कष्टदायक होते. माधवावर आपलें निर्व्याज व निरपेक्ष प्रेम आहे ना? म्हणजे त्याच्याकडून आपणाला कसलीहि अपेक्षा नाहीं ना? मग आपण पाहिजे तर त्याच्यावर प्रेम करीत बसावें, तो का आपल्यावरच प्रेम करायला बांधलेला आहे? पण मी त्याची व फक्त मीच त्याची, हे त्याचेच शब्द होते ना? मग त्याला आपल्या वचनाचें विस्मरण कसें झालें? खात्रीनें कोणी तरी आपल्या

विषारी दांतांनीं त्याच्या कानाला कडकडून दंश केला असला पाहिजे. होईलच आतां सर्व उलगडा हळुहळूं! आपल्या मेंदूला कितीहि शाण दिला तरी वस्तु-स्थितीचें यथार्थ ज्ञान आपणाला थोडेंच होणार आहे? ती हिरी माधवाबरोबर नसती तर त्याच्या नुसत्या दर्शनानें प्रत्यक्ष स्वर्ग आपल्या हातीं आल्याइतका मला आनंद झाला असता. परंतु या विषारी हिरकणीनें माझें काळीज चरचरां चिरून टाकलें!!

तिनें कसा तरी टेबलावर चहा नेऊन ठेवला! तिचें बापूसाहेबांकडे तर लक्ष नव्हतेंच पण माधवाकडेहि नव्हतें! तिचें लक्ष फक्त हिरेकडे होतें. वैजयंतीच्या नजरेशीं नजर भिडतांच एखादी संतापलेली नागीण आपल्याकडे रोखून पहात असल्याचा हिरेला भास झाला. माधवानें वैजयंतीकडे पाहिल्याबरोबर आपल्या रोमरोमांतून वीज संचारल्याचा त्याला भास झाला. त्यानें पूर्वी पाहिलेल्या यमूंत आणि या वेळीं त्याला दिसत असलेल्या वैजयंतींत जमीनअस्मानाचा फरक होता! कुठें ती त्या वेळची मुग्ध कलिका आणि कुठें हें आतांचें टवटवीत फूल? पांकळयाच्या पकडीनें सुप्तावस्थेंत असलेले कलिकेचे सर्व देहधर्म पाक-ळयांच्या परिस्फोटाबरोबर फुलांत प्रगट झालेले! वैजयंतीकडे त्याला स्थिर नजरेनें पहावेना. आपल्या मनाचा तो आंतल्याआंत सारखा धि:कार करूं लागला. सुंदर पुष्प पाहिल्यावर त्याच्या नुसत्या दर्शनानें आपणांला आपल्या मनाचें समाधान करतां येऊं नये ना? आपणांस त्या फुलाच्या सुवासाचा आस्वाद घेतां यावा या इच्छेचें संयमन करणें आपल्या शक्तीच्या बाहेरचें असावें ना?

सर्वांनीं चहा घेण्यास सुरुवात केली. त्या चौघांपैकीं एकाचेंहि लक्ष चहाकडे नव्हतें. त्यांपैकीं एकालाहि एखादा शब्द बोलण्याची स्फूर्ति होईना. त्यांपैकीं एकहि व्यक्ति आनंदी नव्हती. सर्वांचे आपापल्या परीनें विचार चालू होते. एकाच्याहि मनांत आशादायक व सुखकर असा विचार येत नव्हता. त्या चौघांपैकीं सर्वांत बिकट परिस्थिति कोणाची झाली असेल तर ती माधवाची. कारण

त्याच्या मेंदूला सर्वांपेक्षां अधिक ताण बसत होता. बापूसाहेब माधव व वैजयंती या दोघांसंबंधानें विचार करीत होता, वैजयंती माधव आणि हिरा यांच्याबद्दल आपल्या मनाशीं मेळ बसवीत होती, हिरा माधव नि यमू यांचे परस्पर संबंध न्याहाळून त्यावरून आपले कयास बांधीत होती पण माधव मात्र बापूसाहेब, यमू आणि हिरा या तिघांबद्दलहि विचार करीत होता.

कोणीच बोलेना त्यामुळें सर्वांनाच चुकल्याचुकल्यासारखें होऊन गेलें. बोलायला सुरुवात कोणी व कशी करायची हाहि एक प्रश्नच होता. अखेर हिरेनें सुरुवात केली.

" बापूसाहेब, किती सुंदर आहे तुमची बाग ? तुम्हांला स्वतःलाच इतकी आवड आहे का फुलांची ? "

" म्हणजे ? हा काय प्रश्न विचारलात तुम्ही ? " बापूसाहेबानें विचारलें. " फुलांची आवड नसते कोणाला ? "

" आवड सर्वांना असते. पण कमीअधिक प्रमाण असतंच कीं नाहीं ? तुम्हां डॉक्टर लोकांचीं मनं चीरफाड करून झालेलीं असतात कितीतरी–"

" एक तर मी अजून डॉक्टर झालेलों नाहीं ! आणि निदान माझं मन प्रेतांच्या चीरफाडीनं अजून तरी मेलेलं नाहीं ! मला अजूनहि पूर्वीइतकींच फुलं आवडतात. कां माधवराव, एवढ्याशा प्रवासाचा तुम्हांला बराच त्रास झाल्यासारखा दिसतो, मोठं आश्चर्य आहे–"

बोलाचालीला एकदांची सुरुवात झाली यामुळें माधवाला जरा बरें वाटलें. आपल्या हृदयावरील भार बराच कमी झाल्यासारखें त्याला वाटूं लागलें.

" कोण म्हणतं मला प्रवासाचा त्रास झाला म्हणून ?"

" मग तुम्ही एक शब्दहि बोलत नाहीं ते ? " बापूसाहेब म्हणाला.

" मघांशीं चहा घेत होतों म्हणून बोलायला सवड नव्हती. चहा सपल्यावर तुम्हां दोघांचं बोलणं चाललं होतं. दोघांच्या संभाषणांत तिसऱ्यानं तोंड खुपसणं बाजवी नाहीं म्हणून स्वस्थं बसणं भाग पडलं. संधि मिळाल्याबरोबर हा बोलतोंच आहें–" माधव म्हणाला.

त्यांच्या संभाषणांत भाग घेण्याची वैजयंतीला संधि येईना आणि तिची तशी इच्छाहि नव्हती. कपबश्या आंत नेऊन ठेवण्याच्या निमित्तानें ती आंत गेली ती गेलीच. ती बाहेर येण्याचें चिन्ह दिसेना. तेव्हां हिरेनें चलाखी करून वैजयंतीची खोली गांठली. वैजयंती खिडकीशीं डोकें धरून उभी होती. हिरेला आयताच बोलायला विषय मिळाला.

" कां ? वैजयंतीताई, कपाळ दुखतं आहे वाटतं ? कांहीं सुंठ वगैरे उगाळून देऊं का ? का बाम चोळूं ? "

हिरेला अनपेक्षितपणें आलेली पाहून वैजयंती थोडीशी गोंधळली. तिला हिरेचा रागहि आला. परंतु हिरेच्या भाषेंत व आवाजांत अशीच कांहीं माधुरी होती कीं, तिचे दोन शब्द कानीं पडल्यावर कोणाचाहि तिच्याबद्दल अनुकूल ग्रहच होत असे.

" नाहीं–कपाळ दुखत नाहीं आहे कांहीं माझं –उगीच आपली खिडकीशीं बाहेरची गंमत पहात उभी होतें– "

" मग बाहेरच कां नाहीं येऊन बसलांत ? घरांत कोणी वडीलधारीं माणसंहि दिसत नाहींत संकोच वाटतो म्हणावं तर ! "

" वडीलधारीं माणसं असतीं तरीसुद्धां संकोच बाळगण्याचं कांहीं कारण पडलं नसतं. परंतु मला तिथल्यापेक्षां इथंच अधिक मोकळं वाटत असल्यामुळं मी इकडे आल्यें. बसा ना–उभ्या किती वेळ रहाल ? "

" बसा म्हणतांच तर बसतें बापडी. पण मला आपलं नेहेमीं चार माणसांत बसायला आवडतं, " असं म्हणून हिरा जाजमावर बसली. वैजयंतीहि बसली.

" वैजयंतीताई, मी तुम्हांला साता जन्मींची वैरीण वाटत असेन, नाहीं ? "

एकदम असा स्पष्ट प्रश्न विचारलेला पाहून वैजयंतीला आश्चर्य वाटलें. या प्रश्नाला उत्तर काय द्यावें हेंच तिला सुचेना.

" परमेश्वरी योगायोगाचा कोणालाहि अंत लागत नाहीं म्हणतात तें असं ! " हिरा पुढें बोलूं लागली. " ही तुमची सर्व हकिकत जर माधवरावांना समजली त्याच्यापूर्वी कांहीं दिवस समजली असती तर सर्वांचाच त्यांत फायदा झाला असता. पण तसं झालं असतं तर देवाला आणि दैवाला आपली करमणूक कशी करून घेतां आली असती ? "

" कशाला उगाच ते पूर्वींचे विषय आतां उगाळून काढायचे ? झाल्या गोष्टी होऊन गेल्या. माझ्या नशिबांतच जर देवानं सुख लिहिलं नसेल तर मला तें मिळणार तरी कसं ? "

" असं तर खरंच—" हिरा म्हणाली. " पण वैजयंतीताई, मला तुम्हाला एक असा प्रश्न विचारावासा वाटतो कीं, तुम्ही आपल्या दैवाला दूषण लावतां, तें आम्ही सारीं माणसं अत्यंत भाग्यवान आहोंत अशा समजुतीनंच ना ? या तुमच्या गैरसमजुतीचं मी आतांच निराकरण करतें. बापूसाहेब सुखी नाहींत हें तर तुम्हांला माहीतच आहे. तुमची प्राप्ति झाली नाहीं म्हणून माधव सुखी नाहीं—मला माधवाची प्राप्ति झाल्यासारखी असली तरी मी सुखाच्या शिखरावर विराजमान झालें असेन अशी तुमची कल्पना असेल तर तीहि चुकीचीच आहे. कारण मला माधव प्रिय वाटत असला तरी माधवाला मात्र तुम्हीच प्रिय वाटतां हें जर मी प्रत्यक्ष पहातें आहें तर मला तरी सुख लागणं शक्य आहे का ?

तातया ! !—

तुमचा बापूसाहेबांशीं विवाह झाल्यानंतर सुद्धां माधवावर मी किंवा माझ्यावर माधवानं प्रेम केलेलं तुम्हाला खपत नाहीं, मग तुमच्यासारख्या विवाहित स्त्रीवर आपल्या प्रियकराचं प्रेम असलेलं पाहून मला काय बरं वाटत असेल ! "

" काय म्हणतां हिराताई तुम्ही ? माधवाचं—माझ्या माधवाचं—या यमूच्या माधवाचं—माझ्यावर अजूनहि पूर्वीइतकंच प्रेम आहे ? अहाहा ! परमेश्वरा, उगाच मी इतका वेळ तुला दूषण दिलं ! माझ्यासारखी भाग्यवती मीच. माझा माधव माझ्यावर पूर्वीइतकंच प्रेम करतो हे अमृतासारखे गोड शब्द तुम्ही मला ऐकवलेत—जा—हिराताई, तुमची प्रत्येक इच्छा परमेश्वर पूर्ण करील ! हिराताई, माझा आशीर्वाद विफल होणार नाहीं. किती—किती आनंद होतो आहे मला ! माझा माधव—या यमूचा माधव—या वैजयंतीचा माधव—माझ्यावर अजून प्रेम करतो ? माधव—माधव—छे: ! मला वेड तर नाहीं ना लागणार ? माधव—माधव—"

" कशाला हांक मारलीस मला, यमू ? हा पहा तुझा माधवच तुझ्यासमोर उभा आहे. यमू, अशी काय नजर झाली तुझी ? या तुझ्या माधवाला तूं ओळखलं नाहींस का ? यमू, बघ ना नीट माझ्याकडे ! "

" कोण रे तूं ? तूं माझा माधव ? तूं या यमूचा माधव ? छे:, मुळींच नाहीं ! तूं मला फसवतो आहेस—तूं मला खोटीं भुरळ घालतो आहेस ! तूं माधव असशील कदाचित्—पण तूं माझा माधव नाहींस—तूं यमूचा माधव नाहींस ! तूं माधव असलासच तर या हिराताईचा माधव असशील ! माझा माधव होता—त्याला मी अखेरचा बोरीबंदरवर पाहिला—त्यानंतर तो मला पुन: दिसला नाहीं—त्यानंहि मला पाहिलं नाहीं ! "

" असं काय एखाद्या भ्रम झालेल्या माणसासारखं तूं बोलते आहेस, यमू ? तूंच माझी यमू आणि मीच तुझा माधव ! बोरीबंदरवर तुला अखेरचा म्हणून भेटला तो माधव मीच ! "

" खोटं बोलतोस तूं ! तूं तोतया माधव आहेस. तूं माझा माधव नाहींस. तो पहा माझा माधव—तो पहा माझा माधव—"

वैजयंती धाडकन् खालीं पडली. हिरा घाबरली. बापूसाहेबांना बोलावण्याकरितां ती धांवतच बाहेर आली. माधवानें वैजयंतीचें डोकें आपल्या मांडीवर घेतलें व तिला हळुहळूं वारा घालून शुद्धीवर आणण्याचा तो प्रयत्न करूं लागला.



## १५

तें दृश्यच इतकें भयंकर व केंविलवाणें होतें कीं, बापूसाहेबांना काय सांगावें हेंच हिरेला सुचेना. वैजयंतीच्या तोंडचे-' तूं माधव असशील कदाचित् पण माझा-या यमूचा-माधव मात्र खास नाहींस, तूं माधव असलासच तर या हिराताईचा आहेस, ' हे माधवाला उद्देशून बोललेले शब्द हिरेच्या काळजाचें पाणी करीत होते. वैजयंती हे शब्द बोलत असतांना तिची अशी कांहीं चमत्कारिक भावना दिसत होती कीं, त्या भावनेमुळें माधवावरील तिचें गाढ प्रेम स्पष्टपणें व्यक्त होत होतें. घडलेली हकिकत हिरेनें कशीबशी बापूसाहेबांना कळविली. बापूसाहेबाच्या डोळयांत पाणी आलें.

" हिराताई, या प्रसंगाची मला थोडीशी कल्पना होतीच. झालं हें एका दृष्टीनं बरं झालं. वैजयंतीची आणि माधवाची प्रत्यक्ष भेट झाल्यामुळें दोघांनाहि आपापलं हृदय आतां उघड करून दाखवितां येईल. आपण या वेळीं तिकडे न जाणंच श्रेयस्कर ठरणार आहे. चला-आपण जरा वेळ बागेंतच जाऊन बसूं- " असें म्हणून बापूसाहेब उठला सुद्धां.

वैजयंतीचें डोकें मांडीवर घेतल्यापासून माधवाच्या मनाची पुनः चलबिचल होऊं लागली. जिचें आपल्यावर इतकें प्रेम, ती समाजाच्या दृष्टीनें दुसऱ्याची झालेली ! बापूसाहेबांची वृत्ति दिलदार म्हणूनच आम्हांला एकमेकांची भेट तरी घेतां आली. त्यांच्या ठिकाणीं दुसरा एखादा अंतःकरणशून्य मनुष्य असता तर

आमची अशी भेट होणें तर दूरच, पण त्यानें यमूला छळून छळून ठारहि मारलें असतें ! हे विचार मनांत चालू असतांना यमूला शुद्धीवर आणण्याचे त्याचे उपाय सुरू होतेच. कांहीं वेळानें तिनें डोळे उघडले. माधवाचा चेहेरा दिसल्या-बरोबर ती झटकन् उठली. तिला पुनः वाताचा झटका आला असावा अशी माधवाला भीति वाटली व तो तिला सांवरण्यासाठीं तिच्याजवळ गेला.

" यमू, मन जरा स्थिर कर. त्या कॉटवर पडून जरा विश्रांति घे पाहूं. इतक्या वर्षानीं कां होईना, पण तुझा माधव तुला पुनः भेटला ना ? "

" भेटला–भेटला–खरोखरच माझा माधव मला पुनः भेटला ! ये, माधव–ये, अगदीं माझ्याजवळ ये. मला आपल्या बाहुपाशांत अशी प्रेमानं कवटाळून धर कीं, प्रत्यक्ष यमालाहि आपल्या कालपाशांनीं तुझी मिठी सोडवितां येऊं नये ! ये, माधव, ये ! माझ्यापासून असा दूर कां उभा रहातोस ? मी बापूसाहेबांच्या गळयांत माळ घातली म्हणून ? वेडा रे वेडा ! माधव, अजून तूं पूर्वी-सारखाच वेडा कसा रे राहिलास ? लहानपणीं मी तुझ्यावर रागावलें म्हणजे नव्हतें का मी तुझी गट्टी फू करीत ? अगदीं त्यांतलाच हा माझ्या लग्नाचा प्रकार ! काकांनीं मला बापूसाहेबांच्या गळयांत माळ घालायला लावलं ! बापू-साहेबांच्याच काय, पण एखाद्या प्रेताच्या गळयांत सुद्धां मी माळ घातली असती ! कारण माळ घातल्यानंतर पुढं कसं वागायचं हें मी अगोदरच ठरवून टाकलं होतं ! समाजाच्या कोत्या दृष्टीला माझं लग्न बापूसाहेबांशीं झाल्यासारखं वाटत असलं तरी माझं लग्न परमेश्वराच्या साक्षीनं तुझ्याशींच लागलेलं आहे. परमेश्वरापेक्षां का समाज मोठा आहे ? माधव, मी पूर्वी तुझी होतें, बापूसाहेबांना माळ घातली असली तरी आतांहि तुझीच आहें आणि पुढेंहि फक्त तुझी आणि तुझीच रहाणार ! मी लग्न झालेली सौभाग्यवती नसून लग्न झालेली कुमारिका आहें. बापूसाहेब माझे पति नाहींत व ही यमू त्यांची पत्नी नाहीं. ही यमू अजूनहि परमेश्वरसाक्ष कुमारिकाच आहे–तिच्या माधवासाठीं ती अजून कुमा-

रिकाच राहिली आहे. तेव्हां माधव, कसलीहि शंका मनांत आणूं नकोस. ये, अगदीं माझ्याजवळ ये—"

" आलों—आलोंच— यमू, हा पहा तुझा माधव तुला आपल्या बाहुपाशांत—"

" हां—थांब—माझ्या शरिराला स्पर्श करूं नकोस. मी माझ्या माधवाला हांक मारली—मी यमूच्या माधवाचा धांवा केला—मी बोललें ती यमूच्या परमेश्वराला उद्देशून बोललें. मला माझा माधव पाहिजे—मला यमूचा माधव पाहिजे—"

" म्हणजे ? मग मी कोण आहें यमू ? "

" तूं ? तूं विषयाच्या कर्दमांतला एक किळसवाणा किडा ! "

" कसाहि असलों तरी यमू, मी माधवच आहें, यमूचाच माधव आहें. तुझं बापूसाहेबांशीं लग्न झाल्यानंतरहि तूं ज्याप्रमाणं पूर्वीइतकीच पवित्र आहेस त्याचप्रमाणं मी सुद्धां, माझं मन कांहीं प्रसंगीं चळलं असलं तरी या घटकेपर्यंत माझं पावित्र्य—माझं शारीरिक पावित्र्य—मी बिघडविलेलं नाहीं ! यमू तिच्या माधवासाठीं अजूनपर्यंत पवित्र राहिली आहे ही गोष्ट जितकी सत्य आहे, तितकीच, हा माधव त्याच्या यमूसाठीं आतांपर्यंत पवित्र राहिला आहे ही गोष्टहि सत्य आहे. लहानपणीं तूं माझ्यावर एवढ्यातेवढ्याशा कारणावरून फुरगटत असस, पण मी मात्र तुझ्यावर कधींहि रागावलेलों नाहीं. आतांहि तूं मला 'विषयाच्या कर्दमांतला किळसवाणा किडा' ठरवलंस तरी तुझा मला राग आलेला नाहीं. मला तुझ्यावर आजपर्यंत कधीं रागावतां आलं नाहीं व पुढेंहि कधीं येणार नाहीं. कारण तूं यमू आहेस—माझी यमू आहेस ! "

" खोटं बोलतोस तूं ! ही यमू माधवाची आहे पण तुझी नाहीं. ही यमू यमूच्या माधवाची आहे हिरेच्या माधवाची नाहीं ! "

" यमू, तुला संशयपिशाचानं झपाटल्यामुळं तुला सरळ गोष्टीहि दिसेनाशा झाल्या आहेत. कोणी सांगितलं तुला मी हिरेचा माधव आहें म्हणून ? माझ्या

स्वतःच्या सांगण्यापेक्षां इतरांच्या सांगण्यावर तुझा जास्त विश्वास बसतो याचं कारण एवढंच कीं, तुझी विवेकशक्ति तुला सोडून गेली आहे. हिरा आणि मी प्रीतिविवाहाच्या वचनानं बद्ध झालों असल्याचं तुला खोटंच सांगण्याचं आम्ही ठरवूनच आलों होतों. या सर्व प्रकारांत शेवटीं माझीच फजिती झाली. बापूसाहेब व हिरा यांचाच तर्क शेवटीं खरा ठरला! स्त्रियांच्या स्वभावधर्माप्रमाणं तुझ्या मत्सरानं पेट घेतलाच!"

"माधव, वेड्या, मग मला असं पहिल्यानंच कां सांगितलं नाहींस? मी अजूनहि अल्लडच आहें हो! मला काय बरं माहीत कीं, तुम्ही सगळीं जणं माझी गंमत करीत आहां म्हणून? माधव, तूं मला माझ्या मूर्खपणाबद्दल क्षमा नाहीं का करणार? किती वेडी मी? माझा माधव एकदां माझा असा झाल्यावर त्याला निराळं अस्तित्वच रहात नाहीं, मग तो दुसऱ्याचा होणार कसा? एवढं साधं सत्यहि मी कशी विसरलें? किती आततायी आणि विचारशून्य मी! पण माधव, या माझ्या गोंधळाला कारण मात्र माझं तुझ्यावरील प्रेमच हो! माधव, आतां मात्र माझ्यानं धीर निघत नाहीं. माझं चिरवांछित आलिंगन मला दे आणि प्रत्यक्ष कृतीनंच माझी खात्री करून दे कीं, तूं माझाच आहेस आणि मीच तुझी आहें!"

"नाहीं. यमू, तूं माझी आहेस नि मी तुझा आहें ही गोष्ट खरी असली तरी मी तुला स्पर्शहि करणार नाहीं. आपण स्पर्शसुखाचा अनुभव घेणं म्हणजे आपलं एकमेकांवरील प्रेम पवित्र नसून कामुक आहे असा त्याचा अर्थ होईल. पवित्र प्रेमाचा आत्मा त्याग हा आहे—भोग हा नाहीं! प्रत्यक्ष भोग तर दूरच परंतु भोगाची अभिलाषासुद्धां पवित्र प्रेमाला वावडी आहे. ज्या प्रेमाचं पर्यवसान भोगांत होतं त्या प्रेमाला पवित्र मानण्यास मी तयार नाहीं. मी प्रेमाची किंमत त्यागावरून ठरवितों!"

" म्हणजे सर्व जग मूर्ख आणि तूंच तेवढा एक शहाणा असं का तुला वाटतं ? स्त्री आणि पुरुष यांच्या परस्परांवरील प्रेमाचं पर्यवसान जर त्यागांत होऊं लागलं तर थोड्याच काळांत पृथ्वी निर्मनुष्य झाल्याशिवाय रहाणार नाहीं."

" त्याची इतकी काळजी करण्याचं कारण नाहीं. खऱ्या प्रेमाचं पर्यवसान त्यागांत झालं पाहिजे हा माझा सिद्धान्त जग मान्य करील अशी शंकासुद्धां मनांत आणूं नकोस. उलट जग मला मूर्खांतच काढील. इतकंच नव्हे तर एखादा बहाद्दर माझ्यांत कांहीं तरी न्यून असलं पाहिजे असं म्हणायला देखील कमी करणार नाहीं. पण मला त्याची पर्वा नाहीं. कोणाला भोगांत समाधान वाटेल तर कोणाला त्यागांत पराक्रम दिसेल ! शारीरिक भोगांचे गुलाम होऊन रहाण्यापेक्षां भोगांचा त्याग करून आपलं आयुष्य लोककल्याणासाठीं वेंचणं मला अधिक श्रेयस्कर वाटतं. आतां सर्वच गोष्टी मी तुला स्पष्ट सांगतों. कामविकार हा विकारच इतका बलिष्ठ आहे कीं, मी मी म्हणणाऱ्या योग्यांनाहि त्यानं फजित केलेलं आहे, मग आपण तर बोलूनचालून सामान्य माणसं ! हिरेनं माझ्या शरिराला कामुक भावनेनं स्पर्श करतांच माझी काय तारांबळ उडाली ती माझ्या पूर्ण स्मरणांत आहे. अशी दचकूं नकोस. त्यांत माझा कांहीं अपराध नव्हता— हिरेलाहि दोष लावायला मी तयार नाहीं. तिचं माझ्यावर खरोखरच फार प्रेम आहे. तिला त्या वेळीं माहीत नव्हतं कीं, मी माझं मन पूर्वीच तुला वाहिलेलं होतं ! तिला माझी हकिकत कळल्यानंतर तिनं आपली वागणूक या क्षणापर्यंत अत्यंत पवित्र ठेवली आहे. तुझं पत्र बापूसाहेबांना ज्या दिवशीं आलं त्याच दिवशीं त्यांची नि माझी पहिली भेट झाली व त्या भेटींत बापूसाहेबांच्या थोर व दिलदार अंतःकरणाचा मला पूर्ण अनुभव आला. 'तुमच्या यमूला मी तुमच्या स्वाधीन करण्यास तयार आहें' हे त्यांचे शब्द ऐकतांच माझ्या मनाची विलक्षण चलबिचल झाली व माझं मन किती विक्षिप्त आहे याच. मला चांगलाच अनुभव आला. त्याच दिवशीं शांतपणें विचार करून मी माझ्या मनाशीं पक्का

निश्चय केला कीं, आपलं सारं आयुष्य लोककल्याणासाठींच खर्च करायचं ! आपल्या शरिराचं कोडकौतुक सारं जग पुरवीतच आहे. त्यांत काय मोठासा पुरुषार्थ ? मनुष्याच्या समोर आपल्या स्वतःच्या सुखाव्यतिरिक्त कोणताहि विषय नसला म्हणजेच तो अधोगतीला जातो. अशीं माणसं बोकाळलीं म्हणजे त्या समाजाला कीड लागते, तें राष्ट्र गुलामगिरीच्या जात्यांत भरडलं जातं ! ज्याची दृष्टि एकदां स्वार्थावर खिळली त्याला त्याच्या समाजाचा किंवा त्याच्या राष्ट्राचा विसर पडलाच म्हणून समजावं ! इतकंच नव्हे तर त्याच्या समाजाचं अगर राष्ट्राचं कितीहि नुकसान होत असलं तरी तो स्वतःपुरतंच पहाणार ! मला माझी दृष्टि इतकी संकुचित ठेवायची नाहीं. मला माझ्या समाजाचं ऋण आहे—मला माझ्या राष्ट्राचं ऋण आहे—तें मला फेडतां आलं नाहीं तरी तें फेडण्याचा प्रयत्न करण्यांत सर्व आयुष्य घालविणं हेंच माझं पवित्र कर्तव्य आहे. माझ्या या विचारसरणीला अव्यवहार्य म्हणून समजणारचे बहुतेक हरीचे लाल भेटतील ! पण मला मुळीं जगानं चांगलं म्हणावं म्हणून कांहीं करायचंच नाहीं. परमेश्वरानं मला जन्माला घातलं आणि तेंहि परम पवित्र अशा या पुण्य-भूमीत जन्माला घातलं तें कांहीं केवळ विषयाच्या खातेऱ्यांत डुकरासारखं लोळण्यासाठीं खास नव्हे. स्वार्थ साधून परमार्थहि साधणारे कांहीं थोर लोक जगांत असतील, नाहीं असं नाहीं—पण तेवढं थोर भाग्य मला लाभलेलं नाहीं आणि त्याबद्दल मला हळहळहि वाटत नाहीं."

"बोलतांबोलतां तूं कुठं वहावत चाललास, माधव ? समाजकार्य काय—राष्ट्रकार्य काय ! कितीतरी लोक आपापल्या परीनें तीं कार्यें करीतच आहेत. त्यांत तूं आणखी एक शिरलास तर त्या कार्यांत फारशी मोठी भर पडणार आहे असं थोडंच आहे ?"

"मग काय ? खातेऱ्यांतल्या डुकरांत माझी आणखी भर घालूं ? माझ्या हातून फारसं मोठं कार्य होण्यारखं नसलं म्हणून काय झालं ! मी माझं कर्तव्य

केल्याचं समाधान तरी मला मिळेल कीं नाहीं ? नाटकांत सर्वांच्याच वांट्याला शिवाजीचं किंवा प्रतापसिंहाचं काम कसं येणार ? या जगाच्या रंगभूमीवर एखाद्या हिरडस मावळ्याचं किंवा साध्या रजपूत शिपायाचंच काम जर विश्वाच्या सूत्रधारानं माझ्याकरितां नेमलं असेल तर तेंच मला माझ्या शक्तीप्रमाणें आणि प्रामाणिकपणें केलं पाहिजे. पायांत खचल्या जाणाऱ्या दगडांच्या जिवावरच मोठमोठ्या हवेल्यांचं जीवित अवलंबून असतं ना ? आतां हें खरं कीं, हवेलीच्या सौंदर्याचा उपभोग घेत असतांना तिच्या खालीं दडपल्या गेलेल्या दगडांचा बहुतेक माणसांना विसर पडत असतो. परंतु त्यामुळें त्या दगडांच्या स्वार्थत्यागाचं महत्त्व कमी ठरतं असं थोडंच आहे ? ”

“ हें सर्व तत्त्वज्ञान झालं. प्रत्यक्ष व्यवहार काय आहे हें पाहिलं पाहिजे. त्यागांत कर्तव्यपूर्तीचं समाधान असेल कदाचित् पण त्यांत उपभोगाचं सुख नाहीं हें तर सत्यच आहे ना ? ”

“ तें प्रत्येक व्यक्तीच्या मनोरचनेवर अवलंबून आहे. कोणाला उपभोगांत सुख वाटेल तर कोणाला त्यागांत समाधान लाभेल. आपली प्रत्येक बारीकसारीक हौस भागविण्यांत आपलं आयुष्य घालविणं हें कोणी आपल्या जीविताचं सारसर्वस्व समजत असतील तर कित्येक, आपल्या ऐहिक सुखाची राखरांगोळी करून, आपण ज्या समाजाचे घटक आहोंत, ज्या देशांत आपण जन्म घेतला आहे, त्या समाजाच्या हितासाठीं किंवा त्या देशाच्या दुःखविमोचनासाठीं पेटविण्यांत येणाऱ्या होमकुंडांत आपल्या सुखाची आहुति देणं हेंच मोक्षाचं परमोच्च साधन मानीत असतील ! असं करतांना आपण कांहीं तरी विशेष करीत आहोंत अशा अहंकारानं इतरांस तुच्छ किंवा अधम लेखणं हें मात्र दूषणास्पद आहे ! ”

“ मग मघाशीं— ”

" तें माझ्या लक्षांत आहे. अजून मी                    व्यवहारी मार्गानं जाणाऱ्या माणसांच्या भावना निष्कारण दुखविल्या जातील अशा प्रकारची भाषा मघाशीं माझ्या तोंडून उतावळेपणानं निघून गेली ! यमू, त्याबद्दल तूं मला क्षमा कर. कोणालाच दुखविण्याचा माझा हेतु नाहीं. जो तो आपापल्या बुद्धीप्रमाणें व शक्तीप्रमाणें शक्य तितक्या चांगल्या प्रकारें वागण्याचा प्रयत्न करीतच असतो. मला जो मार्ग पसंत पडला त्या मार्गानें मी जावं. सर्वांनीं आपल्याच मार्गाचा अवलंब केला पाहिजे असा आग्रह धरण्याचा मला अधिकार काय ? "

" हा सगळा तुझ्या परीनें विचार झाला. मी आतां माझं पुढील आयुष्य कसं घालवावं ? "

" हा तुझा प्रश्न आहे. या प्रश्नाचं उत्तर मला कसं देतां येणार ? तुझं कल्याण कशांत आहे हें समजण्याइतकं ज्ञान तुला खास आहे. "

" माझा मार्ग मी ठरवला होता. पण आतां त्याचा काय उपयोग ? ज्या मार्गानं जाण्याचा माझा संकल्प होता तो मार्गच बंद झाला आणि इतर मार्गांचा मी मुळीं कधीं विचारच केलेला नाहीं. कारण माझ्या मार्गांत विघ्न उपस्थित होईल अशी मला कधीं शंकाच आलेली नव्हती. "

" खरं सांगायचं म्हणजे कांहीं दिवसांपूर्वींपर्यंत तुझा नि माझा मार्ग एकच होता. परंतु विचारपूर्वक व मोठ्या कष्टानें तो माझा मीच बदलून टाकला. "

" मला एक शंका येते आहे ती उघड विचारूं का ? शंका जराशी चमत्कारिक आहे म्हणून–"

" विचार, खुशाल विचार. मी तुझ्यापासून कांहींहि चोरून ठेवणार नाहीं. "

" विवाहबंधनानं मी दुसऱ्याची पत्नी झालें म्हणून तर तुझा आतांचा बोलून दाखविलेला निश्चय झाला नाहीं ना ? विवाहित स्त्रीचा आपण स्वीकार कसा करावा, तसं केलं तर समाज आपणाला काय म्हणेल, अशी तर तुला भीति

वाटत नाहीं ना ? या घटकेपर्यंत मी अविवाहित असतें तरीहि तूं आपला मार्ग असाच ठरविला असतास का ? ''

" माझं तुझ्यावर लहानपणीं प्रेम होतं तसं प्रेम मी या वयांतहि तुझ्यावर करूं शकलों असतों तर कदाचित् तुझा विवाह झालेला असतांहि मी तुझ्या प्रेमाचा स्वीकार केला असता. पण माझ्या आत्तांच्या प्रेमाची जात पूर्वींप्रमाणें सात्विक नाहीं. ''

" त्याचप्रमाणें माझ्या तुझ्यावरील आत्तांच्या प्रेमाची जातहि सात्विक नाहीं. पण मला वाटतं यांत तुझा किंवा माझा कोणाचाच दोष नाहीं. हा निसर्गाचा दोष आहे. आपण लहानपणीं होतों तशींच जन्मभर कशीं रहाणार ? आपल्यांत इतर बदल झाले त्याचप्रमाणें आपल्या प्रेमांतल्या जातींतहि बदल झाला, त्यांत दोषास्पद असं काय आहे ? ''

" त्यांत कांहीं दोषास्पद असेल किंवा नसेल परंतु त्यांत कांहीं वैशिष्ट्य नाहीं हें मात्र खास. निसर्गासंबंधानंच बोलायचं तर पुष्कळच बोलतां येईल. तुझ्या-संबंधानं मला कांहीं बोलतां येत नसलं तरी माझ्या संबंधानं मी बोलूं शकतों. साधारणपणें रूपानं बरी दिसणारी प्रत्येक तरुणी मला आवडते—नव्हे—हवीशी वाटते, हाहि एक निसर्गाचाच खेळ नव्हे का ? याचा अर्थ असा का करायचा कीं, निसर्गाच्या आहारीं जाऊन मी प्रत्येक सुंदर तरुणीची अभिलाषा धरावी ? निसर्गाचा प्रतिकार करायचाच नाहीं असं प्रत्येकानं ठरविलं तर जगांत अन-वस्थाप्रसंग ओढवल्याशिवाय रहाणार नाहीं. तुझा मी स्वीकार केला तर जग मला दूषण देईल अशी मला भीति वाटते कीं काय, असा प्रश्न तूं मला केलास. मी तुला उघडच सांगतों. निसर्गाच्याच आहारीं जाण्याचं माझ्या नशिबीं आलं असतं तर तुझ्याशिवाय इतर कोणत्याहि स्त्रीचा मी स्वीकार केला नसता. त्या प्रसंगीं मी जगाची पर्वा केली नसती. परंतु निसर्गाच्या तडाख्यांतून आपली सुटका करून घेण्याचं सामर्थ्य माझ्या अंगीं आहे. एखाद्या तरुणीनं आपल्या प्रेमाचा धिःकार

केला तर आत्महत्त्या करण्यापर्यंत ज्यांची मजल जाते असेहि कित्येक तरुण आपणांला पहायला सांपडतात. जणूं काय, त्या तरुणीच्या प्रेमसंपादनापलीकडे त्याच्या जीविताचं कांहीं कार्यच नसतं !"

"पण तुझ्यावर तर तसा प्रसंग नसतांहि–"

"तेंहि सांगतों. माझ्या नैसर्गिक भावनांना परिस्थितीचीहि अनुकूलता आहे. परंतु माझी विचारसरणी मी तुला मघांशीं सांगितल्याप्रमाणें असल्यामुळें त्या अनुकूलतेचा फायदा घेण्याची माझी इच्छा नाहीं. निसर्गाचा गुलाम होऊन प्रेमाचं सार्थक उपभोगानं करावं असं मला वाटत नाहीं. मला माझं जीवित त्यागानं भूषित करावं असं वाटतं. मी पहिल्यानं तुझ्याशीं कामुक वृत्तीनं बोलत होतों तो केवळ तुझं मन पहाण्याकरितां. मला खरोखरच असं वाटत होतं कीं, तुलाहि उपभोगापेक्षां त्यागांतच सुख वाटत असेल !"

"म्हणजे ? आतांपर्यंत मी कांहीं त्यागच केलेला नाहीं, असं तुझं म्हणणं आहे काय ?"

"केलास–मला मान्य आहे. परंतु तीच तुझी त्यागवृत्ति मी तुला दिसल्यानंतरहि कायम राहिली असती तर मला अत्यानंद झाला असता. मी तुला दिसल्यावर तुझी त्यागवृत्ति मावळली व उपभोगाच्या तुझ्या लालसेनं उसळी मारली ! तूं बापूसाहेबाशीं लग्न केलंस तें तुझ्यामध्यें त्यागवृत्ति असल्याशिवाय कां केलंस ? त्याच वृत्तीनं तुला तुझं सर्व आयुष्य घालविलं पाहिजे. बापूसाहेब मात्र खरा दुर्दैवी ! बिचाऱ्याचा कांहींहि दोष नसतांना त्याला मात्र निष्कारण दुःख भोगण्याची वेळ आली ! मला विशेष वाईट वाटण्याचं कारण असं कीं, त्याचं तुझ्यावर प्रेम असून तो तुला माझ्या स्वाधीन करायलाहि जो तयार झाला तो केवळ तुला सुख व्हावं म्हणून ! माझ्या दृष्टीनं हें खरं प्रेम–तुझ्या सुखापुढं त्यानं आपला स्वार्थ तुच्छ लेखला !"

" बापूसाहेबांचं माझ्यावर प्रेम आहे म्हणून ते मला तुझ्या स्वाधीन करायला तयार झाले ? "

" होय. ज्यांना या जगांत स्वार्थाव्यतिरिक्त कांहीं दिसतच नाहीं असे व्यवहारपंडित बापूसाहेबाला मूर्ख म्हणतील पण मी तर त्याला अत्यंत दिल-दारच म्हणेन ! "

" असं असेल तर ते खरोखर अत्यंत दुर्दैवीच समजले पाहिजेत. खरंच, माझ्या लग्नाच्या वेळींच मी थोडा धीटपणा दाखविला असता तर ही सर्व अनर्थ-परंपरा आपोआप टळली असती. त्या वेळीं मी जाणूनबुजूनच धीटपणा दाख-विला नाहीं. मला असं वाटत होतं कीं, आपण आपल्या बंडखोर वृत्तीनं समाजाला जागृत करूं ! माझी ही कल्पना किंवा अटकळ खरी ठरायची म्हणजे अर्थात् तुझी साथ मला मिळाली असती तरच ! त्या वेळीं मला कल्पना नव्हती कीं, तूं आयत्या वेळीं माघार घेशील ! "

" झाल्या गेल्या गोष्टींबद्दल वाईट वाटून घेण्यांत काय अर्थ ? आल्या परिस्थितींत योग्य प्रकारं वागणं एवढंच आपल्या हातीं आहे व तेंच आपलं कर्तव्य आहे. "

" मग आतां अशा बिकट प्रसंगीं मी कसं वागावं तें सांग ना मला—"

." मी सांगेन त्याप्रमाणं वागण्याचं तूं मला वचन द्यायला तयार आहेस का ?"

" माझ्याबद्दल तुला शंका वाटते ? तूं माझी निराशा केली असलीस तरी तुझ्या संबंधींच्या माझ्या भावना नष्ट झालेल्या नाहींत व कधीं नष्ट होणारहि नाहींत. तूं माझं ऐक किंवा ऐकूं नकोस. पण मला मात्र तुझा शब्द किंवा तुझी इच्छा केव्हांहि प्रमाणच आहे. "

" तर मग तुझ्याकरितां—तुझ्या सुखाकरितां—आपल्या स्वार्थावर पाणी सोडून आपलं उच्च दर्जाचं प्रेम सिद्ध करणाऱ्या बापूसाहेबाच्या प्रेमाचं चीज करून त्याच्या ऋणांतून तूं मुक्त हो ! "

" म्हणजे ? काय सांगतो आहेस हें तूं मला ? "

" अगदीं योग्य तेंच सांगतों आहें. तुझ्यावर इतकं निःस्वार्थ प्रेम करणाऱ्या प्रेमी माणसाचं ऋण फेडणं हें तुझं कर्तव्यच आहे. हें माझं म्हणणं तूं माझ्यासाठीं–या तुझ्या माधवासाठीं–तूं मान्य करावंस अशी माझी इच्छा आहे–अशी माझी तुला विनंति आहे. "

" माधव, तुझा कोणताहि शब्द पाळण्याचं मी तुला वचन दिलं त्या वेळीं तूं मला असलं दिव्य करायला सांगशील अशी माझी कल्पना नव्हती. माधवाची यमू बापूसाहेबांची कशी होऊं शकेल ? यमूचा माधव हिरेचा होऊं शकला का ? "

" यमूचा माधव हिरेचा होऊं शकला नाहीं याला एक सबळ कारण आहे. हिरा माधवाकडे कामुकतेनें पहात होती, परंतु बापूसाहेबांची यमूसंबंधाची दृष्टि कामुक नाहीं. तुझ्यावरील त्यांचं उच्च दर्जाचं प्रेम त्यांनीं आपल्या त्यागी वृत्तीनं सिद्ध करून दाखविलं आहे आणि तुझं या तुझ्या माधवावर खरोखरच प्रेम असेल तर त्याच्याकरितां तूं बापूसाहेबांचा स्वीकार केलाच पाहिजेस. "

इतक्यांत बापूसाहेब व हिरा त्या खोलींत आलीं. माधवाचे शेवटचे शब्द त्या दोघांनीं ऐकले होते.

" वाः ! माधवराव, हें तुम्ही काय चालविलं आहे ? " बापूसाहेबानें विचारलें.

" मी माझ्या एका ऋणांतून मुक्त होण्याचा प्रयत्न करतों आहें. बापूसाहेब, तुम्ही माझे मित्र आहांत. मी माझं मित्रऋण फेडीत आहें. "

" मित्रऋण फेडण्याची ही तुमची तऱ्हा जगावेगळीच दिसते. शिवाय मित्रऋण फेडण्याच्या नादांत तुम्ही एका निरपराध जीवावर जुलूम करीत आहांत हें तुमच्या लक्षांत आलं नाहींसं दिसतं ! "

" मी हा जुलूम करतों आहें असं, यमू, तुलाहि वाटतं का ? बापूसाहेबांना त्यांच्या प्रेमाचं पारितोषक देणं यांत तुझ्यावर जुलूम झाल्यारखं तुला वाटेल काय ? " माधवानें विचारलें.

" तिचं तुमच्यावर प्रेम होतं व आहेहि. त्या प्रेमासाठीं ती कदाचित् तुमच्या म्हणण्याप्रमाणं वागायला तयारहि होईल. परंतु तिचं निष्पाप व निरपराध मन दुखवायला मी कल्पांतींहि तयार होणार नाहीं, " बापूसाहेब म्हणाला.

" मग या एकंदर भानगडीचा निकाल आतां लागणार तरी कसा ? " हिरेनें विचारलें.

" खरोखरच मोठा बिकट प्रश्न आहे, " माधव म्हणाला. " परंतु प्रश्न कितीहि बिकट असला तरी तो आपला आपणच सोडविला पाहिजे. या नाहीं त्या नात्यानं एकमेकांशीं मनानं नि प्रेमानं बद्ध असणारीं आपण चारी माणसं एकत्र जमलों आहोंत. ज्यामुळं आपणां चौघांचंहि कल्याण होईल असाच मार्ग यांतून काढला पाहिजे. सध्यां आपली चौघांचीहि स्थिति भांबावल्यासारखी झाली आहे. तेव्हां या वेळीं हा विषय इथंच थांबविणं बरं असं मला वाटतं. या विषयाचा उहापोह करायला आपल्याला सर्व रात्र पडलेलीच आहे– "

" बाईहि मघांपासून दोनतीनदां डोकावून गेल्या, " वैजयंती म्हणाली. " जेवणं झाल्यावर यांतून कांहीं तरी मार्ग काढलाच पाहिजे. मी सांगतेंच बाईंना पानं मांडायला– "

हा विचार सर्वांनाच पटला व सर्वजण जेवायला गेलीं.



शेवट—

# १६

जेवणें आटोपल्यावर सर्वांनाच झोंपावेंसें वाटूं लागलें. थोड्याच वेळांत सर्वांची निजानीज झाली. सकाळीं हिरा सर्वांच्या पूर्वी उठली. पहाते तों यमू आपल्या कॉटवर नाहीं. त्या कॉटवर माधवाच्या नांवानें लिहिलेलें एक पत्र मात्र होतें. हिरेच्या मनांत एकदम वाईट शंका आली. ती धांवतच बाहेर आली व तिनें माधवाला मोठ्यानें हांक मारली. माधव दचकून जागा झाला. हिरेची भेदरलेली मुद्रा पहातांच त्याच्या काळजांत धस्स् झालें. हिरेच्या हांकेमुळें बापूसाहेबहि जागा झाला होता. माधवानें कांपऱ्या हातांनीं तें पाकीट फोडलें व आंतील मजकूर वाचला.

" प्रिय माधव,

काल आपलें अखेरचें बोलणें झालें. तुझ्या थोड्याशाच सहवासानें मला स्वर्गसुखाचा आनंद वाटला. जगावयाचें तर मला तुझ्या सांगण्याप्रमाणें वागणें भाग होतें. तूं मला तसें वागावयास सांगितलेंस याचें कारण तूं पुरुष आहेस. स्त्रीच्या अंत:करणाची परीक्षा तुझ्यासारख्या पुरुषी अंत:करणाच्या पुरुषाला होणें कठीणच ! तेव्हां या पेंचप्रसंगांतून आपणां सर्वांची एकदम मुक्तता करण्याचा एकच मार्ग म्हणून मी आत्महत्त्या करीत आहें. भेकड असतात तींच माणसें आत्महत्त्या करितात असें मी अनेक ठिकाणीं वाचलें आहे. तेव्हां या माझ्या आत्महत्त्येमुळें मी भेकड ठरणार हें उघडच

आहे. मी जिवंत होतें तोंपर्यंत तूं माझ्याशीं निदान शरिरानें तरी इमानानें वागलास, तूं खराच पुरुष आहेस ! माझी मरतेवेळची एकच इच्छा तूं पूर्ण कर. हिराताईचें तुझ्यावर अत्यंत प्रेम आहे. त्यांच्या प्रेमाचा स्वीकार करून त्यांना तूं सुखी कर. परमेश्वरसाक्ष सांगतें कीं, हें मी अत्यंत प्रांजल बुद्धीनें लिहीत आहें. तूं असें न करशील तर माझ्या आत्म्याला अत्यंत दारुण अशा यातना होतील.

बापूसाहेबांना माझा अखेरचा निरोप कळव कीं, त्यांच्या माझ्यावरील प्रेमाचा मोबदला मला त्यांस देतां आला नाहीं याबद्दल मला फारच वाईट वाटलें. दुर्दैवी बिचारे ! त्यांचें माझ्यावर खरोखरच प्रेम होतें—कारण तूंच मला तसें सांगितलेंस व तूं मला खोटें सांगणें शक्यच नाहीं ! त्यांना माझी एवढीच विनंति आहे कीं, त्यांनीं आपलें उरलेलें आयुष्य समाजसेवेंत व राष्ट्रसेवेंत घालवावें.

हिराताईच्या बाबतींत मी लिहिलेलें करण्यास मात्र चुकूं नकोस एवढीच तुला—माझ्या माधवाला—माझी—माधवाच्या यमूची—शेवटची प्रार्थना आहे. ”




॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥